# गायनमहर्षी अल्लादियाखां यांचे चरित्र





गोविंदराव टेंबे

# गायनमहर्षी अल्लादियाखां यांचे चरित्र

गोविंदराव टेंबे




संपादक

वामनराव देशपांडे
बाबुराव जोशी




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

मुंबई

प्रथमावृत्ती : सप्टेंबर, १९५४
द्वितीयावृत्ती : ऑक्टोबर, १९८४

वेष्टन : दीप डिझाईन, मुंबई

प्रकाशक :
सु० द्वा० देशमुख, सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

मुद्रक :
प्र० पु० भागवत
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४०० ००४

मूल्य : सोळा रुपये

# प्रस्तावना

चरित्र नायक गायन महर्षी आणि चरित्र लेखक गोविंदराव टेंबे, संगीतात मला जरी गती नसली तरी या दोघांच्याही मोठेपणाबद्दल मी लहानपणीच ऐकले होते. माझे तीर्थरूप आणि माझे ज्येष्ठ बंधू यांना संगीताबद्दल आस्था होती. नागपुरात होणाऱ्या अनेक जलशांना ते उपस्थित राहत असत. नागपूरच्या बाहेरही ते जलशांना हजर राहिले असावेत असे मला वाटते. त्यामुळे अनेक संगीतज्ञांविषयी आमच्या घरात बोलणे पण चालत असे. अशा संभाषणात अल्लादियाखां बरोबरच, अब्दुल करीमखां, अल्लाउद्दीनखां, श्री. विष्णु दिगंबर पलुस्कर, श्री. भातखंडे, प्यारासाहेब, जानकीबाई, गोहरजान, मोगूबाई, केसरबाई, लक्ष्मीबाई, मल्लिकार्जुन मन्सूर, गंगूबाई हनगल, गोविंदराव टेंबे, इत्यादिकांचा पण उल्लेख येत असे. ‘सुरसुख खनि तू विमला’ व ‘उगिच का कान्ता गांजिता’ ह्या गोविंदराव यांनी हार्मोनियमवर वाजविलेल्या गीतांचे सूर अजूनही माझ्या कानात घुमतात. मायामच्छिंद्र या बोलपटातील त्यांच्या अभिनयामुळे तर गोविंदराव टेंबे सर्वच नागपूरकर आबालवृद्धांचे लाडके झाले होते. पुढे मराठवाड्यातील अण्णासाहेब गुंजकर व दिल्लीचे डॉ. सुशील सक्सेना यांच्या सहवासात आल्यामुळे गायकीबद्दल आणि घराण्याबद्दल मला आणखीही प्रेम वाटू लागले. हैदराबादेत असताना पर्वतकरबुवा यांचे स्वरमंडळ ऐकण्याची पण संधी मला मिळाली होती. डॉ. सुशील सक्सेना तत्वज्ञानाचे शिक्षक, पण संगीताचे फार दर्दी होते. त्यांच्या बरोबरच्या संभाषणात संगीताबद्दलचे औत्सुक्य आणखी वाढले. विशेषतः त्या काळात अल्लादियाखां आणि आजच्या डागर बंधूंच्या आधीच्या पिढीतील एक नामवंत ध्रुपदिये (त्यांचे नाव मला आता आठवत नाही) यांच्या संगीताने मी भारावून गेलो होतो. या ध्रुपदियांनी आपल्या भाषणात ध्रुपद पद्धतीची इतक्या विविध प्रकारची माहिती दिली की कोणीही त्यामुळे थक्क व्हावा. माहिती बरोबरच उत्कृष्ट प्रकारचे ध्रुपद संगीत पण त्यांनी गाऊन दाखविले आणि मला शब्दशः मंत्रमुग्ध केले. अशा मैफीलीच्यावेळी माझ्या मनात सारखे येई की या सर्व संगीत महर्षींचे जीवनचरित्र जनसामान्यांना उपलब्ध झाले पाहिजे. मी तसे डॉ. सक्सेना यांना बोलून पण दाखवीत असे. डॉ. सक्सेना हे अधूनमधून निरनिराळ्या घराण्यांवर लिहीत पण असत. पण या सर्व गायन महर्षींचे चरित्र लिहिणे एकट्यादुकट्याचे तर काम नव्हतेच.

अशा गायन सम्राटांचा चरित्रकार हा सुद्धा तेवढाच तोलामोलाचा व व्युत्पन्न पाहिजे असतो. सुदैवाने गायन महर्षी मरहूम अल्लादियाखां यांचे चरित्र कै. गोविंदराव टेंबे यांच्या प्रतिभासंपन्न लेखणीतून उतरले गेले आहे. आज अनेक वर्षे हे चरित्र लोकांना दुर्मिळ झाले होते. साहित्य-संस्कृती मंडळाला हे चरित्र पुनर्मुद्रित करण्याचा मान मिळत आहे ही मंडळाच्या दृष्टीने फार अभिमानाची गोष्ट आहे.

या ग्रंथाचे प्रस्तावनाकार श्री. बाबूराव जोशी यांनी आपल्या प्रस्तावनेत म्हटल्या-प्रमाणे मुळात हे चरित्र संगीत-कला-विहार या मासिकातून डिसेंबर १९५२ ते मे १९५४ या काळात प्रसिद्ध झाले होते. त्यानंतर ते पुस्तकाच्या स्वरूपात सप्टेंबर १९५४ मध्ये पुनः छापले गेले. पण ते केवळ खाजगी प्रसारासाठी होते. माहितीतील लोकांच्याकडे स्वस्त दरात पुस्तक देण्याची कल्पना होती. पण त्यानंतर अल्पकाळातच गोविंदरावांचे निधन झाले. त्यामुळे त्यांची या पुस्तकाची चांगली आवृत्ती काढण्याची मनीषा तशीच राहून गेली. अर्थातच पुस्तकाचे स्वरूप अगदीच साधेसुधे होते. कागद, छपाई, अगदीच निकृष्ट स्वरूपाची असून खांसाहेबांचा त्यात एक साधा फोटोही नव्हता. तेव्हा हे चरित्र सुधारून, सजवून, टीपा, सूची, मार्मिक प्रस्तावनेसकट व खांसाहेबांच्या परिवारातल्या शिष्यशाखेतल्या व त्यांची गायकी गाणाऱ्या पहिल्या पिढीतल्या कलाकारांच्या फोटोसहित पुनर्मुद्रित स्वरूपात प्रसिद्ध करण्यात आम्हाला विशेष आनंद होत आहे. या पुस्तका-बरोबरच गोविंदरावलिखित 'माझा संगीत व्यासंग' हाही ग्रंथ आम्ही प्रसिद्ध करीत आहोत. वस्तुतः प्रस्तुत चरित्र हे तो ग्रंथ आधी वाचून मगच वाचायचे आहे हे वाचकांच्या निदर्शनाला आणले पाहिजे. ते तसे वाचले जाईल असे गोविंदरावांनीही गृहीत धरले होते.

नामदार मु. रा उर्फ डॉ. बाबासाहेब जयकर यांनी खांसाहेबांचे वर्णन Mount Everest of Indian music असे केले होते. नामदार जयकर हे संगीताचेही मर्मज्ञ होते हे लक्षात घेता त्यांच्यासारख्या जगप्रसिद्ध व्यक्तीने अशी हिमालयाच्या उच्चतम शिखराची पदवी त्यांना द्यावी याला विशेष अर्थ आहे. गोविंदरावांनीही त्यांना गायन-महर्षी म्हणून संबोधिले आहे. गोविंदरावांनी स्वतःच हार्मोनियम वादनातील सर्वोच्च शिखर गाठलेले होते पण ते नुसतेच हार्मोनियम वादक नव्हते तर ते अभिनयपटू नट, अनेक यशस्वी नाटके लिहिणारे नाटककार, कवी, संगीत रचनाकार व कोणत्याही कलेचे मर्म शब्दात पकडण्याची किमया साधलेले एक श्रेष्ठ साहित्यिक असे बहुरंगी कलाकार होते. म्हणूनच त्यांना हे चरित्र लिहिता आले. इतर कोणलाही ते शक्य झाले नसते.

गोविंदरावांनी खांसाहेबांना 'गायनमहर्षी' या पदवीने गौरविले ते अर्थातच विचारपूर्वक. गोविंदराव खांसाहेबांचे अगर त्या घराण्याचे शिष्य नव्हेत. तसे पाहिले तर गोविंदरावांना कोणी गुरू नव्हतेच. भास्करबुवा बखल्यांना ते गुरु 'मानीत' आणि भास्करबुवांनीही अखेर खांसाहेबांचे शिष्यत्व पत्करले. प्रख्यात गायक म. मंजीखां, भूर्जीखां, हैदरखां, नत्थनखां खुद्द त्यांच्याच वांशिक परंपरेतले होतेच. शिवाय अखिल

हिंदुस्थानात नाव मिळविलेल्या कै. पद्मभूषण केसरबाई केरकर व पद्मभूषण श्रीमती मोगूबाई कुर्डीकर वगैरे या खांसाहेबाच्याच शिष्या. त्याशिवाय आजकालचे त्या घराण्याचे प्रसिद्ध कलाकार म्हणजे पं. मल्लिकार्जुन मन्सूर, निवृत्तीबुवा सरनाईक, श्रीमती किशोरी आमोणकर यांनी फारच मोठे यश मिळविलेले आहे. स्वतः गोविंदरावांची खांसाहेबांच्याच गायकीवर भक्ती होती व त्यांच्या पेटीवादनात आणि गाण्यात तीच प्रत्ययाला येत असे. पण गोविंदरावांची खांसाहेबांवरची श्रद्धा ही अंधश्रद्धा नसून ती डोळस भक्ती होती अशी ग्वाही त्यांनी स्वतःच दिली आहे. तरीही गोविंदरावांचे सांगीतिक चरित्र लक्षात घेता असे दिसते की त्यांचे त्यांच्या काळातील सर्व थोर थोर गायक वादकांच्या कलेवर प्रेम होते. त्यात कै. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, वझेबुवा, बर्कतुल्ला, मौजुद्दिन, गोहरजान, वगैरे अभिजात कलाकार तसेच भाऊराव कोल्हटकरांपासून कृष्णराव गोन्यांपर्यंत समर्थ नट-गायकही होते, आणि हे आकर्षण एका सामान्य रसिकाचे नव्हे तर संगीताची चतुरस्र जाण व सौंदर्यदृष्टी असलेल्या व हार्मोनियम वादनाचा 'बादशहा' ठरलेल्या अशा असाधारण श्रेष्ठ कलावंताचे होते. अशा व्यक्तीने खांसाहेबांना सर्वश्रेष्ठ गायनमहर्षी ठरवावे हा प्रश्न केवळ श्रद्धेचा असणे शक्यच नाही. या सर्व चरित्र निरूपणात स्वतः अनेक घटनांना साक्षीदार असूनही गोविंदरावांच्या लेखनात कोठेही 'मी'चा सूर आलेला नाही.

गायनकलेतील श्रेष्ठता दर्शविण्यात त्याकाळी पंडित, गायनाचार्य, गायनसम्राट, संगीतरत्न वगैरे पदव्या प्रसिद्ध होत्या. पण खांसाहेबांच्या बाबतीत त्या अपुऱ्या वाटू लागल्या. कलावंत म्हटला की 'दुर्दैवाने त्याच्या अंगी काही दुर्गुण आणि विशेषतः व्यवसायाधीनता सर्वसाधारणतः आढळून येते. पण खांसाहेब त्याला सन्माननीय अपवाद होते. त्यांचा रुबाब, धीरगंभीर वृत्ती, अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा, स्थितप्रज्ञता बोलण्यातला मितस्थपणा आणि व्यसनातीत वृत्ती असे जे गोविंदरावांनी खांसाहेबांचे वर्णन केले आहे ते लक्षणीय आहे.

प्रस्तुत ग्रंथाला एक अनन्य साधारण असे ऐतिहासिक महत्त्व आहे. एकोणिसाव्या शतकातील अर्धशतक व चालू विसाव्या शतकातील अर्धशतक अशा सुमारे शंभर वर्षांच्या कालखंडातील हकीगत हा इतरत्र कोठेही न आलेला भाग यात आहे. शिवाय या हकीगती खांसाहेबांनी स्वतः कथन केलेल्या असल्यामुळे त्यात या शंभर वर्षांच्या कालातील प्रमुख कलावंतांची माहिती अनुषंगाने आली आहे. खांसाहेबांच्या प्रत्यक्ष तोंडून आलेल्या हकीगती आपल्याला गोविंदरावांच्या प्रत्ययकारी लेखणीतून मिळत आहेत.

असा हा ऐतिहासिक ग्रंथ सुधारून, सजवून, अन्य माहिती, सूची, टीपा, व बाबूराव जोशी यांच्या मार्मिक प्रस्तावनेसह, पुनर्मुद्रित स्वरूपात प्रसिद्ध करण्यात आम्हाला धन्यता वाटते.

**सुरेंद्र बारलिंगे,**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ मुंबई

महाराष्ट्रदिन : मुंबई दिनांक १-५-८४

# अनुक्रम

# संपादकीय प्रस्तावना

गायन महर्षी अल्लादियाखांसाहेब यांचे गोविंदराव टेंबे यांनी लिहिलेले हे चरित्र सुधारून, सजवून व पुनर्मुद्रित करून वाचकांपुढे नवीन स्वरूपात ठेवण्यात आम्हांला आनंद होत आहे.

मुळात हे चरित्र 'संगीत कला विहार' या मासिकातून हप्त्याहप्त्याने (डिसेंबर १९५२ ते मे १९५४) प्रसिद्ध झाले होते. त्यानंतर ते लेख पुस्तकाच्या स्वरूपात सप्टेंबर १९५४ मध्ये पुन्हा छापले गेले. पण ते केवळ खाजगी प्रसारासाठी होते. जाहीररीत्या ते प्रसिद्ध केले नव्हते. माहितीतील लोकांच्याकडे ते स्वस्त दरात देण्याची कल्पना होती. साहजिकच, त्या पुस्तकाचे स्वरूप अगदी साधेसुधे होते. चरित्रनायकाचा एक साधा फोटोही त्यात नव्हता. कागद, छपाई इत्यादी सर्व निकृष्ट होते. चांगल्या आकर्षक स्वरूपात ते पुस्तक पुढेमागे प्रसिद्ध करावे असे गोविंदरावांच्या मनात होते. तसे माझ्यासारख्याकडे त्यांनी बोलूनही दाखविले होते. पण वर्षभरातच गोविंदरावांचे आकस्मिक निधन झाल्याने दुर्दैवाने ती कल्पना मूर्त स्वरूपात येऊ शकली नाही.

गेले वर्ष (५ जून १९८१ ते ५ जून १९८२) हे गोविंदरावांच्या जन्मशताब्दीचे वर्ष. त्या निमित्ताने त्यांची 'संगीत व्यासंग' व प्रस्तुत चरित्र ही पुस्तके पुनर्मुद्रित व्हावीत अशी कल्पना गोविंदरावांच्या चाहत्यांनी साहित्य संस्कृती मंडळापुढे मांडली व मंडळाने ती आनंदाने मान्य केली. त्याची ही फलश्रुती.

हे चरित्र मुळातच एकावेळी एकसंध असे लिहिले गेले नव्हते. ते क्रमशः लिहिले गेले. साहजिकच लिखाणात विस्कळितपणा, पुनरुक्ती, कालानुक्रम सुटणे असे काही दोष राहिले. लेखमालेचे पुस्तकात रूपांतर झाले तरी विषयांचे प्रकरणवार वर्गीकरणही झाले नव्हते. म्हणून पुस्तकाची प्रकरणे नवीन करून विभागणी करावी लागली आहे. त्या दृष्टीने मागेपुढे झालेला मजकूर जुळवून घ्यावा लागला. काही टीपा देणे जरूर वाटले. अनुक्रमणिका, सूची, परिशिष्टे, छायाचित्रे असे भाग नवीन घातले आहेत. पण एकंदरीने मूळ मजकूर कायम ठेवला आहे. दोन भाग एकत्र करताना, अगर दुवा साधण्यासाठी अपरिहार्यतेने चारदोन शब्द अगर एखादे दुसरे वाक्य नवीन घालावे लागले- इतक्याच मर्यादेने आमची ढवळाढवळ आहे. गोविंदरावांचे मूळ लिखाणच इतके प्रभावी

व ओघवते आहे की त्यांच्या लिखाणात काही विस्कळितपणा अथवा पुनरुक्ती सहसा जाणवणार नाही; आणि जाणवली तरी पुस्तकाच्या एकंदरीत होणाऱ्या परिणामात काही बाध येणार नाही.

प्रस्तुत चरित्राच्या वाचकांनी 'संगीत व्यासंग' हे आधीचे पुस्तक वाचलेले आहे असे गोविंदरावांनी गृहीत धरले आहे. म्हणून काही हकीकतींचा संक्षेप देऊन अधिक माहिती आपल्या 'संगीत व्यासंगा'त वाचावयास मिळेल असे त्यांनी काही ठिकाणी म्हटले आहे. आता पुनर्मुद्रित होणाऱ्या त्या पुस्तकात फार तपशीलवार टीपा नव्यानेच देण्यात आल्या आहेत. म्हणून प्रस्तुत वाचकांनी ते पुस्तक वाचणे आगत्याचे ठरेल.

हे पुस्तक सध्या प्रचलित असलेल्या मराठी शुद्धलेखनाच्या पद्धतीने शक्यतो दुरुस्त करून छापले आहे. खांसाहेब या शब्दातील 'खा' या अक्षरावर अनुस्वाराखेरीज अर्धचंद्राकृतीही असते. पण मराठीतील रूढ पद्धतीप्रमाणे त्यावरील फक्त अनुस्वारच तेवढा ठेवला आहे.

चरित्रलेखनाचे प्रामुख्याने दोन महत्त्वाचे प्रकार आढळतात. पहिल्या प्रकारात लेखकाचा चरित्रनायकाशी काहीच संबंध असत नाही. कधीकधी लेखकाने आपल्या नायकाला पाहिलेलेही असत नाही. अशावेळी कागदपत्रावरून किंवा मुलाखती वगैरे घेऊन चरित्राची जुळणी केलेली असते. अशा लिखाणात साहजिकच लेखकाची भूमिका अलिप्तपणाची असते. दुसऱ्या प्रकारात, लेखक हा नायकाशी या ना त्या कारणाने संबंधित असतो. त्याच्याकडे स्वतःचीच माहिती असते. चरित्रनायकाकडूनही त्याला माहिती मिळालेली असते. बाह्य साधनांवर त्याला फारसे अवलंबून राहावे लागत नाही. परिणामतः अशा लिखाणात लेखकाची वैयक्तिक 'गुंतवणूक' असते. तो तिऱ्हाइतासारखा तटस्थपणे विचार करू शकत नाही. दोन्ही प्रकारांत काही गुण आहेत; तसे दोषही आहेत; त्याचे तपशीलाने विवेचन करण्याची येथे गरज नाही. सुज्ञ वाचक ते समजू शकतात.

प्रस्तुत चरित्र हे दुसऱ्या प्रकारचे होय हे उघड आहे. लेखकाचा चरित्रनायकाशी ४०-५० वर्षांचा दीर्घ परिचय. स्वतःची माहिती व खुद्द चरित्रनायकाने वेळोवेळी सांगितलेली माहिती हीच या चरित्र ग्रंथाची मुख्य साधनसामग्री. म्हणजे लिखित आधार काही नाही. दुसरी गोष्ट ही की लेखकाचा नुसता दीर्घ परिचय नाही; तो चरित्र नायकाला परात्पर गुरुस्थानी मानतो. म्हणजे लेखनात व्यक्तिगत व भावनेचे प्रश्न ओघाने आलेच. असे असूनही या दोन्ही कारणांनी लेखनाला काही वैगुण्य आलेले नाही. उलट, जिव्हाळ्याच्या कारणाने लेखनाचे आकर्षण वाढलेच आहे.

प्रथम हे लक्षात घेतले पाहिजे की एकोणिसाव्या शतकातील अर्धशतक व विसाव्या शतकातील अर्धशतक अशा सुमारे शंभर वर्षांच्या कालखंडातील ही हकीकत आहे. कलावंतांसंबंधी कमीजास्त काही लिहून यायला लागले आहे हे अलीकडच्या चाळीस-

पन्नास वर्षांत. पूर्वीच्या काळात अशी प्रथा विशेष नव्हती. त्यातून प्रसिद्धीच्या झोतात क्वचित येणाऱ्या खांसाहेबांच्या बाबतीत तर त्याचा संपूर्ण अभावच. तेव्हा लिखित आधारांचा वापर लेखकाने केला नाही यात दोष नाही.

चरित्राच्या हकीकतीत प्रमुख्याने दोन भाग पडतात. पहिला म्हणजे, चरित्रनायकाने आपल्या स्वतःबद्दल व गानपूर्वजांबद्दल सांगितलेली हकीकत. ती सुद्धा सर्वच खांसाहेबांच्या स्वतःच्या माहितीतील नव्हे; तर त्यांना आपल्या पूर्वजांनी सांगितलेली व पूर्वजांना त्यांच्या पूर्वजांकडून कळलेली अशी परंपरेने चालत आलेली हकीकत. अर्थात या सर्वांचे स्वरूप 'ऐकीव' या सदरात पडते. वर म्हटल्याप्रमाणे खांसाहेबांच्यावर गेल्या शतकातलेच संस्कार अधिक झालेले. या काळातले लोक आपल्या कर्तृत्ववान पूर्वजांबद्दल बोलू लागले की, काही अतिशयोक्ती, काही चमत्कार, काही दैववाद अशा गोष्टी त्यात अपरिहार्यतेने यावयाच्याच. मग तो पूर्वज कलावंत अगर कोणत्याही अन्य क्षेत्रातील असो. प्रकरण ३ व ४ मध्ये अशा काही हकीकती वाचावयास मिळतील. या हकीकती अलीकडच्या वाचकांना 'दंतकथे'सारख्या वाटतील अशी जाणीव खुद्द लेखकानेही प्रदर्शित केली आहे. पण खांसाहेब त्या हकीकती श्रद्धापूर्वक भावनेने वरचेवर सांगत; मग त्या का मानायच्या नाहीत असे समर्थनही लेखकाने केले आहे. ते कसेही असो. जाज्वल्य गुरुभावना, वडिलधाऱ्यांचा मान, गायनकलेची प्रतिष्ठा, राजे लोकांनी विशेष केलेली कदर वगैरे गोष्टींचे दर्शन त्या हकीकतीतून दिसून येते आणि ते मनोरंजक व बोधप्रद आहे यात शंका नाही.

खांसाहेबांनी स्वतःविषयीच जे काही सांगितले त्याची परिस्थिती अगदी वेगळी आहे. जुन्या पिढीतील लोकांबद्दल बोलताना ते भावनावश होऊन रसभरित हकीकती सांगतात. त्याच्या उलट प्रकार स्वतःसंबंधी बोलताना. येथे वस्तुस्थितीपेक्षा कमीच सांगण्याची प्रवृत्ती. खांसाहेबांच्या इतर गुणांत हा मितस्थपणा ही एक भरच. पण या कारणाने त्यांचे व्यक्तित्व जेवढे प्रकाशात यायला हवे होते तेवढे आले नसावे असे वाटल्यावाचून राहवत नाही.

चरित्राचा दुसरा भाग (हाच मोठा आहे) लेखकाच्या स्वानुभवावर आधारलेला आहे. आपण खांसाहेबांचे 'निस्सीम भक्त', तेव्हा आपल्यावर अंधश्रद्धेचा आरोप होण्याचा संभव, म्हणून आपले हे काम एकंदरीने 'नाजूक व अवघड' अशा स्वरूपाची जाणीव लेखकाने (प्रकरण १) स्पष्टपणे प्रदर्शित केली आहे. अखेर काही कारणमीमांसा देऊन आपला हा 'डोळस भक्तिभाव' आहे 'अंधश्रद्धा नव्हे' असा निर्वाळाही दिला आहे.

गोविंदरावांची ही भूमिका दुसऱ्या अनेक कारणांनी मान्य केली पाहिजे. एकतर खांसाहेबांचे किंवा त्या घराण्याचे गोविंदराव हे शिष्य नव्हेत. तसे पाहिले तर गोविंदरावांना कोणी गुरू नव्हतेच. भास्करराव बखल्यांना ते गुरुस्थानी 'मानीत'; आणि बखल्यांनी अखेर खांसाहेबांचे शिष्यत्व पत्करले. म्हणजे खांसाहेब हे गोविंदरावांच्या मानलेल्या गुरूंचे गुरू. गोविंदरावांचे सांगीतिक चरित्र लक्षात घेता असे दिसते की आपल्या काळातील सर्व श्रेष्ठ कलावंतांच्या कलेवर त्यांचे प्रेम होते. त्यात ग्वाल्हेर, आग्रा, किराणा

या महत्वाच्या घराण्यांचे नायक तर आलेच. त्याखेरीज बर्कतुल्ला, मौजुद्दीन, गोहरजान असे इतर कलावंत व नाट्य सृष्टीतील भाऊराव कोल्हटकरांपासून कृष्णराव गोन्यांच्या पर्यंत समर्थ गायकही होते. या सर्वांच्याबद्दल गोविंरावांना कमीअधिक आकर्षण वाटत होते याची साक्ष त्यांचे 'संगीत व्यासंग' हे पुस्तक स्पष्ट रीतीने देते. आणि हे आकर्षण एका सामान्य रसिकास नव्हे; तर संगीताची चतुरस्र माहिती व सौंदर्यदृष्टी असलेल्या आणि हार्मोनियम वादनाचा 'बादशहा' ठरलेल्या अशा असाधारण श्रेष्ठ कलावंतास वाटत होते. आणि हा कलावंत नुसता कलावंतच नव्हे तर सुविद्य, चोखंदळ, समीक्षक व श्रेष्ठ साहित्यिक म्हणूनही मान्यता पावलेला. अशा व्यक्तीने खांसाहेबांना सर्वश्रेष्ठ गायन महर्षी ठरवावे हा केवळ श्रद्धेचा प्रश्न मुळीच नव्हता. खांसाहेबांकडे तसे अवर्णनीय, अनन्यसाधारण व जबरदस्त गुण होते म्हणूनच गोविंदरावांनी खांसाहेबांना ते महत्त्व दिले ही गोष्ट निर्विवाद होय. शिवाय या सर्व चरित्रनिरूपणात स्वतः अनेक घटनांना साक्षीदार असूनदेखील त्यांच्या लेखनात कुठेही 'मी' चा सूर प्रकटलेला नाही. एका कलावंताने दुसऱ्या श्रेष्ठ अशा कलावंताचे लिहिलेले हे चरित्र म्हणजे मंगळग्रहाने अधिक तेजःपुंज अशा शुक्राचे केलेले गुणगानच होय!

असे असूनही गोविंदरावांनी आपल्या निष्कर्षास पोषक असे दाखले दिले आहेत. अनेक श्रेष्ठ गुरूंच्याकडे तालीम घेतलेले भास्करराव हे अखेर खांसाहेबांचे शिष्यत्व पत्करण्यात धन्यता मानतात; "भैय्या तुम्हारा गला जाता है वहां हमारी नजर भी नहीं जाती" असे प्रशंसोद्गार बडे नत्थनखां काढतात; बॅरिस्टर जयकर खांसाहेबांना गायनातले 'गौरीशंकर' ठरवितात; खांसाहेबांच्या शिष्या केसरबाई याही सर्वश्रेष्ठ, म्हणजे खांसाहेब 'गौरीशंकर' तर केसरबाई 'कांचनगंगा' म्हणावे अशा श्रेष्ठ ठरतात– अशा तऱ्हेचे पोषक दाखले गोविंदरावांनी दिले आहेत. त्यात वझेबुवा हे खांसाहेबांना 'गवयांचा गवई' (poets' poet या धर्तीवर) म्हणत असत ही एक मी भर घालतो. तात्पर्य, गोविंदरावांचे विवेचन, वर्णन व निष्कर्ष हे भावनेच्या किंवा भक्तीच्या पोटी नव्हते असे निश्चित मानायला हवे.

गोविंदरावांनी खांसाहेबांना 'गायन महर्षी' अशी बिरुदावली लावली ती विचारपूर्वक होय. गायन कलेतील श्रेष्ठता दर्शविण्यास पंडित, गायनाचार्य, गायनसम्राट अशा पदव्या त्या वेळी प्रचलित होत्याच. पण खांसाहेबांच्या बाबतीत त्या अपुऱ्या वाटू लागल्या. कलावंत म्हटला की दुर्दैवाने त्याच्या अंगी काही दुर्गुण आणि विशेषतः व्यसनाधीनता सर्वसाधारणतः आढळून येई. खांसाहेब त्याला सन्माननीय अपवाद होते. त्यांचा रुबाब, धीरगंभीर वृत्ती, अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा, स्थितप्रज्ञता आणि व्यसनातीत वृत्ती असे जे गोविंदरावांनी खांसाहेबांचे वर्णन केले आहे (प्रकरण ९) ते लक्षणीय आहे. कलावंत म्हणून अचाट तपश्चर्या व त्याचबरोबर व्यक्ती म्हणूनही आदर्श असे गुण क्वचितच एकवटून येतात. अशा महाभागास 'गायन महर्षी' ही सार्थ उपमा गोविंदरावांनी द्यावी यात नवल नाही.

गोविंदरावांनी खांसाहेबांच्या गायकीचे जे वर्णन केले आहे तो माझ्या दृष्टीने या चरित्रातील सर्वांगसुंदर भाग होय. त्याचा परामर्ष मला पुढे घ्यावयाचाच आहे. त्या पूर्वी खांसाहेबांच्या काही मतांविषयी आणि अनुषंगाने त्यांच्या गायकीविषयी काही प्रश्न उपस्थित होतात; त्यांचा विचार करणे प्रस्तुत वाटते.

नोटेशन, संगीताची पुस्तके, ग्रामोफोन, रेडियो, टेपरेकॉर्डिंग अशी संगीत-शिक्षण व प्रसार यांची आधुनिक साधने व तंत्रे आहेत. त्यांविषयी खांसाहेबांचे विचार मधूनमधून प्रदर्शित झाले आहेत. खांसाहेबांच्या वेळी गुरुशिष्यपरंपरा ही एकमेव संगीत शिक्षणाची पद्धत रूढ होती. वर उल्लेखलेली साधने आणि तंत्रे ही चालू शतकात हळूहळू उपलब्ध होत गेली आहेत. ही परिणामकारक ठरू लागली तेव्हा खांसाहेबांनी साधारणतः पंचाहत्तरी ओलांडली होती. संगीताच्या शाळांचा प्रादुर्भाव व त्यातून बाहेर पडणारे असंख्य विद्यार्थी यांचे सामाजिक व संगीत प्रसाराच्या दृष्टीने कितीही महत्व असले तरी खांसाहेबांसारख्या अत्युच्च पातळीवर वावरणाऱ्या व्यक्तीस ते पटावे हे कठीणच होते. कारण त्यांच्या दृष्टीने हे संगीतशिक्षण संगीताच्या साक्षरतेच्याच दर्जाचे. तेव्हा खांसाहेब आधुनिक विचारसरणीशी समरस होऊ शकले नाहीत यात आश्चर्य काहीच नाही. प्रश्न मात्र राहतो की गोविंदराव हे या नवीन तंत्रास व पद्धतीस सुपरिचित असता त्यांनी खांसाहेबांच्या विचारांचे समर्थन करण्याचा प्रयत्न का करावा? त्यांनी दोन्ही बाजू मांडायला हव्या होत्या असे म्हटल्याशिवाय राहवत नाही.

खांसाहेबांची गायकी एवढी श्रेष्ठ; पण ती समाजात व्हावी तशी लोकप्रिय झाली नाही. लोकप्रियता तर सोडाच पण त्यांच्या गायकीची यथार्थ व सांगोपांग रीतीने आठवण करून देईल अशी शिष्यपरंपराही निर्माण झाली नाही. ही खंत "बाबा, आमच्या घराण्यातून सरस्वतीने आपले पाऊल बाहेर काढले" अशा शब्दांत खुद्द खांसाहेब वेळोवेळी प्रदर्शित करीत. खांसाहेबांच्या विद्येच्या वारसदारांची भलीमोठी नामावली (प्रकरण १०) गोविंदराव देत असूनही अखेर ते निष्कर्ष मात्र काढतात की खांसाहेबांनी भगीरथ प्रयत्नाने आणलेली ही 'गायनगंगा' सरस्वती नदीप्रमाणे मुंबईच्या भूमीत अल्लादियाखांसाहेबांच्या बरोबरच अदृश्य झाली (प्रकरण १).

असे का व्हावे हा प्रश्न गोविंरावांनी उपस्थित केला नाही. अर्थात् त्याचे उत्तरही चरित्र ग्रंथात स्पष्टपणे मिळणार नाही. पण खांसाहेबांच्या घराण्याबद्दल व गायकीबद्दल अशा तऱ्हेचे प्रश्न सर्वसाधारणपणे चर्चिले गेले व जातात म्हणून त्याविषयी काही विचार प्रदर्शित करावेत असे मला वाटते.

खांसाहेबांची 'अवघड व फकड' अशी गायकीच माझ्या मते या समस्यांना कारणीभूत झाली आहे. खांसाहेब अधिकतर अनवट राग गात असत. साधे भूप-यमन असे राग जरी गायिले तरी ते अशा तरकीबीने गायिले जात आणि त्यांची मांडणी (presentation) अशी काही असे की तज्ञांनाही त्याविषयी संभ्रम निर्माण व्हावा. आणि ही गोष्ट प्रथम प्रथम झाली. एवढेच नसून त्यांचे या भागात पन्नास वर्षे वास्तव्य

झाले, तरी परिस्थिती तशीच राहिली. ही गोष्ट १९४४ मध्ये विक्रमादित्य महोत्सव झाला त्या वेळीही घडल्याचे गोविंदराव लिहितात. त्या वेळी 'रामकली' हा सुपरिचित राग खांसाहेब स्वतः गायिले. पण तो राग कोणता असे एका प्रसिद्ध तंतकाराने खुद्द खांसाहेबांनाच विचारले (प्रकरण ९).

अनोखे राग किंवा प्रचलित रागांची अनोखी मांडणी एवढाच अवघड भाग खांसाहेबांच्या गायकीत होता असे नाही. त्याहूनही महत्वाचा भाग म्हणजे त्यांनी एकंदरीने आपली गायकीच अशी काही अवघड बनविली होती की त्याचे यथार्थ अनुकरण वर्षानुवर्षे त्यांच्यापुढे बसून तालीम घेणाऱ्यांनाही दुरापास्त व्हावे. आमलेटा संस्थानात काही दुर्दैवी प्रकार घडल्यामुळे त्यांचा आवाज चांगला दोन वर्षे बसला. तो पुढे पूर्ववत केव्हा झालाच नाही. म्हणून त्यांना स्वरालापनाचे अंग बाजूला ठेवून केवळ बुद्धीची करामत आणि विद्येचा संचय यांच्या आधारावर अवलंबून राहावे लागले. आवाजातील तासीरीची उणीव त्यांना नव्यानव्या वेलपत्तींनी भरून काढावी लागली... गायकीची एक स्वतंत्र जातच त्यांनी निर्माण केली (प्रकरण ५). अशी बुद्धिप्रधान, चाकोरीबाहेरची खास स्वतःकरताच तयार केलेली गायकी अनुकरणास अवघड, नव्हे अशक्य व्हावी यात आश्चर्य काय!

खांसाहेबांचे खुद्द धाकटे बंधू हैदरखां यांच्या दोन आठवणी या संबंधात नमूद करणे जरूर आहे. ते म्हणायचे, "खांसाहेब म्हणजे आमच्या घराण्यात सूर्य जन्माला आला आहे. आमची तालीम तीच, चिजा त्याच, कायदा तोच. पण त्यांच्या कल्पनांचा आणि करामतीचा मुकाबला करण्याची कुवत आमच्यापैकी एकामध्येही नाही" (प्रकरण १). हेच हैदरखांसाहेब माझ्याकडे एकदा अशाच प्रकारचे पण वेगळ्या तऱ्हेने बोलले. ते म्हणाले, "एखादी चीज सुरू झाली की हे आमचे बंधुराज आयत्या वेळी त्या रागाचे स्वरूप असे काही बदलत आणि सबंध चीजभर ते कायम ठेवीत की आमच्यासारख्या मागे बसून गाणाऱ्यांची पंचाईतच होऊन जायची."

या संदर्भात माझा आणखी एक अनुभव सांगण्यासारखा आहे. खांसाहेब मोगूबाईंना तालीम देत असताना तेथे बसण्याची संधी मला एकदा लाभली. 'सावनी कल्याण' मधील 'देव देव' ही चीज चालली होती. खांसाहेब फक्त तरतऱ्हेने अंगुलीनिर्देश करीत होते आणि त्यानुसार मोगूबाई वेगवेगळ्या घाटाच्या तानांची फेर झाडत होत्या. अशा तऱ्हेने १५–२० मिनिटे गेली आणि एकदाचे खांसाहेबांनी तोंड घातले व एका सबंध आवर्तनाचा सट्टा मारला. पण मोगूबाई तोपर्यंत घेत असलेल्या तानांची व खांसाहेबांनी घेतलेल्या या तानेची जात एकदम भिन्न होती. तोपर्यंत फक्त जोराचा पर्जन्य वर्षाव होता. पण आता वीज कडाडली असा भास झाला. आणि याहूनही विशेष हे की खांसाहेबांची ती फिरत सावनीकल्याण मधलीच होती की कसे हा संभ्रम मला पडला. येथे मला माझ्याविषयी मुद्दाम सांगणे जरूर आहे की या प्रसंगाच्या वेळी मला तो राग आणि त्या ताना सुपरिचित होत्या. कारण त्या पूर्वी नत्थनखां, भूर्जीखां व गोंदुबुवा शाळिग्राम म्हणजे

खांसाहेबांच्याच शिष्यशाखेकडून, अगदी अल्प का होईना मला तालीम मिळालेली होती. असे असूनही खांसाहेबांचा तो आविष्कार ऐकून मी गोंधळात पडलो. [मी मोठ्या गुरुजनांची नावे घेतली यावरून मला त्या घराण्याची काही गायकी लाभली असा गैरसमज होऊ नये. या सर्व तालमीचा परिणाम फार तर एवढाच झाला की ही गायकी आपल्याला न पेलण्यासारखी आहे हे समजून चुकले.]

यावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात. खांसाहेबांच्याकडे असाधारण प्रज्ञा व प्रचंड मेहनत होती. त्याचबरोबर प्रतिभेचा त्यांच्यावर वरदहस्त होता. या सर्वांच्या जोरावर त्यांनी आपली स्वतःची खास अशी चाकोरीबाहेरची गायकी बनवली होती. आणि हे लक्षात घेतले म्हणजे अनेक प्रश्नांचे उत्तर मिळते.

अशी खास गायकी आत्मकेंद्रितच राहणार. ती संपूर्णतया संक्रमित (transfer) होणार नाही. म्हणून खांसाहेबांची शिष्यशाखा असूनही त्यांच्या गायकीचे संपूर्ण प्रतिबिंब कोणातच दिसले नाही. रागाचे स्वरूप करामतीने व प्रतिभेने खांसाहेब लीलया बदलू शकत. यायोगे एका शिष्याला एक राग शिकविला तसाच तो दुसऱ्या शिष्याला शिकविला गेला नाही. काही रागांची नावेच सांगितली नाहीत; तर कधी कधी एकाच रागाची वेगवेगळी नावे सांगितली. याचे कारणही उघड आहे. त्यांच्याकडून काही नवीन राग निर्माणही झाले. पण स्वतःची बडेजावी मिरवण्याची त्यांना हौस नसल्याने त्यांनी त्याचें नामकरण करण्याचा प्रयास केला नाही. अशा तऱ्हेची शिष्यांनाही न पेलणारी गायकी ही रूढार्थाने लोकप्रिय झाली नसल्यास त्यात आश्चर्य ते काय ! खांसाहेब हे वझेबुवांनी म्हटल्याप्रमाणे 'गवयांचे गवई'. अशा गायकीकडे शेलके तज्ज्ञ रसिकच (selected few) आकर्षित होणार हे उघड होय.

प्रो. देवधरांनी 'थोर संगीतकार' या पुस्तकात खांसाहेबांवर एक लेख लिहिला आहे. त्या लेखात त्यांनी खांसाहेबांबद्दल काही 'प्रवाद' असल्याचा उल्लेख केला आहे. त्यापैकी काही माझ्या वरच्या विवेचनात आले आहेत. खांसाहेबांची गायकी (आणि त्यांच्या शिष्यशाखेचीही) आलापप्रधान नव्हती अशी एक तक्रार त्यात आहे. एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की खांसाहेबांना पुण्यामुंबईकडील लोकांनी ऐकले ते खांसाहेबांची पंचाहत्तरी ओलांडून गेल्यानंतर. या वेळी त्यांच्या आवाजात कंप आला होता आणि आलापन करणे त्यांना मुष्कील जात होते. दुसरे एक महत्त्वाचे कारण असे की, या घराण्यात अधिकतर अनवट रागच गायची प्रथा. अशा रागात इतर संपूर्ण रागांसारखी अनिर्बंध आलापी करता येत नाही. आणि हेही खरे की इतर घराण्यांपेक्षा या घराण्याची आलापाची जातच मुळी वेगळी. आलापीमध्ये लयीची जाणीव सतत ठेवायचे तंत्र बाळगल्याने हा फरक पडतो. म्हणून या घराण्याचे गाणे तानप्रधान व तालप्रधान असे ठरले यात शंका नाही. पण विसाव्या शतकातील पहिल्या २०-२५ वर्षांत म्हणजे खांसाहेबांच्या उमेदीत ज्यांनी त्यांची गाणी ऐकली त्यांनी खांसाहेबांची आलापीही ऐकली आहे. गोविंदराव तसे म्हणतातच. मलाही त्या पिढीतल्या लोकांनी तसेच सांगितले आहे. पुढे खांसाहेबांची

आलापी कमी झाली आणि पुढील शिष्यांवर तोच परिणाम झाला हा भाग वेगळा.

पण १९३५--३६ च्या सुमारास सांगलीस शेठ बापूभाई शहा यांच्याकडे काफी कानड्यातील 'सुखकर आयी' ही चीज खांसाहेबांनी गायिलेली मला आजही चांगली स्मरते. त्या दिवशी त्या रागिणीतील त्यांनी केलेली आलापी आणि खेळवलेले बोल इतके मुलायम व अभिनव होते की वाटले, हा जणू ठुमरी गायनाचाच प्रकार! अर्थात आलापी ऐकण्याचा हा योग एकदाच आला. केसरबाईंच्या तोंडून १९४०–४१ च्या सुमारास एका संध्याकाळी भीमपलास हा प्रचारातील राग मी ऐकला. तेव्हा त्यांनी त्या रागात इतक्या विविधतेने आलापी केली की 'वाहवा' द्यायला नीट उसंतही राहिली नाही. पण हा सुद्धा अनुभव एकदाच. म्हणून या घराण्याची गायकी तालप्रधान आलापीची, अधिकतर समृद्ध अशा तानांची हेच म्हणणे वाजवी होय.

प्रो० देवधरांच्या त्या लेखात आणखी एक प्रश्न उपस्थित झाला आहे. खांसाहेबांचे घराणे हे जयपूरचे घराणे असे म्हटले जाते. पण पं. भातखंडे यांच्या संशोधनाप्रमाणे खांसाहेबांचे गानपूर्वज हे अधिकतर ग्वाल्हेरच्या घराण्यासारखी गायकी गात होते. खांसाहेबांनी जी गायकी महाराष्ट्रात प्रसृत केली त्याचे जनक खुद्द खांसाहेबच होत. आमलेटा संस्थानातील दुर्दैवी प्रकारानंतर खांसाहेबांना आपल्या मूळ गायकीला बगल द्यावी लागली व स्वतःचीच एक स्वतंत्र अशी गायकी निर्माण करावी लागली. याचा उल्लेख या चरित्रात आलाच आहे. मीही त्याचा उहापोह वर केला आहे. पण खांसाहेब तसे कबूल करीत नसत अशी पं. भातखंडे यांची तक्रार होती. तसे कबूल करण्यात पूर्वजांकडे कमीपणा येतो व आपली प्रौढी दिसते अशी खांसाहेबांची भूमिका होती असे समर्थन कु. लिलताई शिरगावकर यांच्या भगिनी कुंदाताई यांनी एका लेखात अलिकडे केले आहे. यावरून खांसाहेबांच्या घराण्यास 'जयपूरचे घराणे' असे न म्हणता 'अल्ला-दियाखांचे घराणे' असे म्हणावे लागेल. संशोधकांनी त्यासंबंधी अधिक विचार करावा.

गोविंदरावांनी खांसाहेबांच्या गायकीचे समर्पक आणि चपखल अशा शब्दांत जे तपशीलवार वर्णन केले आहे तिकडे वाचकांचे विशेष लक्ष मी वेधू इच्छितो. संगीत हे समर्थपणे शब्दांकित करण्याचे पहिले श्रेय गोविंदरावांच्याकडेच जाते. त्यानंतरही त्यांना याबाबतीत कोणी मागे टाकले आहे असे वाटत नाही. म्हणून गोविंदरावांनी केलेले वर्णन येथे उद्धृत करण्याचा मोह होतो. तानबाजी हे खांसाहेबांचे वैशिष्ट्य. त्यासंबंधी गोविंदराव म्हणतात, "उत्तरोत्तर अधिकाधिक परीघ व्यापणाऱ्या व बलपेचांनी समृद्ध अशा तानांची फेक सुरू झाली म्हणजे श्रोत्यांना आपला श्वास रोखावा असे वाटे. नाहीपेक्षा त्या तानेच्या विराट आकृतीचे सम्यक् स्वरूप आकलन होणेच कठीण!" खांसाहेबांची बोलतान म्हणजे 'त्या त्या रागातील नवीन बांधणीची एक सुंदर चीजच बनत असे.' एरव्ही बोलतान म्हणजे शब्दांची मोडतोड व पुनरुक्ती हा अनुभव येतो.

तेव्हा खांसाहेबांच्या बोलतानेचे हे केवढे सुंदर स्वरूप! खांसाहेबांच्या "विशेष वाणीची खूण म्हणजे गमक, जी सुरवातीपासूनच प्रतीत होई. बोल असो, बोलतान असो, की आलाप असोत त्यात गमकेचा डोल हा असायचाच; फार काय, त्यांच्या तयारीच्या तानपलट्यातून देखील गमकेचा सूक्ष्म धागा गोविलेला असे." लयबद्ध गायन हे खांसाहेबांच्या गायकीचे आणखी एक वैशिष्ट्य. त्याबद्दल गोविंदराव म्हणतात, "तज्ज्ञ श्रोत्यांइतकीच अज्ञ श्रोत्यांवर देखील ही गाण्याची मोहिनी दीर्घकाल पडण्याचे मुख्य कारण म्हणजे त्यांच्या गायनातील अखंड, अक्षय आणि सर्वांना बद्ध करणारे असे लयीचे सूत्र." अखेर चिजेचे तोंड जेव्हा समेला येई त्या वेळेचे वर्णन करताना तर गोविंदरावांनी शब्दांची अगदी काव्यमय उधळणच केली आहे. ती सर्वच मुळातून वाचावी. संगीतात अखेर समेला येणे ही तर नित्याचीच बाब आहे. सर्वांनाच समेवर हे यावे लागतेच. पण खांसाहेब समेवर येत तो एक अपूर्व असा अनुभव असे. त्याचे समर्पक वर्णन करणे माझ्या शक्तीबाहेर आहे. पण त्यासंबंधीचे एक दृश्य माझ्या डोळ्यापुढे आजही स्पष्ट उभे राहते. राजाराम कॉलेज हॉलमधली ती बैठक! प्रेक्षक खुर्च्यांवर बसलेले होते. खांसाहेब समेवर येत तेव्हा एखाद्या 'महाजना'चे स्वागत करावे तसे पुढील रांगेतील लोक उभे राहून समेला वाहवा देत होते! केवढा त्या समेचा प्रचंड परिणाम!

या चरित्रात काही उणिवा राहिल्याचा उल्लेख मी सुरवातीला केलाच आहे. गोविंदरावांना लिखित आधार काही मिळालेला नव्हता. पन्नास वर्षांच्या दीर्घ कालात घडलेले प्रसंग व पन्नास वर्षभर मधूनमधून ऐकत आलेल्या हकीकती या सर्वांचे स्मरण करून चरित्राची त्यांना जुळणी करावी लागली. अशा अपुऱ्या व अनिश्चित आधारावर असाधारण श्रेष्ठ अशा कलावंताचे सांगोपांग चित्र उभे करायचे ही गोष्ट सामान्य नव्हती. गोविंदराव हे स्वतःही मोठे कलावंत आणि तसेच चांगले साहित्यिक, म्हणूनच हे त्यांना शक्य झाले यात शंका नाही. आणि याबद्दल संगीत-सृष्टीने गोविंदरावांना कायम दुवा दिला पाहिजे.

आता फक्त ऋणनिर्देशाचे काम राहिले. या दृष्टीने प्रथमतः 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ' यांचा उल्लेख केला पाहिजे. कारण त्यांनी मनावर घेतले म्हणूनच सुधारित स्वरूपात हे चरित्र पुनर्मुद्रित होत आहे. तेव्हा मंडळाचे मनःपूर्वक आभार मानले पाहिजेत.

श्री. वामनराव देशपांडे यांनी हे पुस्तक व 'संगीत व्यासंग' यांचे पुनर्मुद्रण व्हायला पाहिजे या कल्पनेचा चिकाटीने पाठपुरावा केला. 'संगीत व्यासंग' या पुस्तकाबद्दल त्यांनी अनेक तऱ्हेने नवीन माहिती मिळवली व विस्तृत प्रस्तावना लिहिली. या पुस्तका-

बद्दलही त्यांनी खूप श्रम घेतले व सतत मार्गदर्शन केले. प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी या ग्रंथाच्या पुनर्मुद्रणास मोलाचे सहकार्य दिले.

डॉ. भा. रा. ढेकणे यांनी या दोन्ही पुस्तकांच्या प्रकाशनात वेळोवेळी विचारविनिमय केला; तऱ्हेतऱ्हेने साहाय्यही केले.

श्री. भाऊराव टेंबे व श्री. बाळासाहेब टेंबे (गोविंदरावांचे वारस) यांनी या पुनर्मुद्रणास विनाअट व विनामूल्य परवानगी दिली.

खांसाहेबांचे नातू अझिझुद्दीनखां आणि तसेच श्रीमती लीलाताई व कुंदाताई शिरगावकर यांनी आपल्या संग्रहातील बरीच दुर्मिळ छायाचित्रे उपलब्ध करून दिली. सौ. श्रुती काटकर (सडोलीकर) यांनी तानीबाई घोरपडे यांचे दुर्मिळ छायाचित्र उपलब्ध करून दिले. डॉ. श्रीरंग संगोराम (पुणे विद्यापीठ) यांनी मुद्रित-शोधनाचे कार्य केले.

मौज प्रेसने आपल्या लौकिकास साजेशी या पुस्तकाची छपाई केली.

या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

गंगावेस, कोल्हापूर बाबूराव जोशी



अल्लादियाखांसाहेब व गोविंदराव

[जन्म : १८५५] [जन्म : १८८१]

[मृत्यू : १९४६] [मृत्यू : १९५५]



खांसाहेब, बाबुलनाथ जवळच्या सर्व्हेअर बिल्डिंगमधील राहत्या घराजवळ



खांसाहेब अल्लादियाखां
[१८९५ सालापूर्वीचा]



खांसाहेब अल्लादियाखां



उनियारा (राजस्थान) येथील खांसाहेबांचे जन्मस्थान



बडेजी उर्फ खांसाहेब नसिरुद्दिनखां
[जन्म : १८८६]
[मृत्यू : १९७०]



खांसाहेब मंजीखां
[जन्म : १८८८]
[मृत्यू : १९३७]

भूर्जीखां
[जन्म : १८९०]
[मृत्यू : १९५०]

खांसाहेब अल्लादियाखां

अजीजखां (नातू)
[जन्म : १९२१]



रूपावाडी ठाकुरद्वार, येथील
खांसाहेबांची कबर





कोल्हापूर
येथील
खांसाहेबांचा पुतळा

८५

راگنی رام ساکھ دھرپد تال چوتالہ
پرتھم ناد سر سادھیں وہی گنی جاکی سدھ مدرا سدھ گائے
انترا درت مدھ بلمپت کر کے دکھائے
سپت سر تین گرام اکیسن مورچھن
بائیس سرتی کے بیورے بکھانے ٭

रागनी- रामकंसाख ध्रुपद
ताल चौताला
प्रथम नाद सूर साधें वोही गुनी जाकी
सुद मुद्रा सुद गायें।
अंतरा- द्रुत मध्य बिलंपत कर के दिखाए
सप्तसूर तीन ग्राम इक्कीसन मूरछन
बाईस श्रुतीके बिवरे बखाने॥

الله دیہ

खांसाहेबांचे हस्ताक्षर



हैदरखां साहेब
[जन्म : १८६५]
[मृत्यू : १९३७]



**नत्थनखां**

[जन्म : १८८९]

[मृत्यू : १९४६]



**तानीबाई घोरपडे**

[जन्म : १८७६]

[मृत्यू : १९३१]



भास्करबुवा बखले
[जन्म : १८६९]
[मृत्यू : १९२२]



गोविंदबुवा शालिग्राम
[जन्म : १८९८]
[मृत्यू : १९६५]



केसरबाई केरकर

[जन्म : १८९२] : [मृत्यू : १९७७]



[जन्म : १९०४] मोगूबाई कुर्डीकर



लक्ष्मीबाई जाधव
[जन्म : १९०१]
[मृत्यू : १९६५]



शंकरराव सरनाईक
[जन्म : १८९२]
[मृत्यू : १९७१]



त्रिभुवनदास जरीवाला
[सन उपलब्ध नाहीत]



गुलूभाई जस्दनवाला
[जन्म : १९०६]
[मृत्यू : १९८०]



लीलाबाई शिरगांवकर
[जन्म : १९१५]



सुशिलाराणी पटेल
[जन्म : १९१९]



वामनराव सडोलीकर [जन्म : १९०७]



मल्लिकार्जून मन्सूर
[जन्म : १९१०]



निवृत्तीबुवा सरनाईक
[जन्म : १९१२]

# १. उपोद्घात

## गायनाचे गौरीशंकर

गायनमहर्षी, मरहूम अल्लादियाखांसाहेब यांच्या अतुलनीय गायन कलेविषयीचे व संगीतज्ञानभांडाराचे वर्णन नामदार डॉक्टर बाबासाहेब जयकर यांनी "खांसाहेब हे गायनाचे 'गौरीशंकर' होते" असे अनेक प्रसंगी केले आहे. नामदार जयकर संगीतकला–मर्मज्ञ आणि आजीव संगीतकलाव्यासंगी असे अत्यंत रसिक पुरुष आहेत. राजकारण आणि न्यायदान या दोन्ही क्षेत्रांत त्यांचे स्थान अत्युच्च दर्जाचे आहे, हे जगजाहीर आहे. अर्थात त्यांचा प्रत्येक निर्णय उलटसुलट सर्व बाजू तावूनसुलाखून व तराजूत तोलूनच दिला जातो. अशा जगप्रसिद्ध न्यायमूर्तीने 'गायनाचे गौरीशंकर' अशी हिमालयाच्या उच्चतम शिखराची पदवी ज्यांना अर्पण केली त्या गायनमहर्षी अल्लादियाखांसाहेब यांच्या कलेचे व ज्ञानाचे यापेक्षा अधिक समर्पक, ललित व भावपूर्ण वर्णन करणे अशक्य आहे. तेव्हा त्यांच्या कलेचे विश्लेषण किंवा वर्णन करण्याचा कठीण प्रयास कोणी केला तर तो कितीसा यशस्वी होईल हे सांगवत नाही. 'गौरीशंकरा'च्या शिखरावर पोहोचलेली दुसरी एखादी विभूतीच हा विक्रम करू शकेल. चालू जमान्यात तरी अशी व्यक्ती उपलब्ध नाही. तथापि, पर्वत चढून जाण्याची अंगी कुवत नसली तरी निदान पायथ्याच्या प्रदेशावरून त्या उत्तुंग शैलाची अवर्णनीय, भव्य व उदात्त शोभा पाहताना जो आनंद आपल्याला व समकालीन श्रोत्यांना मिळाला त्याची पुढील पिढीला थोडी तरी कल्पना देण्याचा मोह आवरत नाही; आणि या मोहाने केलेल्या या प्रयासाकडे रसिक वाचक तशाच दृष्टीने पाहतील अशी आशा आहे.

प्रस्तुत लेखकाने अल्लादियासाहेबांचे गायन सन १९०० च्या सुमारास ऐकले आणि तेव्हापासून खांसाहेबांच्या कलावैभवाचा उत्तरोत्तर जो त्याला अनुभव येत गेला तो तो त्याची खांसाहेबांविषयीची आदरभावना एकसारखी वृद्धिंगतच होत गेली. पुढे पुढे तर काही लोकांकडून या भावनेला अंध-भक्ती असे संबोधण्यात येऊ लागले ! पण अंतःकरणात दृढमूल झालेली भावना लोकांच्या उपहासामुळे थोडीच दबली जाते ? मना-मधील गुप्त आदराचे पर्यवसान काही काळाने खांसाहेबांचा परिचय करून घेण्यात झाले. लेखकापेक्षा खांसाहेबांचे वय पंचवीस वर्षांनी अधिक, तेव्हा त्याच्या परिचयाचे त्यांना

महत्त्व ते काय वाटणार! कोल्हापुरातील त्या वेळचे मिरासदार गायकवादक खांसाहेबांच्या गुणांची व विद्येची पारख किंवा कदर न करणारे असेच भेटल्यामुळे हा एक तरी तरुण आपला भक्त कसा बनला याचे त्यांना फार आश्चर्य व कौतुक वाटले असेल. पुढे गु. भास्करराव बखले यांची लेखकासंबंधीची अलोट आत्मीयता जेव्हा खांसाहेबांच्या प्रत्ययास येऊ लागली तेव्हा एका प्रसंगी "गोविंदरावजी! जैसे भास्करराव वैसे तुम भी हमारे हैं" असे उद्‌गार त्यांच्या मुखातून निघाले आणि तो क्षण प्रस्तुत लेखकाला महापर्वणीप्रमाणे धन्यतेचा वाटला! तेव्हांपासून भास्करबुवांच्या बरोबर भेटल्यावेळी व अनेक निरनिराळ्या प्रसंगी खांसाहेबांचे जे विचार व जी मते आणि हकीकती ऐकण्याचे भाग्य लेखकाला लाभले त्याचा समावेश प्रस्तुत चरित्रामध्ये अनुषंगाने करण्याचा उपक्रम केला आहे. तसेच खांसाहेबांचे अत्यंत प्रेमळ बंधू हैदरखां यांनीदेखील अत्यंत आत्मीयतेने सांगितलेल्या पूर्वकालीन कलावानांच्या ज्या हकीकती प्रस्तुत चरित्रनायकाच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश पाडणाऱ्या अशा वाटल्या तेवढ्यांचा समावेश केला आहे. शिवाय गु. भास्करराव व इतर निकटवर्ती व्यक्तींच्या तोंडून निरनिराळ्या बऱ्याच आठवणी प्रत्यक्ष ऐकल्या होत्या त्यांपैकी काही निवडल्या आहेत.

## स्मृतिचिन्हांचा अभाव

साहित्यक्षेत्रातील सम्राटपद साहित्यसम्राटाच्या पश्चात हजारो वर्षे प्रभाव गाजवीत राहते. मोठमोठे चित्रकार, शिल्पकार यांच्या कलाविशेषांची स्मारके त्यांच्यामागे शतकानुशतके राहू शकतात व जपून ठेवता येतात. त्यावरून त्यांच्या कलावैभवाचे अनेक भावी पिढ्यांना प्रात्यक्षिक मिळते. परंतु गायक व त्याची कला ही एकमेकाशी इतकी एकजीव झालेली असतात की गायकाच्या चितेवरच त्याची कला सहगमन करते. ध्वनिलेखनाच्या आधुनिक शोधामुळे गायनकलेच्या सहगमनाला आळा घालता येत असला तरी तिचे जिणे एखाद्या विधवेप्रमाणे निस्तेज व शुष्क वाटते. संगीतसम्राट अल्लादियाखांसाहेब यांच्या गायनाच्या ध्वनिलेखनाचादेखील योग न जमल्यामुळे त्यांची अतुलनीय गायनकला त्यांच्या बरोबरच दिवंगत झाली. खांसाहेबांच्या हयातीत ध्वनिलेखन सरसहा जारी असूनसुद्धा त्यांच्या गायनाचे मुद्रण झाले नाही, यामुळे सांगीतिकांना व रसिक श्रोत्यांना अत्यंत हळहळ वाटते. पण इलाज काय? खांसाहेबांच्या गुरुस्थानी असलेल्या अनेक पूर्वापार गायकांच्या जशा ध्वनिमुद्रिका नाहीत त्याप्रमाणे यांच्याही नाहीत, असा निराशेचा श्वास सोडून स्वस्थ बसणे भाग आहे!

करवीर इलाख्यातील बावडा संस्थानाचे जहागीरदार कै. श्रीमंत माधवराव पंतअमात्य यांनी सुमारे चाळीस वर्षांपूर्वी, मेणाच्या बांगड्यावर (सिलेंडर्स) अल्लादियाखांसाहेबांच्या काही चिजा घेतल्या होत्या—पण ही सर्व हकीकत पुढे थोड्या विस्ताराने चरित्रात आढळून येईल. आजमितीस त्यापैकी ऐकण्यासारखे असे स्मृतिचिन्ह काहीच शिल्लक नाही.

## चरित्राची साधनसामग्री

कलाकारांचे—विशेषतः गायकांचे—जीवन बहुधा आत्मानुवर्ती असते. कलावानां-व्यतिरिक्त इतर क्षेत्रांतील नामवंत किंवा मानवंत व्यक्तींशी त्यांचा घरोबा, दाट परिचय, संबंध किंवा जिव्हाळा क्वचितच असतो. गायक-वादकांच्या मेळाव्यात बसून आपले घराणे, आपली गायकी, आपला दर्जा, आपला बडेजाव ज्याने-त्याने सांगावा, वादविवाद करावा, जमल्यास झगडा-बखेडा माजवावा आणि पुन्हा गळ्यात गळा घालावा, अशा प्रकारचा आयुष्यक्रम त्यांच्या हाडीमाशी खिळलेला असतो. मैफल होईल त्या वेळी काय तो त्यांना इतर जनतेचा संपर्क लागणार आणि त्यातूनही फारच खूप झालेल्या श्रोत्यांचा क्वचित परिचय होणार. सारांश, संगीताचे मनस्वी वेड असलेले किंवा संगीत-व्यासंगी, आणि कलावान इत्यादिकांशीच काय तो त्यांचा थोडाफार ऋणानुबंध जडतो. सं. म. अल्लादियाखांसाहेबांचे जीवन मात्र या बाबतीत इतर गायकांपेक्षा बरेच भिन्न होते असे त्यांच्या चरित्रावरून दिसून येईल. अनेक राजेरजवाड्यांपासून तो सामान्य सुखवस्तू कुटुंबापर्यंत खांसाहेबांच्या ऋणानुबंधाचे जाळे पसरलेले होते. साहजिकच, प्रसंगपरत्वे त्यांनी आपली कुळकथा, जन्मकथा, विद्यार्थीदशा व पुढील जीवनक्रम वगैरें-संबंधी ज्या हकीकती व पूर्वजांच्या आठवणी अनेक स्नेही मंडळींना प्रसंगपरत्वे सांगितल्या व वेळोवेळी जे विचार प्रकट केले, त्यांच्या आधारावर या चरित्राची उभारणी झाली आहे. मात्र, खांसाहेबांच्या कोल्हापूर व मुंबई येथील वास्तव्याच्या पन्नास वर्षांतील बहुतेक घटना प्रस्तुत लेखकासमोर घडलेल्या आहेत, तेव्हा त्यामध्ये ऐकीव असा फारच थोडा भाग आहे.

अशा प्रकारच्या नानाविध आठवणी जशाच्या तशा जमेस घेऊन चरित्र लिहिणे हे मोठे नाजूक व अवघड काम होऊन बसते. त्यातून चरित्रलेखक चरित्रनायकाचा निस्सीम भक्त असेल तर हे कार्य अधिकच कठीण होते. खांसाहेबांनी सांगितलेल्या आठवणींच्या सत्याबाबत संशय घेण्याचे धारिष्ट सहसा कोणी करणार नाही. कारण अनेकांपुढे त्याच त्या आठवणींची खांसाहेबांकडून पुनरुक्ती आणि खातरजमा होत असे. काही हकीकतीं-वरून व खांसाहेबांच्या व्यक्तिगत गुणवर्णनावरून प्रस्तुत लेखकावर अंधश्रद्धेचा आणि खांसाहेबांवर पर्यायाने आत्मश्लाघेचा आरोप करण्याचा मोह काही आत्मसंतुष्टांना आवरता येत नाही. परंतु खांसाहेबांचा सुदीर्घ व दाट परिचय असलेल्या अनेक व्यक्ती, त्यांच्या प्रसिद्धिपराङ्मुखतेची व आत्मश्लाघाविन्मुखतेची साक्ष देण्यास हयात आहेत; इतकेच नव्हे तर संगीताशी संबंध असलेल्या सर्व लोकांनाही तोच अनुभव आहे.

शिवाय, प्रस्तुत चरित्रलेखकाला अंधश्रद्धेच्या आरोपातून मुक्त करण्यास समर्थ असा खांसाहेबांच्या अंगीच मुळी अतुल गुणप्रभाव होता, याचीही प्रचिती अखिल हिंदुस्थाना-तील तज्ञ कलाकारांनी व मार्मिक श्रोत्यांनी अनेकवार घेतलेली आहे. आपल्या विशिष्ट व कलापूर्ण गायकीच्या व संगीतज्ञानाच्या बळावर खांसाहेबांनी जे उच्चतम आसन काबीज केले ते पन्नाससाठ वर्षांच्या प्रदीर्घ कालामध्ये कधीही डळमळले नाही; इतकेच काय

परंतु त्यांनी तयार केलेल्या श्रीमती केसरबाईसारख्या शिष्यिणीला जे गायिकांमध्ये श्रेष्ठतम स्थान त्यांनी प्राप्त करून दिले आहे, तेदेखील गेली पंचवीस वर्षे कायम आहे, याचा आज सर्वांना प्रत्यक्षच अनुभव आहे. शिष्यिणीच्या गायकीचा जर हा दर्जा, तर गुरुवर्यांचा गायनप्रभाव केवढा असला पाहिजे, हे सांगायला नको. मग अशा गायन-महर्षीविषयी जर कोणी अलोट श्रद्धा बाळगली तर ती अंधश्रद्धा कशी ठरेल? तात्पर्य, असीम संगीतविद्या, अतुल गायनकला, सुदीर्घ तपश्चर्या इत्यादी चरित्रनायकामधील विपुल गुणसमुच्चयामुळे दृढमूल झालेला, प्रस्तुत लेखकाचा हा डोळस भक्तिभाव आहे—अंधश्रद्धा नव्हे.

अल्लादियाखांसाहेब कोल्हापूर संस्थानात १८९५ च्या सुमारास नोकर झाले आणि त्यानंतर चारदोन वर्षांनी प्रस्तुत लेखकाचा व त्यांचा परिचय झाला, त्या वेळी खांसाहेबांचे वय अंदाजे ४५ वर्षांचे असेल. खांसाहेबांच्या अंतकालापर्यंत म्हणजे ४५–४६ वर्षे लेखकाचा ऋणानुबंध व आत्मीय भाव वृद्धिंगतच होत गेला. कोल्हापूर आणि मुंबई येथे त्यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धात झालेल्या घटनांचा प्रस्तुत लेखकाला प्रत्यक्षच परिचय आहे. त्यांच्या आयुष्याच्या पूर्वार्धातील हकीकती मात्र ऐकीवच म्हणजे खांसाहेबांनी व त्यांच्या आप्तेष्टांनी किंवा स्नेह्यांनी सांगितलेल्या अशा आहेत. त्यातल्या त्यात सुदैव एवढेच की, खांसाहेबांवरील असीम भक्तीमुळे त्यांच्या हकीकतींच्या, विचारांच्या व गायनाच्या मुद्रा लेखकाच्या स्मृतिपटलावर सखोल उमटलेल्या आहेत व संधी येईल तेथे श्रद्धादरभावनेने त्या सांगण्यात त्याला एक प्रकारची धन्यता वाटत आली आहे. प्रस्तुत चरित्रदेखील त्या भावनेचाच लेखी आविष्कार आहे.

प्रस्तुत चरित्रलेखनाबाबत जी मोठी अडचण आहे ती ही की, अल्लादियाखांसाहेब इतर बाबतीत जसे मितस्थ होते तसे ते भाषणातदेखील मितस्थ होते. प्रसंग पडला तरच ते आपले विचार किंवा आपले मनोगत बोलून दाखवीत. ऐकणाराची उत्कंठा पाहून ते पूर्वजांच्या हकीकती मोठ्या आवेशाने सांगत; तरीही त्या सांगताना वारसाहक्काचा अहंकारप्रदर्शक पाल्हाळ त्यात नसे. शिवाय स्वतःच्या कर्तबगारीच्या किंवा यशाच्या हकीकतींना तर ते शक्य तो संक्षेप देत किंवा बगल देत; किंबहुना स्वतःविषयीची भाषा अघळपघळ सांगत सुटणे हा खांसाहेबांचा स्वभावधर्मच नव्हता. जयपूर, जोधपूर दरबारात तर त्यांचे विलक्षण कौतुक होई. दक्षिणेतील व उत्तरेतील अनेक संस्थानिकांनी आणि ठिकठिकाणच्या कलावंतांनी त्यांच्या कलेचा गौरव कितीही केला असला तरी त्याचे वर्णन खांसाहेब स्वतः करीत नसत. तथापि पूर्वसूरींविषयीचा त्यांना वाटत असलेला अलोट आदर व गुरुजनांविषयीची सदैव वाटत असलेली कृतज्ञता या दोन भावनांमुळे त्यांच्या आठवणी सांगण्यात मात्र त्यांना संकोच वाटत नसे; कारण प्रत्येक आठवणीच्या मुळाशी वरील दोन भावनांची प्रेरणाच मुख्यत्वे दिसून येई. या त्यांच्या वृत्तीमुळे प्रस्तुत चरित्रात —विशेषतः पूर्वार्धात—त्यांच्या स्वतःच्या जीवनाचे दर्शन भरपूर मिळण्यास साधन नाही. असो.

खांसाहेबांनी पूर्वजांच्या व इतर कलावानांच्या ज्या गोष्टी सांगितल्या व श्रद्धापूर्वक ज्या पुनःपुन्हा ते सांगत, त्या आठवणी दंतकथेसारख्या वाटण्याचा संभव आहे. परंतु खुद्द खांसाहेबांची अतुलनीय योग्यता ज्यांना अंशतः पटलेली आहे त्यांना तरी खांसाहेबांनी केलेली वर्णने अतिशयोक्तीची किंवा दंतकथेसारखी खास वाटणार नाहीत. ताजमहालाचे परिपूर्ण सौंदर्य ज्यांनी प्रत्यक्ष पाहिले आहे त्यांना त्याच्या मुळाशी असलेली बादशहाची अतुल प्रेमभावना व शिल्पकाराचे अगाध कौशल्य कसे नाकारता येईल? खांसाहेबांच्या सखोल विद्येचा थांग त्यांच्या पुत्रांना, शिष्यांना किंवा कोणालाच लागला नाही. मग अशा विद्यासागराने ज्यांची ज्यांची विनम्रभावाने अंतःकरणपूर्वक प्रशंसा केली ते अर्थातच कल्पनातीत महान सांगीतिक विभूती असले पाहिजेत हे मानण्यास मोठेसे तर्कशास्त्र नको. पूर्वजांच्या कलावैभवाबाबत खांसाहेब जरी पराकाष्ठेचे श्रद्धाळू होते तरी त्यामुळेच ते स्वतःच्या कलाव्यासंगाच्या बाबतीत पराकाष्ठेचे कष्टाळू बनले, असाच या आठवणीवरून बोध होतो. आजकालच्या कलाजीवनात काय, किंवा इतर जीवनात काय, श्रद्धा व कष्टाळूपणा हे दोन्ही गुण आवश्यक किंवा आकर्षक समजले जात नाहीत. तथापि या दोन गुणांमुळे ज्या थोड्या व्यक्ती असामान्य योग्यतेला पोहोचल्याचे आपण ऐकतो त्यांपैकी अल्लादिया-खांसाहेब हे एक होऊन गेले यात संशय नाही.



# २. विद्यासंपादन व गायनकला

## घरची विद्या

महाराष्ट्राचे आद्य व महनीय गायक कै. बाळकृष्णबुवा, गु. कै. भास्करबुवा बखले, कै. रामकृष्णबुवा वझे इत्यादिकांच्या ज्या काही आठवणी उपलब्ध आहेत त्यावरून साधारणतः असे म्हणता येईल की, लहान वयात व अकिंचन परिस्थितीत गुरुसेवा करून त्यांनी गायनविद्या संपादन केली. परंतु अल्लादियाखांसाहेब किंवा त्या वेळचे उत्तरेकडील इतर गायक यांची परिस्थिती अगदी निराळी होती. उत्तर हिंदुस्थानात गायकवादकांची पूर्वापर घराणी चालत आली होती आणि त्यांपैकी एका नामवंत घराण्यात खांसाहेबांचा जन्म झाल्यामुळे गायनविद्येकरिता त्यांना घर सोडून कोठे जाण्याचे कारणच पडले नाही. वडील, आजोबा, काका, मामा, सर्वच पिढीजाद गायक! कोणापासून-कितीही विद्या संपादन केली तरी थोडीच. त्यातून अल्पवयातदेखील बुद्धीची असामान्य चमक दाखविणाऱ्या बेटा अल्लादियाखांला शिकवून तयार करण्याची स्वकीयांनाच काय, पण परकी घराण्यातील नामवंत उस्तादांनाही इच्छा झाली असली तर नवल नाही. परंतु वडील, चुलते, मामा वगैरेसारखे धुरंधर गायक घरी असताना इतर कोणाकडून गायन शिकण्याचे खांसाहेबांना प्रयोजनच नव्हते.

## संगीताचे सुवर्णयुग

सं. म. अल्लादियाखां यांच्या गायन-व्यासंगाच्या वयात उत्तर हिंदुस्थानामधील संगीत-कलामंदिरावर दिवाळीच्या रोषणाईचा संतत झगझगाट असे. जयपूर, उदेपूर, ग्वाल्हेर, जोधपूर, बुंदी, टोंक वगैरे लहानमोठ्या संस्थानांमध्ये शेकडो कलावानांची घराणी अत्यंत प्रतिष्ठेने पोसली जात होती. राजे-महाराजे यांना संगीतकलेची केवळ आवडच नव्हे, तर पराकाष्ठेची कदर होती. गायक-वादक यांना आश्रित म्हणून नव्हे तर संस्थानचे एक वैभव असे समजण्यात येई आणि त्या भावनेने त्यांची व त्यांच्या कलेची जोपासना करणे प्रत्येक संस्थानिकाला आपले कर्तव्य वाटे. अशा उत्तेजक परिस्थितीत निरनिराळ्या परंपरांचे अनेक गायक निर्माण होऊन प्रत्येकाची विशिष्ट वाणी कटाक्षाने पाळली जात असे. मातबर जमिनीत भरपूर मसाला-पाणी देऊन पोसविलेल्या निरनिराळ्या टपोऱ्या फुलांचे हे

ताटवे प्रत्येक राजधानीची शोभा वाढवीत होते. ज्याचा-त्याचा सुवास व डौल निरनिराळा. ज्याने-त्याने आपापली परंपरा सांभाळावी आणि गायनाची आपापली वाणी अभिमानाने राखावी असा प्रघात जारी असल्यामुळे, वाणीवाणीमध्ये श्रेष्ठ-कनिष्ठ भाव व त्याबाबत एकमेकांचा हेवादावा किंवा अवहेलना करणारे अनिष्ट प्रकार त्या काळी सहसा घडत नसत. प्रत्येक वाणीच्या गायकीचा रंग निराळा, रस निराळा! आणि या जाणिवेमुळे तुलना करून सरस-निरस ठरविण्याचा अनिष्ट हेतू धरूनच एकमेकांचे गायन वादन ऐकण्याची वृत्ती त्या काळात सहसा नसे. साहजिकच अशा प्रकारच्या रसग्राहक वृत्तीमुळे कलात्मक उच्च संगीताचा त्या काळी निरनिराळ्या दिशेने प्रसार होत गेला.

संगीत-साधना हीच आपली मिरास व खानदान हीच आपली प्रतिष्ठा; अहर्निश त्यातच निमग्न असायचे, अलोट परिश्रम करायचे आणि दर्जेदार कलावान म्हणून अभिमानाने मिरवायचे, असा उत्तरेकडील गायकवादकांचा पिढीजाद बाणा होता; व तो अद्यापि काही काही घराण्यांच्या वंशजांमध्ये बऱ्याच अंशाने आढळूनही येतो. त्या वेळच्या राजेरजवाड्यांनी व समाजाने त्यांचे कौतुक केले व त्याला उत्तेजनही दिले. महाराष्ट्रात मात्र त्या काळी गायनाचा षोक किंवा पेशा करणे हे विकृत बुद्धीचे द्योतक आणि कुलाच्या इभ्रतीला घातक, असे समजले जाई! याच्या उलट उत्तरेकडे आपल्या घराण्यातील संगीत–विद्येचा व्यासंग व व्यवसाय न करणाऱ्याला भिकेचे डोहाळे लागले असे समजत. या कारणाने आपल्या घराण्याचे व आपल्या खानदानीचे अस्तित्व व प्रतिष्ठा आपल्या संगीततपस्येवर अवलंबून आहे अशी त्या प्रत्येकाची श्रद्धा असे. इतर विद्या व उद्योगधंदे करण्याची त्यांच्यामध्ये पात्रता नव्हती असे नाही. पण त्यांना इतर विद्यांचे महत्त्वच वाटले नाही आणि साहजिकच तिकडे त्यांनी लक्ष दिले नाही. संगीतकलेची आपली पिढीजाद दौलत जतन करणे, तिच्यामध्ये भर घालणे आणि त्यातच जीवनाचे सारसर्वस्व मानणे ही त्यांची वृत्ती होती. अल्लादियाखांसाहेब हे वरील वृत्तीचे नमुनेदार प्रतीक होते. त्यांच्या या चरित्रग्रंथामध्ये त्यांनी लेखकाला व इतरांना सांगितलेल्या ज्या आठवणींचा व हकीकतींचा समावेश केला आहे त्यावरून वयाने व विद्येने खांसाहेबांनी गुरुस्थानी मानलेल्या गायक विभूतींच्या अगाध कलातपस्येची कल्पना येईल.

## 'संगीताचा सूर्य'

अल्लादियेखांसाहेब यांच्या स्वतःच्या व त्यांचे बंधू हैदरखां, तसेच भास्करबुवा, विठ्ठलदास आदि निकटवर्ती स्नेही मंडळींच्या तोंडून ज्या हकिगती लेखकाला ऐकण्यास मिळाल्या त्यावरून आणि त्यांच्या संगीततपस्येचा व अजस्र विद्येचा आणि कलाभांडाराचा जो सुमारे पन्नास वर्षे प्रत्यक्ष अनुभव घेतला त्यावरून असे म्हणता येईल की त्यांच्या व्यासंगाच्या वयात अलोट कौतुक व्हावे, प्रौढ वयात असामान्य लौकिक व्हावा आणि उतारवयात गायनमहर्षिपदावर ते कायमचे आरूढ व्हावेत असे सामर्थ्य त्यांच्या बुद्धीत जन्मजातच होते. शिवाय ईश्वरी संकेतही तसा होता असे दिसते. कारण उत्तर हिंदुस्थानी

संगीतकलेच्या अत्यंत वैभवाच्या, तपस्वी कलाकाराच्या आणि कदरदान राजेरजवाड्यांच्या जमान्यात ते जन्माला आले आणि त्यामुळे विद्यार्थीदशेत उत्कृष्ट शिक्षण आणि अनेक आदर्श त्यांना लाभले. बंधू हैदरखां वरचेवर म्हणत, "गोविंदरावजी, खांसाहेब म्हणजे आमच्या घराण्यात सूर्य जन्माला आला आहे. आमची तालीम तीच, चिजा त्याच, कायदा तोच—पण त्यांच्या कल्पनांचा आणि करामतीचा मुकाबला करण्याची कुवत आमच्यापैकी एकामध्येही नाही. त्यांची बुद्धी, त्यांच्या अचाट कल्पना आणि सोज्वळपणा यांचा आम्हाला अंदाज बांधता येत नाही. आम्ही त्यांचे भाऊ, एवढीच आमची बढाई! आम्हा सर्वांचे आयुष्य ईश्वर त्यांना देवो." आणि योगायोग असा की खरेच तसे झाले. अल्लादियाखांसाहेब सर्व बंधु-बांधवांपेक्षा दीर्घायू झाले!

अल्लादियाखांसाहेबांच्या गायकीचा प्रभाव फक्त महाराष्ट्रीय श्रोत्यांवरच पडला होता असे नाही. खांसाहेबांचे समकालीन आग्रा घराण्यातील संगीतकला-कोहिनूर कै. नत्थनखांसाहेब[1] यांना खांसाहेबांच्या योग्यतेबद्दल अलोट आदर वाटे आणि त्यांच्या इनसाफी अंतःकरणातून तो प्रसंगविशेषी उत्कटतेने प्रकट होई. असेच आदरपूर्वक उद्गार उत्तरेकडील अनेक कलावानांनी काढलेले लेखकाच्या कानावर आहेत. तुल्यबल व स्वतः गायनसम्राटपदावर आरूढ झालेल्या नत्थनखांसाहेबांच्या "भैय्या, तुम्हारा गला जाता है वहां हमारी नजर भी नहीं जाती" या उद्गारांवरून तर त्यांच्या जवानीच्या पूर्वार्धामध्येदेखील उत्तरेकडील गुणिजनांमध्ये त्यांचा तितकाच बोलबाला झाला होता, हे उघड आहे. सारांश, एखाद्या अद्भुत युवकासारखी (youthful prodigy) गायनप्रतिभा खांसाहेबांना लाभली असावी.

## भगीरथाची गायनगंगा

आयुष्याच्या उत्तरार्धाच्या सुरुवातीस म्हणजे अंदाजे वयाच्या ४५ व्या वर्षी खांसाहेब दक्षिणेत आले आणि सुमारे पन्नास वर्षेपर्यंत त्यांचे संगीतप्रदेशाच्या सिंहासनावरील आसन त्यांच्या अंतकालापर्यंत अढळ राहिले, हे कोणी अमान्य करू शकत नाही. कमी-अधिक दर्जाच्या साऱ्याच कलाकारांनी त्यांना करभार दिलेला आहे; ज्यांना ज्यांना त्यांचे गायन ऐकण्याचा योग आला ते ते त्यातील शास्त्रनैपुण्य आणि कलात्मक सौंदर्य पाहून स्तिमित होऊन राहिले. एवढेच काय, पण त्यांनी शिकवून तयार केलेल्या कै. तानीबाई[2] व श्रीमती केसरबाई केरकर यांसारख्या शिष्यिणींशी तुलना करण्याइतक्या योग्यतेची गायिका अद्यापि आढळली नाही. तसेच त्यांचे बंधू कै. हैदरखां, ज्यांनी अल्लादियाखांसाहेबांच्या

१. यांना बडे नत्थनखां असे पुढे म्हणण्यात येऊ लागले. कारण अल्लादियाखांच्या पुढील पिढीतील त्यांचे पुतणे यांचे नावही नत्थनखांच.

२. कोल्हापुरच्या तानीबाई घोरपडे. सिनेसृष्टीत पुढे चमकलेली बालनटी वासंती हिच्या तानीबाई ह्या आत्या होत. यांचा अधिक उल्लेख प्रकरण ६ मध्ये आला आहे.

बरोबर लक्ष्मणासारखे राहून बरीच विद्या संपादन केली, त्यांचे व नंतर खांसाहेबांची थोडी तालीम घेतलेल्या श्री. मोगूबाई कुर्डीकर यांचे संगीतक्षेत्रात फार प्रतिष्ठेचे स्थान समजले जाते. हैदरखांच्या दुसऱ्या शागीर्द लक्ष्मीबाई जाधव या तर दीर्घकाल बडोद्यास दरबार-गायिका होत्या. अल्लादियाखांसाहेबांचे मधले चिरंजीव गानसुंदर मंजीखां यांच्या अकाली निधनामुळे तर गायनकलेच्या अंतरिक्षातील शुक्राचा ताराच निखळून पडल्यासारखे रसिकांना वाटले. खांसाहेबांच्या वृद्धापकाळात निष्ठेने शिक्षण घेतलेली श्री. अनंतराव शिरगावकर इंजिनिअर यांची ज्येष्ठ कन्या कुमारी लीलूताई इची गणना नवोदित होतकरू गायिकांमध्ये केली जात आहे. मुंबईचे एक अत्यंत रसिक गुजराथी कै. श्री. जरीवाला यांनी खांसाहेबाकडून मोठ्या हौसेने केवळ ध्रुपद–धमाराची दीर्घकाल तालीम घेतली होती. त्यांच्या मृत्यूमुळे एक हौशी ध्रुपदिये तर नाहीसे झालेच पण खांसाहेबांच्या ध्रुपद–धमाराची गायकी ऐकविणारा कलावान कोणी राहिला नाही; कारण खांसाहेबांचे इतर सर्व शिष्य केवळ ख्यालाचीच गायकी शिकले. मुंबईचे एक बडे व्यापारी गुलुभाई जसदनवाला यांनी अनेक अनोख्या रागांतील शेकडो चिजा खांसाहेबांकडून कंठगत केल्या आहेत. तसेच कोल्हापुरचे गोविंदबुवा शाळिग्राम यांनी खांसाहेबांच्या आलापचारीची व शब्दोच्चाराची विशिष्ट पद्धती बरीचशी उचलली आहे. सारांश, खांसाहेबांच्या निरनिराळ्या शिष्यांनी आवडतील व झेपतील ते ते गुण त्यांच्या सर्वांगीण गायनकलेतून निवडून घेतले. खांसाहेबांचे बंधू हैदरखां आणि पुत्र मंजीखां आणि विशेषतः भूर्जीखां व पुतणे नत्थनखां यांनी अनेक शिष्य केले व हे शिष्यही विद्यादान करून ही गायनपरंपरा पुढे चालवीत आहेत. सारांश, उत्तरेकडून खांसाहेबांनी खेळवीत आणलेल्या त्यांच्या प्रचंड गानगंगेचे महाराष्ट्रात अनेक ठिकाणी कालवे व ओहळ आज वाहत आहेत. शिवाय या गंगाप्रवाहात जाता-येता भरून घेतलेल्या लहानमोठ्या गंगाजळ्यांची बहुतेक कलावानांच्या देवघरात स्थापना झालेली आहे असे मार्मिक श्रोत्यांना आढळून येईल. मात्र दुर्दैव असे की, अशा या भगीरथतुल्य गायनसम्राटाने आपल्या असीम तपश्चर्येच्या प्रतापाने महाराष्ट्रात आणलेल्या या प्रचंड गायनगंगेचा संपूर्ण झोत शिरावर झेलणारा असा त्यांच्या पुत्रांपैकी किंवा इतरांपैकी कोणी तपोनिष्ठ न भेटल्यामुळे ती गंगा सरस्वती नदीप्रमाणे मुंबईच्या भूमीत अल्लादियाखांसाहेबांच्या बरोबरच अदृश्य झाली.

अल्लादियाखांसाहेबांच्या गायनविद्येचे वर्णन यथार्थ रीतीने करण्यासाठी आमच्या पुराणांतील महान विभूतींची उपमा-उदाहरणे दिलेली पाहून काही वाचकांना आश्चर्य व काहींना कदाचित वैषम्य वाटण्याचा संभव आहे. परंतु खांसाहेबांचे मूळ पूर्वज उच्चवर्णीय हिंदू होते. खुद्द खांसाहेबांचे जीवन, त्यांची संस्कृती, त्यांची राहणी, विचारसरणी वगैरे हिंदूंनादेखील अनुकरणीय अशी होती. कोणता हिंदू संत कबीर मुसलमान म्हणून त्या विभूतीचा अनादर करील? रे. टिळक खिश्चन होते म्हणून त्यांची काव्यकला किंवा त्यांची संस्कृती हिंदू नव्हती असे कोण म्हणेल?

## कलावानांची दुनिया

ज्या कलावानांच्या दुनियेत अल्लादियाखांसाहेब वाढले ती दुनिया बाकीच्या व्यवहारी दुनियेपासून अगदी अलग होती; ती केवळ सांगीतिकांची दुनिया होती. संगीत हेच त्यांचे पराक्रमक्षेत्र; संगीताचाच त्यांना निदिध्यास; त्यांचे मानापमान, यशापयश, वादविवाद, जीवनहेतू व जीवितकार्य सर्वच संगीतमय. त्यांच्या बाणी, त्यांची घराणी, त्यांची परंपरा, त्यांची शागीर्दी—फार काय, पण बेटी-व्यवहार, मैफलीचे कायदे, गंडे-समारंभ, श्रेष्ठ-कनिष्ठ दर्जे, सर्व काही संगीतविषेशी संलग्न असायचे. बाहेरच्या दुनियेत काय चालले आहे, काय घडामोडी होत आहेत याची त्यांना पर्वा नसे व त्यांचे तिकडे लक्षही नसे. अशा संगीतमय दुनियेत नाव गाजविणारे तेच त्यांचे रथीमहारथी, तेच त्यांचे भीष्म-द्रोण, कर्णार्जुन आणि भगीरथ! ध्रुपद-धमाराच्या विशाल कड्यातील पोषक द्रव्ये कायम ठेवून ख्यालाच्या वनप्रदेशात ज्याने स्वरगंगेला लीलेने खेळविली आणि निर्मळ ठेवली, तो पुरुष संगीत-साम्राज्यामधील भगीरथच म्हटला पाहिजे. कोणाला 'संगीत भीष्माचार्य', कोणाला 'संगीत शार्दूल' इत्यादी पराक्रमाच्या द्योतक अशाच पदव्या बहुधा देण्यात येतात. उत्तरेकडील प्रसिद्ध गायकांच्या पदव्यादेखील प्रतापी योद्धयांना शोभणाऱ्या अशा असत. तेव्हा अल्लादियाखांसाहेबांना संगीत दुनियेतील भगीरथ म्हणण्यात वावगे असे काहीच नाही. त्यांची संगीत-तपस्या आजकाल कोणालाही न झेपणारी अशी जबरदस्त होती.

इतके सांगितल्यानंतर खांसाहेबांचे गायन कशा प्रकारचे होते हे जाणण्याची वाचकांना साहजिकच उत्सुकता वाटणार. पण प्रथमच कबूल केले आहे की गायनाची कल्पना लेखनाने करून देणे दुरापास्त आहे. ध्वनिमुद्रिकांमधून त्रोटक स्वरूप कळले असते. परंतु खांसाहेबांच्या ध्वनिमुद्रिका कोणी घेतल्या नाहीत. तथापि स्थूलमानाने का होईना, त्यांच्या गायनातील प्रमुख अंगांचे स्वरूप रेखाटण्याचा प्रयत्न केला तर त्यामध्ये स्वतःच्या कल्पनेची भर घालून वाचक समाधान मानून घेतील अशी आशा आहे.

## खांसाहेबांची गायनकला

कोणाच्याही गायनकलेचे वर्णन शब्दांनी करणे शक्य नसते. उपमा-अलंकारांनी ते वर्णन कितीही नटविले तरी वाचकांचे समाधान न होता, ते गायन ऐकण्याची त्यांच्या मनात विलक्षण आतुरता मात्र निर्माण होते. गायक हयात असेल तर केव्हातरी ती तृप्त होण्याचा संभव. पण खांसाहेब दिवंगत झाले. दुर्दैवाने ध्वनिमुद्रादेखील मागे ठेवून गेले नाहीत. तेव्हा शाब्दिक वर्णन कितीही केले तरी ते व्यर्थच होणार. तथापि ज्याप्रमाणे प्रवासामध्ये आपण पाहिलेल्या अजब स्मृतिमनोहर वस्तूचे व व्यक्तीचे वर्णन केल्यावाचून या प्रवासाची सांगता झालीसे आपल्याला व इतरांनाही वाटत नाही, त्याप्रमाणे खांसाहेबांच्या गायनाचे मोडकेतोडके तरी वर्णन केल्यावाचून प्रस्तुत ग्रंथाला सांगोपांगता येणार नाही. निदान त्याला या गालबोटाने शोभा तरी येईल! खांसाहेब सन १८९५ च्या

सुमारास कोल्हापुराचे दरबारी गायक झाल्यापासून तो त्यांच्या अंतकालापर्यंतच्या अवधीत प्रस्तुत चरित्रलेखकाला त्यांच्या अनेक मैफली ऐकण्याचे भाग्य लाभले होते आणि त्या आधारावरच खांसाहेबांच्या गायनाची स्थूलमानाने रूपरेषा रेखाटण्याचा हा प्रयास आहे.

खांसाहेबांच्या ऐन उमेदीत जी गाणी कोल्हापूर, गगनबावडा, मुंबई वगैरे ठिकाणी लेखकाने ऐकली त्यांपैकी एका मैफलीतील त्यांचे गायन, नमुना म्हणून घेऊ.

**बैठक** : त्या जमान्यात म्यूझिक सर्कल्सची किंवा थिएटरमध्ये जलसे करण्याची प्रथा निर्माण झाली नव्हती. त्यामुळे गायकाकरिता चबुतरा (स्टेज) मांडलेला नसे. गायक व श्रोते एकाच बैठकीवर व एकाच पातळीवर असत. गायकाकरिता एखादा गालिचा मात्र असे. श्रोतृसमाज फार तर शे-दोनशेच्या आतबाहेर असे आणि तोदेखील यजमानाच्या आमंत्रित मित्रांचा व परिचित अशा रसिक गृहस्थांचा आणि गायक-वादकांचा. गायन-वादनाचा विशेष शोक बाळगणारी अशी अनाहूत मंडळीही वगवशिल्याने आपला प्रवेश करून घेत असत हे सांगायला नकोच.

खांसाहेबांची गायनाच्या वेळेची बैठक म्हणजे आसनमांडी आणि ती अगदी शिथिल-गात्र अशी; तीत अवघडल्या-अडचणल्यासारखा संकोचही नसे किंवा व्यक्तिमत्त्वाची मुद्दाम जाणीव करून देणारे असे आढ्यतेचे ताठर वीरासनही नसे. मुद्रेवर हास्य नव्हे पण भरपूर प्रसन्नता दिसून येई, आणि त्यांच्या गलमिशा आणि फेट्यामुळे गांभीर्याची आणि प्रतिष्ठितपणाची त्यात भर पडे. अनेक राजेरजवाड्यांशी संबंध आल्यामुळे दरबारी संयम आणि सरावाचा निर्भयपणा या दोहोंचे मिश्रण त्यांच्या मुद्रेवर दिसून येई. खांसाहेबांच्या मागे तंबोरा घेऊन त्यांचे धाकटे बंधू हैदरखांसाहेब, डावे बाजूस 'चचा' एहमदखां किंवा क्वचित भास्करबुवा बखले दुसरा तंबोरा घेऊन शिष्याच्या आदरभावनेने बसत. किंचित पुढच्या एका बाजूला तबलिया असे. स्वराकरिता किंवा साथीकरिता हार्मोनियम, सारंगी अथवा इतर कोणतेही वाद्य त्यांनी कधी घेतले नाही. हैदरबक्षसारखे (अब्दुल करीमखांचे मामा) कोणी नामवंत सारंगिये एखादे वेळी हौसेने साथीला बसले तर मात्र त्यांना खांसाहेब नको म्हणत नसत इतकेच. पण असा योग अगदी क्वचित. त्यांची बलपेचाची गायकी, कमालीचा दमश्वास आणि पराकाष्ठेची संथ लय, इत्यादीमुळे साथीच्या वाद्याचा व्यत्यय मात्र येई आणि त्यांना त्याची एक निष्कारण उपाधी वाटे.

प्रथम, हैदरखां (बंधू) तंबोरे मिळवीत. दोन्ही तंबोरे तंतोतंत मिळाले म्हणजे खांसाहेब एकाग्रचित्ताने ते मिनिटभर ऐकत. खांसाहेबांना तंबोऱ्यांच्या जवारीत यत्किंचितही झार म्हणजे झरझरीतपणा अगदी खपत नसे. तार खुली वाजावी, पण त्यात गोलपणा असावा. तंबोरा मोठ्याने वाजावा म्हणून जाड सुताच्या जवारीचे झर्राट त्या वेळच्या दक्षिणेतील बहुतेक गायकांना चालत असे; पण खांसाहेबांना खर्जाच्या किंवा पंचमाच्या तारेच्या अनुरणनातदेखील धार, झर्राट किंवा काटेरी नोक खपत नसे. मनासारखे तंबोऱ्याचे व तबल्याचे साज जमले आणि एकदोन मिनिटांत स्वरेल वातावरण पसरले म्हणजे तबलजीला कोणता ताल व किती विलंबित लय हे हलकेच ते सांगत. हा ताल बहुधा अत्यंत धीमा

आडाचौताल असे. अशा तालांची इतकी धीमी लय ठेवणारे आणि ती लीलेने निभावून नेणारे त्या वेळी हे पहिलेच गवई दक्षिणेत आले होते, आणि त्यामुळे तबलियालादेखील पूर्ण अवधान ठेवून व मनात मात्रा मोजीत ठेका वाजवावा लागे. द्रुतलयीचा नेहमी सराव असलेल्या उत्तरेकडील सामान्य तबलियांना तर इतका धीमा ठेका वाजविताच येत नसे. ठेक्याची लय व तंबोऱ्याचा स्वरेलपणा ही दोन्ही मनासारखी कायम झाली म्हणजे हे दोघे बंधू स्वर लावायला सुरुवात करीत. मध्यंतरी कोणती चीज गायची हे ते दोघे आपसात ठरवीत आणि चीजेला दोघेही भाऊ एकदम सुरुवात करीत.

## खांसाहेबांचा आवाज

खांसाहेबांच्या आवाजाची जात रुंदट, थोडीशी बसकट, परंतु साफ व अकृत्रिम असे; त्यात जवारीकरिता रेकणे किंवा गोडीकरिता गळा आवळणे नसे. आवाज सरळ छातीतून निघे; तो वरवरचा, कृत्रिम किंवा गळी असा नसे. तारषड्ज व त्यावरचे तारस्वरदेखील तितकेच खुले आणि छातीतून निघालेले रुंद व जोरकस असे लागत. मग ते स्वर आलापातील, उपज-अंगातील, तयार तानेतील किंवा बोल-तानेतील असोत. मुरकी, मींड, खटके वगैरे अलंकारदेखील रुंद व साफ आवाजाचे ठसठशीत असत; त्यांत कृत्रिम किरटेपणाचा लेशही नसे. त्याचप्रमाणे तारसप्तकातील कामगत किंवा करामत दाखविण्या-करिता आक्रोश, आदळआपट, शिरातोड असा प्रकारही नसे. सहजपणाने कामगत होईल तेवढाच आवाज ताणायचा. तारसप्तकातील मध्यम, पंचम किंवा त्यापुढील स्वर लावून दाखविण्याकरिता त्यांनी कधी शिरा ताणून चेहरा भयानक केला नाही. आवाज बसला असेल तर तार षड्ज लावण्याचादेखील प्रयास ते करीत नसत; पाचसहा स्वरांत विविध कामगती करून ते मैफल रंगवीत! बंधू हैदरखांसाहेबांचा आवाज जातिवंत मधुर, पण खांसाहेबांच्या आवाजासारखा रुंद व भरदार नव्हता. त्यामुळे तान–पलट्याचे वेळी तो लवलवीत वाटे. परंतु त्यांच्या आवाजाची जातच अशी स्वरेल व मोहक होती की त्यांच्या संथ आलापांवरच मैफल राजी होत असे. अशा जातीच्या मधुर आवाजाची जन्मजात देणगी फार थोड्या गायकांना लाभते. असे असूनदेखील, या दोन बंधूंचे गायन एकाच वेळी ऐकताना, निसर्गदत्त कंठाची शोभासुद्धा मेहनतीने कमावलेल्या हुकुमी आवाजाच्या झोतापुढे फिकी वाटे! हैदरखांच्या आवाजाची शोभा पाणीदार मोत्यासारखी मोहक तर अल्लादियाखांच्या गायकीची प्रभा पैलू पाडलेल्या हिऱ्यासारखी तेजाने दिपविणारी वाटे.

चिजेची सुरुवात करून तालचक्राच्या ठरलेल्या बिंदूवरून चिजेचे तोंड बांधून जेव्हा हे दोघेही बंधू हिशेबी सहजपणाने समेवर येत, त्या वेळी स्वर, राग व लय या त्रिगुणांच्या एका नव्याच दुनियेत प्रवेश केल्यासारखे श्रोत्यांना वाटे व त्यांच्या मुखातून पहिली 'वाहवा' निघे. स्वर लावण्याची पद्धत नवी, राग नवा, आणि लयीचा संथपणाही नवा; आणि ही सर्व नवीनता कलात्मक सौंदर्याशी निगडित झालेली! नुसती नवीनता फारच अल्पकाल टिकते; कलाविलासाने ती समृद्ध असेल तरच तिची अपूर्वाई कायम राहते.

## अनोखे राग

गेल्या पन्नास वर्षांमध्ये जे नामवंत गायक महाराष्ट्रात आले व होऊन गेले त्या सर्वांपेक्षा अल्लादियाखांसाहेबांनी नव्या नव्या अपरिचित रागांचा अधिक फैलाव केला, यात संशय नाही. अप्रसिद्ध म्हणून नव्या वाटणाऱ्या काही रागांतील चिजा काही गायकांच्या संग्रही असत व त्या क्वचित प्रसंगी कानावरही येत. परंतु अशा अनवट रागातील चिजा सर्रहा गाऊन मैफल रंगविण्याची किमया खांसाहेबांनीच केली. एखाद्या गायकाने नव्या रागातील पैदा केलेल्या चिजेचे अस्ताई–अंत्रा गाऊन दाखविणे व त्यात चारदोन आलाप घेणे याचे श्रोत्यांना कुतूहल वाटते व त्यांच्या जवळील चिजांच्या संग्रहाबाबत आदरही वाटतो इतकेच. पण नित्य सरावाच्या रागावरच अशा बहुतेक गायकांची मुख्य मदार असते व त्यावरच त्यांचा संगीतप्रपंच चालतो. कै. पं. भातखंडे यांच्या महनीय प्रयासामुळे अनेक नव्या रागरागिणींचा पुस्तकी परिचय अलीकडील पिढीला झाला आहे. गेल्या पंचवीस वर्षांत त्यामुळे काही अपरिचित राग मैफलीतून क्वचित गायले जातातदेखील. पण त्या रागाचे फार तर नाव जाणण्याच्या उत्सुकतेपलीकडे रसिकांमध्ये अधिक चलबिचल झालेली आढळात नाही. परंतु अल्लादियाखांसाहेब नवे अवघड राग अशा काही आकर्षक कलापूर्णतेने मैफलीमध्ये रंगवीत आणि रसिक श्रोत्यांवर तसेच सांगीतिकांवरदेखील अशी काही मोहिनी पाडीत की ती चीज व तो राग आपल्याला अवगत झाला पाहिजे अशी उत्कंठा त्यांच्यामध्ये निर्माण होई. राग नवा असो की जुना असो, खांसाहेबांच्या गायनाचे प्रारंभीच जे वैशिष्ट्य दिसून येई ते त्याच्या अस्ताईच्या बांधेसूद डौलाचे. चित्रकलेत आकृतीची रेषा बांधेसूद नसेल तर रंगसंगती, अलंकार, आभरणे इत्यादींचे कौशल्य कोणाच्या मनात भरत नाही.

## बोलांचा उच्चार

खांसाहेबांच्या बोल उच्चारण्याच्या पद्धतीकडे त्यानंतर श्रोत्यांचे लक्ष हमखास खेचले जात असे. पाण्याच्या सौम्य लहरींवर सोडलेल्या कमळाच्या पाकळ्या जशा किंचित हेलकावे घेत तरंगतात तसे त्यांचे बोल आंदोलित असत. या झुलत्या-डोलत्या बोलांमध्ये त्यांच्या विशिष्ट वाणीची मुख्य खूण जी 'गमक' ती सुरवातीपासूनच प्रतीत होई. बोल असोत, बोलतान असो की आलाप असोत, त्यांत गमकेचा डोल असायचाच; फार काय, त्यांच्या तयारीच्या तानपलट्यातूनदेखील गमकेचा सूक्ष्म धागा गोविलेला असे. विलंबित स्वरांची गुंफण करताना त्यातील प्रत्येक स्वर, वृक्षावरून टप्कन गळून पडणाऱ्या कोमेजलेल्या फुलासारखा नव्हे, तर पाल्वीसकट खुडलेल्या टवटवीत फुलासारखा तजेल्दार दिसे. विलंबित स्वरविस्ताराला गवैयांच्या परिभाषेत उपज-अंग म्हणतात व याची यथार्थता त्यांच्या स्वर उच्चारण्याच्या पद्धतीत पदोपदी पटत असे; म्हणजे त्यांचे स्वर कोणत्या तरी मागच्या स्वरांकुरांतून उपजल्यासारखे दिसत. त्यामुळे स्वरांमध्ये एकेरीपणा किंवा तुटकपणा भासत नसे.

## रागस्वरूपांचे आधार

अल्लादियाखांसाहेबांच्या गायनाला नामदार जयकरांनी 'गौरीशंकरा'च्या शिखराची जी उपमा दिल्याचा उल्लेख प्रारंभीच केलेला आहे तिची समर्पकता केवळ त्या शिखराची उंची व उदात्त शोभा या दोन गुणांपुरती मर्यादित होती असे नव्हे; तर एवढ्या अत्युच्च शिखराचा मूलाधार कल्पनातीत घनिष्ठ व भरभक्कम असला पाहिजे ही जाणीव त्या उपमेमुळे होते. खांसाहेबांच्या गायनाचा हा घनिष्ठ मूलाधार म्हणजे हजारो कंठगत ध्रुपद, धमार व ख्याल आणि त्यावर आधारलेली त्यांची अती समृद्ध रागविद्या आणि अविकृत व अधिकृत रागस्वरूपे. केवळ गुरुमुखाच्या प्रघाताच्या किंवा ग्रंथाच्या आधारावर त्यांनी रागांची अंगोपांगे आत्मसात केली नव्हती; तर प्रत्येक रागाच्या निरनिराळ्या चिजांवर आधारलेल्या रेखीव राग-मूर्ती त्यांच्या ध्यानधारणेत अधिष्ठित झाल्या होत्या. न्यायमूर्तींच्या निवाड्यांचा आधार ज्याप्रमाणे स्त्री-पुरुषांच्या वर्तनाबाबत निर्णय देतो, त्याप्रमाणे रागरागिणींच्या बर्तावाबाबत ध्रुपदादी चिजांचा आधार ते प्रमाण मानीत. या बाबतीत केवळ ग्रंथांचा आधार ते गौण समजत. काही थोड्या रागरागिणींच्या बाबतीत निरनिराळ्या घराण्यांमध्ये मतभेद आहेत. "आमच्या गुरूंनी आम्हाला हा राग असा शिकवला आहे" यापलीकडे त्याबाबत अधिक पुरावा पुष्कळ गायकांना देता येत नाही. परंतु अल्लादियाखांसाहेब अनेक होरी-ध्रुपदांचा पुरावा पुढे मांडीत आणि आपल्या राग-स्वरूपाचे मंडण करीत. ध्रुपद-धमारामधील स्थायी, अंत्रा, आभोग, संचारी अशा चार प्रकारच्या अवयवांमुळे रागाची जशी सर्वांगीण शोभा प्रतीत होते तशी ती स्थायी व अंत्रा ही दोनच अंगे असणाऱ्या ख्यालामधून होत नाही. परंतु एकेक रागातील निरनिराळ्या मांडणीच्या अनेक चिजा मुखोद्गत असल्याकारणाने त्या त्या रागांचा चारी अंगांनी विस्तार करण्याचे साधन व सामर्थ्य खांसाहेबांनी कमाविले होते; त्यामुळे, एका चिजेला तास-दीडतास वेळ लागला तरी तो कसा गेला व केव्हा गेला याचे श्रोत्यांना भान राहत नसे.

अल्लादियाखां बहुधा अनोखे किंवा जोड राग गात असत हे मागे सांगितलेच आहे. अशा रागात बुद्धिमान गायकाला संथ आलापांच्या द्वारा थोडी फार रागाची शुद्धता सांभाळता येते; तथापि चपलगतीच्या तानक्रियेत रागांचे शुद्ध स्वरूप टिकविणे बिकट होते. परंतु खांसाहेब आपल्या बेछूट तानक्रियेची अशी काही रचना करीत की रागाच्या स्वरूपात शक्य तो फरक पडू नये. रागाचे वैशिष्ट्य व वैचित्र्य दाखविणारे स्वर, त्यांच्या पेचदार तानेतदेखील उठावाने दिसून येत. आपल्या आवळ्याजावळ्या अचपळ लेकरां-मधील सूक्ष्म फरक मातेलाच जसा चटकन उमगतो किंवा आपली पाळीव कबुतरे मालकाला जशी त्यांच्या रंगावरून, टिपक्यांवरून व विशिष्ट डौलावरून आकाशात अलग दाखविता येतात, तशा प्रकारे खांसाहेब प्रत्येक रागाचे अलग अलग स्वरूप श्रोत्यांच्या पुढे तानक्रियेमध्येदेखील साकल्याने मांडीत. 'स-र-ग-म' करण्याचे ज्ञान असलेल्या श्रोत्यांना तर आपल्याला या नव्या रागिणीचे स्वरूप पूर्णपणे समजले व आकलन झाले

असे ऐकताना वाटे, पण खांसाहेबांनी दुसरा राग गाण्यास सुरुवात केली म्हणजे पहिल्या रागाच्या स-र-ग-मचा निर्जीव सांगाडा स्मृतीतून पार नाहीसा होई! दुसऱ्या पक्वान्नाचा स्वाद जिभेला लागला म्हणजे पहिल्या पक्वान्नाचा स्वाद तत्काळ विरून जातो व शेवटी पंचपक्वान्नाच्या मेजवानीची आल्हादकारक स्मृती मात्र दीर्घकाल राहते, त्याप्रमाणे खांसाहेबांची गाण्याची बैठक स्मृतिमधुर होत असे.

काही रागांना प्राणभूत स्वरांखेरीज एखादा विशिष्ट स्वरसमुदाय, त्या रागाची अचूक निशाणी म्हणून वरचेवर दाखल करावा लागतो; अशा ठिकाणी त्याची शोभा वाढविण्याकरिता पुसट मुरकी किंवा ताजणी स्वरांचे कण लावण्याची पद्धती काही गायक स्वीकारतात; परंतु खांसाहेब तेच स्वर मुद्दाम स्पष्ट असे वापरीत आणि नवा रंग निर्माण करीत. कोणत्याही स्वराला पुसट कणांचा आधार ते कधी देत नसत. शिवाय त्यांच्या स्वरांचे कण मींडीमध्ये विरलेले असत आणि त्यामुळे त्यांच्या गायकीतील भारदस्तपणा एकजात टिकून राही. 'नमवी पद्दा भूमी'च्या दिमाखाने 'कदम कदम' आगे बढणारा सैनिक जर मध्येच चवड्यावर ठुमकत मुरडत चालू लागेल तर कसे दिसेल! पण असे विसंगत प्रकार खांसाहेबांच्या गायकीत कधीही होत नसत. स्वराध्याय व रागाध्याय या दोन्हींमधील पारंगतता खांसाहेबांच्या अथांग विद्येची प्रचीती देई, त्याचप्रमाणे त्यांची रागविस्तारक्रिया त्यांच्या अभिजात कलावैभवाची साक्ष देत असे. विद्येपेक्षाही मांडणीमुळे (presentation) श्रोत्यांना कलावानाचा दर्जा पटू लागतो. मौल्यवान चिजांचे व अलंकारांचे भांडार जरी संग्रही असले तरी कोणत्या वेळी कोणता अलंकार कोठे व कशा ऐटीने वापरावा या तारतम्यात आणि त्यांची शोभा प्रत्येक ठिकाणी नवोनव दिसावी अशी मांडणी करण्यात खरी कला असते. शिवाय सर्व अलंकार ठाकठीक असले तरी चिजेच्या मुखड्याची सुंदरता जर साधता आली नाही तर सर्व भांडार कुचकामाचे ठरते.

## चिजेचे तोंड

अल्लादियाखांसाहेब चिजेचे तोंड दृष्ट लागण्यासारखे मोहक ठेवीत. वल्लभाची उत्कंठा पराकोटीला नेऊन मग हळुवार हातांनी बुरखा दूर करून नववधू आपला मुखचंद्र प्रकट करते आणि त्याच्या तोंडून 'अहाहा' असे आनंदाचे उद्गार निघतात, त्याप्रमाणे त्यांच्या चिजेच्या झुलत्या मुखड्याची व समेची तोंडमिळवणी झाली की 'अहाहा' 'वाहवा' अशा उद्गारांचा वर्षाव होई. काही काही वेळा असे वाटे की मातेच्या वात्सल्यपूर्ण "आला रे! आला रे!! आला!!!" अशा प्रेमळ हाकेसरशी बालक लडिवाळपणाने येऊन तिच्या मानेला विळखा घालून तिच्या तोंडात तोंड घालीत आहे; केव्हा केव्हा वाटे की, वल्लभाचे डोळे मिटून कामिनीने त्याचे हळुवार चुंबन घेतले; एखादे वेळी असे वाटे की आकाशात भरारी मारणाऱ्या गरुड पक्ष्याने जमिनीवर सरपटणाऱ्या भुजंगावर अचूक झडप घालून त्याला अंतराळातून धाडकन जमिनीवर आपटले; अशा तऱ्हेतऱ्हेच्या रीतीने खांसाहेब तालाच्या समेशी चिजेच्या तोंडाचा मिलाफ करीत.

## तानांची आतषबाजी

तयार गायकाच्या तानक्रियेला नेहमी आतषबाजीची उपमा देण्यात येते आणि ती पुष्कळ अंशी समर्पक वाटते. तशीच अल्लादियाखांसाहेबांच्या तानांची आतषबाजी खरी, परंतु ती एकामागून एक लावलेल्या फुलबाजा-भुसनळे यांच्यासारखी ठराविक जातीची नव्हती. त्यांची तान तारनळ्याप्रमाणे उंच फेकली गेली म्हणजे खाली येताना तिच्यातून निरनिराळे गोलक उमलून येत आणि त्या गोलकातूनदेखील विशिष्ट आकृतींचे पुंज निर्माण होत. एखादी तान अमुक तऱ्हेनेच आता चिजेचे तोंड पकडणार अशी हिशेबी अपेक्षा किंवा मामुली अंदाज करावा तो मध्येच एखादी पेचदार स्वरांची लड अशी काय गुंफली जाई की आपल्या अंदाजाला भलत्याच ठिकाणी मजेदार धक्का मिळे. खांसाहेबांच्या प्रत्येक तानक्रियेत व रागविस्तारात त्यांनी नव्या नव्या स्वराकृतींची बुद्धिपुरस्सर केलेली योजना-चातुरी ठिकठिकाणी प्रतीत होई. त्यांचा दमश्वासदेखील विलक्षण! उत्तरोत्तर अधिकाधिक परीघ व्यापणाऱ्या व बलपेचांनी समृद्ध अशा तानांची फेक सुरू झाली म्हणजे श्रोत्यांनाही आपला श्वास रोकावासे वाटे; नाहीपेक्षा त्या तानेच्या विराट आकृतीचे सम्यक स्वरूप आकलन होणेच कठीण! केवढ्या दीर्घ दमश्वासाची व किती आवर्तनांची तान फिरवायाची, तीमध्ये कोणत्या स्वराकृती सामील करायच्या, चिजेचे तोंड कोणत्या डौलाने गाठायचे इत्यादी योजना जणू काय त्यांच्या प्रभावी प्रतिभेतून आपोआप व विनाप्रयास बाहेर पडत असे वाटे. पण या विनाप्रयासाच्या मागे केवढी दीर्घ तपश्चर्या, केवढा विद्याव्यासंग आणि किती सूक्ष्म सौंदर्यदृष्टी होती! अपरिमित कष्टातूनच प्रतिभा उगम पावते. मुबलक दमश्वासामुळे त्यांच्या तानेमध्ये कधी तुकडे पडत नसत किंवा नव्या दमाने ठिकठिकाणी जोड देण्याची त्यांना गरज पडत नसे. ज्याप्रमाणे एखादा कुशल मोडी लेखक टाक न उचलता आपले वाक्य ठराविक ओळीमध्ये उपमा-उत्प्रेक्षा, विशेषणादि अलंकारांसह पूर्ण करतो त्याप्रमाणे खांसाहेबांच्या तानक्रियेत योजनेच्या अंदाजाचे विलक्षण कौशल्य दिसून येई.

## बोल-तान

अल्लादियाखांसाहेबांच्या बोल-तानांना तर तुलनाच नाही. ख्यालाच्या गायकीत बोल-तानेचा प्रकार सर्वांत कठीण समजला जातो. साधे आलाप किंवा ताना घेताना केवळ रागांग-स्वरांच्या श्रेणी बांधाव्या लागतात; परंतु बोल-तानांमध्ये, चिजेचे बोल निरनिराळ्या तऱ्हेने रागस्वरात फिरवून मुख्यत्वे ताल-विलास साधण्याची करामत असते. हा प्रकार ध्रुपद-धमारांच्या गायकीचे प्रमुख अंग आहे. आणि खांसाहेबांना ध्रुपद-धमाराच्या गायकीचे बाळकडू मुबलक मिळालेले असल्यामुळे त्यांच्या बोल-तानांची शोभा अपूर्व तर वाटेच; परंतु त्यामुळे त्यांच्या ख्याल-गायनाला ध्रुपद-धमाराचा भारदस्तपणा प्राप्त झाला होता. थोडक्यात सांगायचे तर, त्यांची प्रत्येक बोलतान म्हणजे त्या त्या रागातील नवीन बांधणीची एक एक सुंदर चीजच बनत असे.

## लयबद्ध गायन

शेवटी गायनकलेच्या मूलाधारांपैकी अत्यंत महत्त्वाचा आधार जी लयबद्धता, तिच्यामुळे खांसाहेबांची गायकी किती प्रभावी होत असे याचे किंचित दिग्दर्शन करणे अप्रस्तुत होणार नाही. कोणताही राग साकल्याने वठवावयाचा म्हणजे त्या रागातील चिजेची बंदीष, तालाचा झोक, रागाचे वैशिष्ट्य, त्याची विलंबित आलापचारी, मध्यलयीतील तानक्रिया, द्रुतगतीच्या ताना, बोल-ताना, समेशी मिलाफ आणि लयीचे आदिपासून अंतापर्यंत कायमचे प्रवाही सूत्र—इतक्या गोष्टी सुंदरतेने श्रोत्यांपुढे मांडाव्या लागतात; आणि ही इतकी सर्वांगीण मांडणी करण्यास व श्रोत्यांचे प्रत्येक अंगाने समाधान करण्यास एकेक चिजेकरता तास दीड तासाचा काळ कमीच पडतो. अशा कारणाने एकच चीज तास-दीडतास गाऊन श्रोत्यांना तो वेळ केव्हा व कसा गेला याचे भान विसरायला लावणारे असे खांसाहेब अल्लादियाखांसारखे गायक क्वचितच आढळतात. तज्ञ श्रोत्यांइतकीच अज्ञ श्रोत्यांवरदेखील ही मोहनी दीर्घकाळ पाडण्याचे मुख्य मर्म म्हणजे त्यांच्या गायनातील अखंड, अक्षय्य आणि सर्वांना बद्ध करणारे असे लयीचे सूत्र. रागाची सच्चाई, स्वरांची कामगत, तानांची विविधता, तालाशी क्रीडा वगैरे गोष्टी विशेषतः तज्ञांना आकलन होतात व अज्ञांना मधूनमधून आल्हादकारक वाटतात. परंतु त्यामध्ये जर लयीचा संतत प्रवाह नसेल तर काही काळाने श्रोते घड्याळाकडे पाहू लागतात; म्हणजे काळवेळाची त्यांना जाणीव होऊ लागते. मग त्या गायकाचा आवाज कितीही सुंदर असो, त्याची तान कितीही तयार असो, तो कितीही विद्वान असो किंवा मोठा तालज्ञ असो. उलट, गायक कोणत्याही दर्जाचा असो, ज्या वेळी त्याची कामगत लयीशी एकजीव होते त्याच वेळी त्याची चीज हटकून रंगू लागते, तो स्वतः रंगतो आणि श्रोतेही गुंगून जातात. चिजेच्या सुरुवातीपासून तो चीज संपेपर्यंत तिच्या हरतऱ्हेच्या विस्तारामध्ये लयीची जाणीव श्रोत्यांमध्ये उत्पन्न करण्याची तालीम अल्लादियाखांसाहेबांना आरंभापासूनच मिळाल्यामुळे त्यांच्या गायकीमध्ये चित्तवेधक प्रवाह अखंड राहत असे. या कारणाने त्यांच्या गाण्यामध्ये एक निराळीच ऐट, निराळीच पद्धत, निराळीच दुनिया प्रत्ययास येई. त्यात पुन्हा राग–ताल–स्वर–विद्येचे अथांग भांडार आणि अगाध प्रतिभा यांची भर—मग ते गायन कशा स्वरूपाचे असेल याची शब्दाने कशी कल्पना येणार?

## अंगविक्षेप

चिजेला सर्वांगांनी खेळविण्याचे वर सांगितलेले नवविध प्रकार करताना गायकाचे—काही सहज व बरेचसे सवयीमुळे—हातवारे, अंगविक्षेप, मुद्राभंग इत्यादी आविर्भाव होत असतात. त्यातील जे काही गानक्रियेला उठाव देतात ते तेवढे दृष्टीला सुसह्य होतात; परंतु जे केवळ अनिष्ट सवयीमुळे किंवा आपल्या करामतीचा बाऊ करण्याच्या उद्देशाने अंगी चिकटलेले असतात ते श्रोत्यांच्या नजरेला खुपल्यावाचून राहत नाहीत. तारसप्तकात आरडाओरडा करून, शिरा ताणून, नाक-डोळे फेंदारून, हातापायांची आदळ-

आपट करून हुंकार-डकारांनी जेव्हा चांगला गायक चिजेचा विस्तार करू लागतो तेव्हा तो रागिणीला खेळविण्याऐवजी तिच्यावर बलात्कार करतो आहे असे वाटते. अल्लादियाखां-साहेबांचे मुळीच हातावारे होत नसत असे नाही. मूर्तीला वाचा फुटल्याप्रमाणे गाताना निश्चल राहण्याचा किंवा निर्विकार मुद्रा ठेवण्याचा अजब चमत्कार ते करू शकले नाहीत हे खरे आहे. हातवारे ते जरूर करीत; परंतु आपल्या स्वरविस्तारामध्ये कशा प्रकारच्या आकृतींची व सौंदर्यबिंदूंची योजना आपण करीत आहोत हे श्रोत्यांच्या मनावर बिंबविण्या-करिता अनुरूप व निदर्शक असे त्यांचे आविर्भाव असत. मुष्कील राग, मुष्कील ताल, मुष्कील तानफिरत—त्यांच्या गाण्याचा सर्वच मामला मुष्कील! आणि अशा मुष्कील गायनामध्येदेखील मुद्राभंगाचे किंवा कष्टद्योतक अंगविक्षेपांचे त्यांना प्रयोजनच कधी पडले नाही. त्यांच्या अपरिमित तपश्चर्येचे व सौंदर्यलक्षी दृष्टीचे हे पुण्य होते. गायनात, हातवाऱ्यात, काव्यात, हस्ताक्षरात, नित्याच्या राहणीत, जणू काय प्रत्येक गोष्टीमध्ये प्रतिष्ठित गोंडसपणाच्या शोधामध्ये ते मग्न असत.

खांसाहेबांच्या गायकीचे श्रोत्यांच्या बुद्धीत बिंबणारे वैशिष्ट्य म्हणजे ते कोणता तरी मजकूर स्वरालापांच्या किंवा तानक्रियेच्या मार्फत निरनिराळ्या रीतीने सांगत आहेत असा भास होई; आणि तो सांगताना जणू काय शब्दांचे सौष्ठव, वाक्याचे सौंदर्य व अर्थाचे गांभीर्य स्वरांच्या मार्फत प्रकट झालेसे वाटे. ते ज्या रागाचे चित्र निर्माण करीत ते सर्वांग-परिपूर्ण तर असेच. परंतु ज्या ज्या उपांगांनी त्या चित्राला एकजिनसी स्वरूप प्राप्त होई, ते ते प्रत्येक उपांगदेखील आपल्यापुरते परिपूर्ण व योग्य ठिकाणी योजनापूर्वक कळाशीत चुस्त बसलेले दिसे.

अल्लादियाखांसाहेबांच्या गायकीच्या बाह्यांगाचे स्थूलमानाने अगदी तुटपुंजे असे येथपर्यंत जे वर्णन केले त्यावरून त्यांच्या समृद्ध व सुंदर गायकीची वाचकांना अल्पांशा-नेही कल्पना येईल अशी लेखकाला अपेक्षा नाही. खांसाहेबांची अनेक गाणी ऐकून लेखकाच्या मनावर जे संस्कार व परिणाम घडले ते त्याने पुढे मांडण्याचे धारिष्ट केले, इतकाच त्यातील ग्राह्यांश.

## ३. गानपूर्वज

### मूळपुरुष

अल्लादियाखांसाहेबांच्या घराण्याचे मूळपुरुष, नाथविश्वंभर. हे मोठे संगीतोपासक होते. स्नानसंध्या, पूजाअर्चा इत्यादींचे मंत्रदेखील ते रागरागिणीत पठण करीत! कलाप्रेमी अकबर बादशहाच्या जमान्यातील गायनसम्राट तानसेन यांचे गुरू श्री० हरिदास यांचा जन्म नाथविश्वंभर यांच्याच वंशात झाला होता, असे खांसाहेब सांगत. भरतखंडातील एकमेव गायन-सम्राट मिया तानसेन यांच्या गायनाची अकबरावर इतकी मोहिनी पडली होती की, अशा शिष्याच्या गुरुजींचे गायन ऐकण्यासाठी तो हरिदास स्वामींच्या वृंदावन येथील आश्रमात गेला. तेथे स्वामींचे गायन ऐकता ऐकता बादशहा बेभान झाला आणि हरिदासस्वामी तेथून निघून गेले किंवा अदृश्य झाले. तानसेनाच्या गायन-तपःसिद्धी-विषयीदेखील खांसाहेब अशा गोष्टी मोठ्या गांभीर्याने सांगत. या गोष्टी दंतकथेसारख्या वाटतात असे कोणी उपेक्षेचे उद्‌गार काढले तर "माझ्यासारख्याच्या दंतकथा का नाही फैलावल्या बरं ? तशाच योग्यतेची त्या गुरुशिष्यांची विद्या आणि सिद्धी होती म्हणून त्या फैलावल्या" असे खांसाहेबांचे उत्तर असे. इतक्याने कुणाचे समाधान झाले नाही तर ते म्हणत, गाणे ऐकून बेभान होणे किंवा मूर्च्छित पडणे हे आजकालच्या जमान्यातील तरुण लोकांना अगदी अशक्य वाटते. परंतु याचे कारण, अंगावर रोमांच उठविणारे किंवा डोळ्यांतून आसू वाहवणारे गाणे अलीकडे कुणाला ऐकायलाच मिळत नाही. खांसाहेबांच्या तरुणपणी त्यांना स्वतःला असे अनुभव आलेले होते. एकादोघांना नव्हे तर एकंदर मैफलीला सद्‌गदित करणारे, अश्रूंच्या धारा वाहवणारे गायक त्यांनी ऐकले होते. ते म्हणत, गाण्याची मेहनत करताना एखादी तान किंवा उपज घेण्यात आपण गर्क झालो, किंवा काही स्वरांवर तबियत जमली, म्हणजे कोण आला आणि कोण गेला याचे भान नसते, हे आपण पाहतो ना? एकनिष्ठेने तपश्चर्या करताना आपण स्वतः जर बेभान होऊ शकतो तर ज्याला सिद्धी मिळाली तो सहज दुसऱ्यांनादेखील बेभान करू शकेल. याला कोणी दंतकथा म्हणोत. परंतु हरिदासस्वामीजी सिद्धपुरुष होते यात शंका नाही. त्यांच्याच घराण्यात त्यांच्या नंतरच्या चौथ्या-पाचव्या पिढीत म्हणजे सुमारे दोन-अडीचशे वर्षांपूर्वी **नत्थूखांजी** आणि **मानतोलखांजी** असे दोन नामवंत बंधू होऊन गेले.

उत्तरेकडील गायक-वादकांची घराणी दोन प्रकारांची असतात. एक रक्ताच्या नात्याचे व दुसरे विद्येच्या नात्याचे. आता मूळपुरुष गायनतपस्वी नाथविश्वंभर यांचे हरिदासस्वामी रक्ताचे वंशज होते की विद्येचे वंशज होते व दोघांमध्ये किती पिढ्यांचे अंतर होते हे सांगता येत नाही. तसेच, खांसाहेबांच्या पूर्वीच्या कोणत्या पिढीत कोणत्या साली कोणत्या पूर्वजाचे प्रथम धर्मांतर झाले हे कळायला मार्ग नाही. सांगता येते ते एवढेच की, अल्लादियाखांसाहेबांच्या पणजांचे नत्थूखां असे मुसल्मानी नाव होते. त्यांच्या पूर्वीच्या कितव्या पिढीत हे धर्मांतर झाले हे जरी सांगता आले नाही तरी ज्या त्यांच्या पूर्वजावर धर्मांतर करण्याचा प्रसंग आला तो प्रसंग मात्र अल्पवयी संभाजी राजांची मुसलमानाच्या तावडीतून सुटका व्हावी म्हणून त्यांना सर्वांसमक्ष आपल्या ताटातून जेवू घालणाऱ्या ब्राह्मणाच्या 'बखरी' कथेसारखा रोमांचक आहे खरा. हे पूर्वज दिल्लीनजीक एका छोटेखानी अनूप नावाच्या संस्थानात गायक होते. तेथील राजावर दिल्लीपती बादशहाची मर्जी खप्पा झाली आणि ते संस्थान खालसा करून राजाला त्याने दिल्ली येथील कैदखान्यात डांबून ठेवले. अर्थात या राजनिष्ठ सत्त्वस्थ अशा गायकाला हा अन्याय सहन न होऊन तो दिल्लीस जाऊन राहिला. या गायनाचार्यांची कीर्ती काही दिवसांनी बादशहाच्या कानावर गेली. बादशहाने दरबारात त्यांचे गाणे ऐकले; आणि अत्यंत खूष होऊन "मागाल ते मी देईन!" असे तो उद्‌गारला. गायनाचार्य या उद्‌गारांची वाटच पाहत होते. त्यांनी मागणे मागितले की, "आमच्या महाराजांची कैदेतून सुटका करून त्यांना संस्थानच्या गादीवर पुन्हा बसवावे." पण बादशहाने अशी अट घातली की, "तुम्ही दिल्ली दरबारचे गवयी होऊन आमच्या पंक्तीला नित्य जेवले पाहिजे." राजाला मुक्त करण्याची आपली प्रतिज्ञा पूर्ण व्हावी म्हणून बादशहाची अट त्यांनी मान्य केली आणि अशा कारणाने हे घराणे मुसलमान झाले.

असे धर्मांतराचे प्रकार त्या काळातील इतर गायकी घराण्यांमध्ये घडून आलेले आढळतात. तन्ना मिश्र हिंदूचा पुढे मुसल्मान तानसेन झाला तोदेखील महमद घोषा नावाच्या एका अवलियाने आपल्या तोंडातील विडा त्याच्या तोंडात घातला त्यामुळे! या अवलियाच्या आशीर्वादानेच निपुत्रिक मकरंद पांडे यास तानसेन हे पुत्ररत्न लाभले होते. अवलियाने या हिंदू तरुणाला मुसल्मान केले. परंतु ज्यांनी तानसेनाला गायनसम्राट बनविले ते हरिदासस्वामी हिंदूच होते.

डागुरी बाणीचे उत्पादक ब्रिजचंद आणि नोहारी बाणीचे निर्माते श्रीचंद हे हिंदूच होते. पुढे त्यांचे शिष्यगण आणि वंशज वरीलसारख्या कारणांनी मुसल्मान झाले. तसेच खैराबाद येथील प्रसिद्ध गायकांची जोडी चांदखां व सूरजखां हे हिंदूच होते. सुधाकर व दिवाकर अशी त्यांची नावे होती.

अल्लादियाखांसाहेबांच्या एकंदर आयुष्याचे, विचारसरणीचे, भाविक मनोवृत्तीचे आणि नित्याच्या आचाराचे निरीक्षण केले तर असे दिसून येते की, हिंदू व मुसल्मान या दोन्हीही धर्मांविषयी व त्या दोहोंतीलही अवतार, अवलिये, संत, महंत वगैरेंविषयी

त्यांच्या मनात सारखीच श्रद्धा वसलेली होती. ते न चुकता नमाझही पढत आणि तितक्याच भाविकपणाने हिंदूच्या देवदेवतांच्या कथाही वाचीत.

आपले गोत्र शांडिल्य, आपण आद्य-गौड ब्राह्मण, तीन प्रवर, अंजनी सूत्र वगैरेची संध्येमधील संथा आम्हाला पिढ्यान् पिढ्यांपासून देण्यात आली आहे, असे खांसाहेब मोठ्या अभिमानाने सांगत. शिवाय पूर्वीच्या ज्या अनेक चिजा वाडवडिलांकडून त्यांना मिळाल्या होत्या त्यांतील बहुतेक चिजांमध्ये शंकर, गणेश, सरस्वती, राम, कृष्ण इत्यादी देवतांचीच स्तुती आहे. आणि त्या चिजा निखालस ब्रिज भाषेत आणि हिंदी भाषेत आहेत, त्यांत उर्दू, फारसी किंवा अरबी शब्द मुळीच नाहीत; म्हणजे बादशाही उर्दू भाषेच्या पूर्वीच त्या प्रचारात होत्या. चिजा बनविणाराचा नामनिर्देशदेखील त्यात नाही इतक्या त्या जुन्या आहेत. सारांश, मुसलमानी स्वाऱ्यांच्या फार पूर्वीपासून भरतखंडात रागसंगीत प्रचारात होते असाही जाता जाता निष्कर्ष काढता येईल.

सदारंग-अदारंग हे त्या मानाने फार अलिकडचे. त्यांनी पुढे ख्याल बनविले आणि ख्यालाची गायकी प्रचारात आणली. तेथूनच पुढे चिजांमध्ये फारसी, उर्दू वगैरे शब्दांचा वापर होऊ लागला असावा.

## धर्मातीत कला

मुसलमानी धर्माची दीक्षा घेतल्यानंतर हिंदू धर्मातील देवांच्या चिजा गाण्यास बादशहाने मनाई केली नाही ही मोठीच मेहेरबानी! नाहीपेक्षा भारताची गायनकला आणि रागविद्या संपुष्टात आली असती. त्या वेळेची बहुतेक सर्व गवयांची घराणी मुळात हिंदूच होती, आणि जरी त्यांना धर्मांतर करावे लागले, तरी संगीताच्या चिजांमधील देवदेवतांना इतक्या पिढ्यांनंतरही आजतागायत कोणी धक्का लावलेला नाही. काही थोड्या मुसलमान पंडितांनी पुढे अल्लाइलाही, परवरदिगार, पीर मुर्शद इत्यादिकांवर गौरवपर चिजा बांधल्या आहेत, नाही असे नाही. तरी पण त्यांनी हिंदू देवतांच्या चिजांवर कधी बहिष्कार घातला नाही. उलट, कित्येक मुसलमान कवींनी राधा-कृष्णाच्या व इतर देवतांच्या स्तुतिपर शेकडो चिजा रचल्या आहेत आणि आजतागायत रचीत आले आहेत.

पूर्वजांनी ज्या धर्मामध्ये ज्याला पैदा केले आणि वाढविले तो त्याचा धर्म आणि त्यांनी ज्या चिजांच्या द्वारे त्याला संगीतविद्या व कला शिकविली त्या चिजा त्याची खरी दौलत. संपत्तीचा आणि धर्माचा जसा बिलकूल संबंध नाही तसाच चिजांचा किंवा संगीतविद्येचा धर्माशी काही संबंध नाही. बहुतेक पिढीजाद गायकांची 'राम, कृष्ण, शंकर, गणेश, सरस्वती, ही परवरदिगार अल्लाचीच स्वरूपे आहेत' अशीच चिजा गाताना भावना असते. खांसाहेबांनी ज्या काही चिजा रचल्या आहेत त्यांतदेखील धर्माचा भेदभाव ठेवलेला नाही. "आमच्या पूर्वजांची आम्हाला तशी शिकवणूकच नाही" असे ते म्हणत आणि "आदिदाता अनंत दयावंत, तूही जगतकरता, एकहि निराकार" अशा अर्थाच्या चिजा म्हणून दाखवीत. हिंदू-मुसलमानांमधील आततायी भीषण अत्याचारांचा

त्याना अत्यंत विषाद वाटे. बहुतेक घरंदाज गायकांची वृत्ती अशीच उदारमतवादी असते, कारण त्यांचे मूळपुरुष व पूर्वज हिंदू होते. या दोन्ही धर्मांमधील अंतिम एकरूपता, हिंदुस्थानातील गायकवर्गाइतकी इतर कोणत्याही वर्गांमध्ये बाणलेली नसेल.

खांसाहेबांचा जन्म ११ ऑगस्ट १८५५ रोजी झाला. त्यांना आपल्या वडिलांच्या अगाध विद्येची आठवण होई आणि स्वतःचा वृत्तांत सांगण्याचे सोडून ते वडिलांच्या व त्यांचे समकालीन असलेल्या प्रचंड कलावानांच्या हकीकती सांगू लागत. त्या लोकांनी संगीतविद्येची कशी जोपासना केली, त्या विद्येचा त्यांनी केवढा अभिमान बाळगला, त्यांची फकीरी वृत्ती, साधाभोळा स्वभाव वगैरेचे वर्णन तल्लीन होऊन ते करीत. त्यांच्या वेळचे राजेरजवाडे संगीतविद्येचे किती षोकी आणि गवैय्यांचे केवढे अभिमानी होते, उत्तमोत्तम कलावान कसबी लोक पदरी बाळगणे यातच त्यांना किती भूषण वाटत होते! तसेच ते केवढे दानशूर होते! राजे औदार्यात मस्त आणि गायक आपल्या कलेमध्ये मस्त! असा तो जमाना होता. इंदोरचे राजपदनिवृत्त श्री० तुकोजीराव महाराज यांनी होलिकोत्सवात येणाऱ्या कलावंतांना कल्पनातीत मोठाल्या देणग्या दिल्या. असा उदार राजा झाला नसेल असे लेखकाचे उद्गार ऐकून खांसाहेब एकदा म्हणाले की, जोधपूर, जयपूर, बुंदी वगैरे त्या वेळेचे राजे याहीपेक्षा उदार होते. महाराजांच्या किंवा राजपुत्राच्या वाढदिवसाच्या जलशाच्या प्रसंगी तर शंभर, दोनशे, पाचशे, हजार रुपयांचे लहानमोठे थैले भरून तयार ठेवलेले असत. गवैय्याच्या करामतीवर ज्या ज्या वेळी महाराज विशेष खूष होत त्या त्या वेळी वाढत्या रकमेची थैली त्याला बहाल व्हायची! राजाच्या भुवईच्या इशाऱ्यावर नोकराने नजर ठेवायची. काही काही गवैय्यांच्या पुढे थैल्यांची रास जमायची! आज-कालच्या राजे लोकांत तुकोजीराव सढळ हाताचे उदार खरे; पण पूर्वीच्या राजेलोकांची गोष्ट काही और होती, असे ते म्हणत.

त्या काळातील राजेलोकांच्या कदरदानपणाच्या व औदार्याच्या हकीकती आजकालच्या लोकांना कपोलकल्पित वाटतील. गायकांच्या कंठातून मोत्यासारख्या पाणीदार स्वरांचा पाऊस पडतो आहे व राजा आपला कंठा तोडून खऱ्या मोत्यांचा पाऊस त्याच्या मस्तका-वर पाडीत आहे! गायकाचे तिकडे लक्षही नसे. इतकेच नव्हे तर ओवाळून टाकलेले मोती गायक घेतही नसे.

रेवा संस्थानिकांच्या दरबारात **तानसेन** प्रथम नोकर होता. दिल्लीपती अकबराने तानसेनाची सुवर्णतुला केली आणि त्या सर्व सुवर्णमुद्रा रेवा नरेशाला देऊन त्या मोबदल्यात मियां तानसेन यांना दिल्लीदरबारच्या नवरत्नामध्ये मोठ्या मानाचे स्थान दिले! शहाजानने दुसऱ्या एका गायकाची रौप्यतुला केली होती. अल्लादियाखांच्या वडिलांचे मित्र व समकालीन मशहूर गायक बडे महमदखां हे राजदरबारला हत्तीवर बसून जायचे. त्यांना हजार रुपये तनखा आणि हत्तीचे वाहन असे! खुद्द अल्लादियाखां-साहेब ज्या वेळी नेपाळमध्ये नोकर झाले त्या वेळी तीनशे रुपये वेतन, नोकरचाकर, घर, शिधासामग्री आणि हत्तीचे वाहन अशी त्यांची तैनात असे. राजेमहाराजांच्या

कलासक्तीमुळे आणि औदार्यामुळे त्या काळातील संगीतकला कळसाला पोहोचली, यात संशय नाही.

## शादीखां

पूर्वीचे राजेलोक देणगी देण्यात एकमेकांशी जणू काय चुरस बाळगीत. अल्लादियाखांच्या पूर्वीच्या जमान्यात **शादीखां** नावाचे एक गायक होऊन गेले. त्या कालखंडात हे अतिशय नावाजलेले होते. एका संस्थानिकाने गायन ऐकण्यासाठी शादीखां यांना मुद्दाम बोलावून घेतले. महाराजांनी प्रथम आपल्या खासगी कमऱ्यात निवडक मंडळीसमवेत त्यांचे गायन ऐकले. अपूर्व असे गायन ऐकून महाराज व इतर सर्व अतिशय खूष झाले. मग पुन्हा दुसरे दिवशी भर दरबारात गाण्यासाठी सकाळचे प्रहरी शादीखांसाहेबांना बोलावले. रुपयांनी भरलेल्या शेकडो थैल्या जुळवून त्यांचा एक चबुतरा केला आणि वर किनखाबी नरम रुजामा पसरून त्यावर शादीखांना बसविले आणि त्यांचे गाणे ऐकले! निरोप देताना हत्तीवर हौदा घालून त्यामध्ये त्याच थैल्या ओतल्या आणि त्या राशीवर शादीखांना बसवून लवाजम्यासह त्यांना मोठ्या प्रेमाने आणि प्रतिष्ठेने त्यांच्या बिऱ्हाडाकडे रवाना केले. जाताना महाराज आढ्यतेने म्हणाले, "काय शादीखांसाहेब! इतकी मोठी बिदागी देणारा राजा तुम्ही आजन्मात प्रथमच पाहिला असेल नाही?" "जी हां हुजूर!" एवढेच उत्तर देऊन शादीखां विचारमग्न असे हौद्यात बसून राहिले. हत्ती उठून चालू लागला. बाजारपेठेतून जाताना शादीखांने ओंजळ भरभरून ते सारे रुपये दुतर्फा उधळून टाकले! साऱ्या गावभर ही बातमी पसरली आणि शेवटी महाराजांच्या कानावर गेली. संध्याकाळी शादीखां राजेसाहेबांचा अखेरचा निरोप घेण्यासाठी राजवाड्यात गेले आणि ते म्हणाले, "सरकार, माझ्यासारखा लाखो रुपयांचे इनाम घेणारा आणि ते घरी पोहोचण्यापूर्वीच उधळून टाकणारा गवैय्याही आपल्याला जन्मात पहायला मिळाला नसेल, नाही?" महाराज शरमिंदे झाले. तरीदेखील पुन्हा बरीच रकम देऊन खांसाहेबांना त्यांनी निरोप दिला. त्या काळातील राजेलोकांची कलेबाबत केवढी कदर आणि केवढे त्यांचे औदार्य! आणि त्यावरही त्यांची मात करणारी, त्या गवैय्यांची पैशाबाबतची बेपर्वाई! ते असो, पण त्यांची ती ध्रुपद-धमारची गायकी काय दर्जाची असेल याची कल्पनाही करता येत नाही.

## मानतोलखां

अल्लादियाखांचे चुलत-पणजे मानतोलखां यांचीदेखील अशीच एक कथा आहे. खांसाहेब आपले बंधू हैदरखां यांच्यासह प्रथम कोल्हापुरास नोकर झाले त्या वेळी मोगलखां तेथे नोकर होते. आणि त्यांचे पुत्र रजबअलीखां हेदेखील तेथे होते. तेव्हा हे नवीन नोकर झालेले अल्लादियाखां यांना घराणेच नाही, इत्यादी प्रवाद गायक-वादकांत फैलावू लागले. त्या अपमानाच्या चिडीने खांसाहेबांनी आपली वंशावळ व पूर्वजांनी

मिळविलेला ताम्रपट मुद्दाम मागवून घेतला आणि आपल्या अत्यंत जुन्या व प्रभावी परंपरेची शाहू महाराजांना खात्री पटविली. प्रस्तुत लेखकावर खांसाहेबांचे बंधू हैदरखां यांची विशेष मेहेरबानी होती आणि त्याला त्यांनी त्या वेळेच्या क्षुब्ध वृत्तीत आपले चुलत-पणजे, ताम्रपट मिळविणारे मानतोलखां यांची कहाणी सांगितली. ती आता सर्वांच्या परिचयाची झाली आहे. कारण 'संगीत कला विहार'च्या वाचकांकरिता मानतोलखां-साहेबांची फकीरी बाण्याची राहणी, दिनचर्या इत्यादीविषयी मजकूर अल्लादियाखांसाहेबांचे नातू अझीझुद्दीनखां यानी 'संगीत कला विहार'च्या (१ एप्रिल १९५१) अंकामध्ये सविस्तर प्रसिद्ध केली आहे. त्याची पुनरावृत्ती करण्यात स्वारस्य नाही. गायन-कलेतील एक योगिराज असेच त्यांचे वर्णन करावे लागेल. मानतोलखांच्या इतर हकीकतीपेक्षा त्यांच्या सांगीतिक गुणांचे वर्णन अल्लादियाखांचे धाकटे बंधू हैदरखां यांनी प्रस्तुत लेखकाजवळ केले ते असे. कोणताही आलाप, बोलतान किंवा गमक-तान घेतली की त्याच स्वरूपाचे तराण्याचे बोल, त्याच लयीचा व स्वरूपाचा पखवाजाचा बोल आणि समेचा मुखडा ही तिन्ही अंगे अनायास जणू काय स्वयंस्फूर्त अशी त्यांच्या कंठातून निघत! त्यांच्या प्रत्येक स्वरातून रागस्वरूप प्रतीत होत असे!

मूळ पुरुषापासून अल्लादियाखांपर्यंत ज्या अनेक पिढ्या झाल्या त्यांतील सर्वच पुरुष कंठसिद्ध कलाकार गायक होते असे दिसते. त्यांत 'पंडित' किंवा 'नायक' कोणी झाले नाहीत. किंबहुना ख्यालाची गायकी अठराव्या शतकात उत्कर्ष पावू लागली तेव्हापासून क्रियाशील संगीताचीच साधना करणारे पुरुष निर्माण झाले. शास्त्रीय पांडित्याकडे कोणी लक्ष दिले नाही. शास्त्र आणि प्रत्यक्ष कला या दोहोंतही पारंगत असणाऱ्यालाच 'नायका'चा दर्जा प्राप्त होतो असा पूर्वापर समज आहे. परंतु गोपाल नायक, बैजू बावरे, तानसेन इत्यादी ज्या दहाबारा अलौकिक पुरुषांना नायक असे संबोधण्यात येते त्यांनी संगीतावर शास्त्रीय ग्रंथ लिहिल्याचा कोठे उल्लेख नाही. मात्र त्यांनी रचलेल्या चिजा व निर्माण केलेली काही रागस्वरूपे आजदेखील गायली जातात. यावरून चिजा रचणाऱ्या व रागनिर्मिती करणाऱ्या श्रेष्ठ गायकालासुद्धा नायक ही पदवी देण्याचा प्रघात असावा असे दिसते. नायक म्हणवून घेण्याच्या योग्यतेची मानतोलखां यांनी संगीतकलेमध्ये सिद्धी प्राप्त करून घेतली होती यात संशय नाही. परंतु शाकुंतलातील मारीच आश्रमातील मुनीप्रमाणे ऋद्धिसिद्धी हात जोडून उभ्या असतानादेखील "चाले तप यांचे अजुनी" अशा तपोनिधींपैकी मानतोलखां होते. नादब्रम्हानंदात ते निमग्न होऊन राहिले होते; स्वरसागराच्या लाटांवर ते तरंगत होते. आणि त्यामुळे त्यांनी गायन-विद्येमध्ये अशी सिद्धी मिळविली होती की ज्यांना ज्यांना त्यांचे गायन ऐकण्याचा योग आला त्या सर्वांच्या डोळ्यांत अननुभूत आनंदाचे अश्रू आणि अंगावर रोमांच उठत असत. मैफलीतल्या साऱ्याच लोकांच्या डोळ्यांना पाणी येणे किंवा सर्वांच्याच अंगावर रोमांच उठणे ही अगदी अशक्य गोष्ट आहे असे अलिकडच्या लोकांना वाटते. त्यांचा या गोष्टीवर विश्वास बसत नाही. पण आपण नाटक पाहत असतो तेव्हा त्यातील काही प्रसंग

पाहताना थिएटरमधल्या साऱ्याच लोकांच्या भावना कशा एकदम उसळून येतात आणि सर्वच डोळे पुसतात किंवा सारेच टाळी देतात, हे जसे खरे तसेच आमच्या रागरागिणीतील स्वरांचे आहे. योग्य वेळी, योग्य स्थळी, योग्य त्या स्वरांचे अंश लागले म्हणजे ते प्रत्येकाच्या अंतःकरणाचा वेध घेतात; आणि असे स्वर हमखास लावता येणे हीच सिद्धी आणि ती एखाद्यालाच साधते. कारण त्याची तपश्चर्या.

उन्हामध्ये बसलेल्या एका अवलियाला बादशहाने मोठ्या दिमाखाने "काय वाटेल ते मागा—ते मी देईन" असे म्हणताच त्या अवलियाने संथपणे सांगितले की "माझ्यावरचे ऊन तू अडवीत आहेस ते अडवू नकोस, एवढंच मागणं आहे." अशा एका दंतकथेतल्या अवलियासारखीच मानतोलखां यांची वृत्ती होती. अलवारच्या महाराजांनी मोठ्या मिनतवारीने आणि मोठ्या हिकमतीने त्यांचे अद्‌भुत गायन ऐकण्यासाठी सन्मानपूर्वक मानतोलखांना अलवारला आणविले. त्यांचे गायन ऐकून राजेसाहेब उद्‌गारले, "वाटेल ते मागा; काय देऊ?" मानतोलखा म्हणाले, "मला पुन्हा बोलावू नका, माझ्या मेहनतीमध्ये व्यत्यय येतो!" तसेच जोधपूर महाराजांनी त्यांना एक गाव इनाम दिला आणि ताम्रपटही दिला. खांसाहेबानी ताम्रपट तेवढा ठेवून घेतला आणि गाव वगैरे परत केला. गवैय्याला गाव काय करायचा! मुलांनी तंटेबखेडे माजविण्याकरिता? मग विद्या कोण करणार? तंबोरा हीच गवयाची पिढीजाद मिरास! असे हे सर्वसंगपरित्यक्त संगीततपस्वी अल्लादियाखांचे चुलत पणजोबा होते. त्यांनी इनाम गाव घेतला नाही म्हणून आजपर्यंत आमच्या घराण्यात विद्या राहिली असे खांसाहेब उद्‌गार काढीत! पूर्वजांच्या गोष्टी सांगताना अल्लादियाखांसाहेब तसेच बंधू हैदरखांही तद्रूप होत असत. घराण्यातील पूर्वापर चिजांचे जसे त्यांनी जिवापलीकडे जतन केले तसेच त्यांनी पूर्वजांच्या गोष्टीचेही केले होते. ते म्हणत, "जसे गाण्याच्या काही खास चिजांवरून गवैय्याचे घराणे ओळखू येते, तसेच पूर्वजांच्या या गोष्टीवरून त्याचे खानदान ठरते. चिजांना ज्याप्रमाणे आम्ही पिढिजाद दौलत समजतो, तसेच पूर्वजांच्या हकिगती आम्ही मोठ्या अभिमानाने मिरवितो. भले, या गोष्टींना कोणी दंतकथा समजोत. पण अशा या गोष्टी ऐकूनच आपणही असे कोणीतरी व्हावे अशी ईर्षा निर्माण होते आणि विद्याभ्यासंगाचा निदिध्यास लागतो. पूर्वजांच्या गोष्टीमुळेच आतापर्यंत गायनकला थोडी तरी तग धरून राहिली आहे. शूर पूर्वजांचे पोवाडे ऐकूनच लढवय्ये बनत आले आहेत ना? राजेलोकांमध्ये धाडस वाढविणारी कवने गाणारे 'ढाढी' प्रत्येक राज्याच्या पदरी असत. स्वतःशी त्यांच्या थोरवीचे चिंतन करावे आणि त्यांच्यासारखे कष्ट करायला शिकावे." अल्लादियाखांसाहेबांनी स्वतः गायनकलेवर असेच अजस्र कष्ट केले म्हणून ते गायनमहर्षी ठरले.

## ख्वाजा एहमदखां

अल्लादियाखांच्या चौदा-पंधराव्या वर्षी त्यांचे वडील ख्वाजा एहमदखांजी यांचा अंतकाल झाला. त्यामुळे वडिलांच्या असामान्य योग्यतेची त्यांना कल्पनाही नव्हती. त्यांची चारदोन

गाणी एकली असली तरी त्या वयात गाण्यातील त्यांना समजही नव्हती. परंतु त्यांचे चुलते व गुरू चचा जहांगीरखां यांच्याकडून ऐकलेली वडिलांची हकिगत खांसाहेब सांगत ती पुढीलप्रमाणे. उनियारेवाले महाराज फत्तेसिंगजी यांची रियासत छोटीशी असूनसुद्धा शोकासाठी व इभ्रतीसाठी महाराजांच्या परिवारात खांसाहेबांचे वडील, आईच्या आणि वडिलांच्या अशा दोन्ही कुळांतील आजे इत्यादी गायक मंडळी होती. त्या जमान्यात लखनौवाले **बडे महमदखां** हे एक प्रचंड प्रस्थ होते. ते ग्वाल्हेर दरबारात नोकर असताना, महाराजांच्या पलंगाखाली लपून हद्दू-हस्सूखां[1] त्यांचे नित्य गायन ऐकत आणि अशा छुप्या शिक्षणाच्या बळावर ही जोडी भारतात पुढे अजोड ठरली! अशा योग्यतेचे हे बडे महमदखां यांचा व खांसाहेबांच्या वडिलांचा 'गुणी गुणं वेत्ति' या न्यायाचा परस्पर आदरपूर्ण ऋणानुबंध होता. दोघेही तुल्यबळी, तेव्हा एकमेकावर बसून दोघेही कधी गायले नाहीत. दोघेही आपापल्या रंगाचे 'एकमेव' ख्यातीचे गायक. ते एकमेकांचा प्रभाव जाणून होते. शिवाय ख्वाजा एहमदखां यांच्याजवळील चिजांचा अफाट संग्रह पाहून तर बडे महंमदखां चकितच होत.

सारांश, अल्लादियाखांसाहेबांचे वडील ख्वाजा एहमतखांजी त्या जमान्यात सर्वश्रेष्ठ गायकांपैकी गणले जात होते. परंतु त्यांच्या मृत्यूमुळे अल्लादियांना त्यांच्या शिक्षणाचा लाभ मिळाला नाही. गायनकलेचे खरे शिक्षण अल्लादियाखां यांना त्यांच्या चुलत्याकडूनच मिळाले. त्यांच्याविषयी खांसाहेब सांगत, "सर्वस्वी ज्यांच्या कृपाप्रसादानं मला विद्या मिळाली ते माझे गुरुदैवत म्हणजे चचा जहांगीरखांसाहेब. (हे चचा जहांगीरखांसाहेब अल्लादियाखांचे सख्खे चुलते नसावेत. चुलत चुलते किंवा चुलत भाऊही असतील. नक्की सांगता येत नाही.) जहांगीरखांच्या गायनाची आठवण झाली म्हणजे तर माझ्या डोळ्यात अद्यापी आंसू भरून येतात; मग त्यांचे गुरू गुलाम गोसखां हे काय योग्यतेचे असतील! आणि त्यांच्यापेक्षाही त्यांचे मामा व गुरू मानतोल्खां यांची गायनविद्येतील सिद्धी केवढी जबरदस्त असेल याची नुसती कल्पना केली, तर श्रोत्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहवणं त्यांना अशक्य होतं, असं वाटण्याचं कारण नाही. माझ्या गुरुदेव जहांगीरखांची व पूर्वजांची आठवण झाली म्हणजे आमच्या घराण्यातीलच काय पण एकंदरीतच संगीतकला प्रत्येक पिढीला कशी कमीकमी होत चाल्ली आहे याचं दुःख होतं."

पूर्वीसारखा राजाश्रय नाही म्हणून संगीतकलेची अवनती होत आहे असे जर कोणी या अवनतीचे कारण सांगितले तर खांसाहेबांना राग येई आणि ते आवेशाने म्हणत, "पूर्वीच्या गायकांनी विद्या संपादन केली ती काय राजाश्रयाच्या जोरावर अथवा आशेवर? मुळीच नाही. राजाश्रयाची पर्वा न करणारेच असामान्य कलाकार होऊन गेले. विद्येची तळमळ, चिकाटी आणि मेहनत नकोशी झाली हे खरं कारण आहे. त्या काळातील

१. हद्दूखां आणि हस्सूखां असे दोघे बंधू होते. या पैकी हद्दूखां हे श्रेष्ठ गायक. यांचेच चिरंजीव प्रसिद्ध रहिमतखां.

अनेक राजेरजवाड्यांनी कलाकारांची अतिशय कदर केली हे खरे; पण कलाकार बनल्यानंतर ती होत असे. पूर्वीचे लोक विद्येसाठी विद्या करीत आणि गवयाच्या घराण्यात जन्म घेतल्याचं सार्थक व्हावं म्हणून अहर्निश झटत. निरनिराळ्या बाणीचे मोठमोठे प्रथितयश गायकदेखील त्या काळात मानतोलवां किंवा तशाच योग्यतेचे इतर कोणी संगीततपस्वी असतील त्यांच्याकडे निरभिमानपणाने, विद्या शिकण्याकरिता कितीतरी वर्षे शिष्याच्या नात्याने राहत असत. स्वतःचा इतका नावलौकिक असूनदेखील विद्येकरिता हपापलेले ते लोक होते. अलीकडच्या जमान्यात अशा प्रकारचा आमचा भास्करराव (नामवंत महाराष्ट्रीय गायक कै. **भास्करराव बखले**) एकच होऊन गेला. फैजमहमदखां, नत्थनखां आग्रेवाले यांच्यासारख्या विख्यात उस्तादांचे शिक्षण घेऊन दुनियेची वाहवा घेण्याइतकी योग्यता मिळविल्यावरसुद्धा केवळ अधिक विद्या यावी म्हणून त्याने माझ्या मुलाप्रमाणं माझी सेवा केली. दोनतीन वर्षांपूर्वी पुण्यास मी गेलो होतो त्या वेळी भास्कररावाच्या मुलीला (प्रमिला) पाहिली. माझ्या डोळ्यांतून खळकन् पाणी आलं—इतका तिचा तोंडावळा बापासारखा! मुलीनं चेहऱ्याची आठवण दिली पण भास्कररावाच्या गुणाची आठवण करून देणारा कोणी नाही याचं वाईट वाटतं. तात्पर्य काय की, चिकाटीने विद्या मिळविण्याची वृत्तीच मुळी आजकाल नाहीशी झाली आहे."

खांसाहेबांच्या मातुलघराण्याचे एक पूर्वजदेखील त्यांच्या जमान्यात फार नामांकित गोहरबाणीचे गायक होते. दिल्ली व इतर दरबारात मानमान्यता संपादन करून त्या पूर्वजाने शेवटी उनियारा रियासतीत कायमचे वास्तव्य केले. त्यांची गायकी ध्रुपद-धमाराची असे. शिवाय ते बीनही उत्कृष्ट वाजवीत. उनियाराच्या राजभांडारात त्यांचे बीन ठेवलेले आहे आणि दसऱ्याचे दिवशी अद्यापीही त्या वाद्याची पूजा होत असते. अल्लादियाखां यांना बीनवादनाच्या 'खास कायद्या'ची अधिकृत माहिती या त्यांच्या मातुलघराण्याकडून मिळाली असे ते सांगत. कोल्हापुरातील त्यांच्या वास्तव्यात अल्लादियाखांसाहेबांनी एक बीनदेखील पैदा केले होते आणि थोडे दिवस त्यावर रियाझही ते करीत होते. लेखकाला तो रियाझ ऐकण्याची सहजासहजी संधी एकदाच आली होती. त्या अनुषंगाने वरील बीन-पूजनाची हकिगतही ऐकायला मिळाली. त्या वेळी कोल्हापुरात श्री. भावे या नावाचे एक बीनकार मिरवीत होते. प्रवासाच्या सोयीसाठी त्यांनी बिनाचे दोन भोपळे व मधली दांडी, असे तीन अलग तुकडे केले होते! शिवाय बीनाच्या दांडीला शेवटी असणारे मोराचे तोंडही त्यांनी छाटले होते. श्री. भावे म्हणत, बीनाची कावड घेऊन मुशाफरी करण्यापेक्षा पिशवीत भोपळे आणि हातात दांडी, हे फार सोयीचे होते! खांसाहेब चिडून म्हणत, बीनाच्या कावडीची या बीनकाराला शरम वाटते म्हणून सरस्वतीच्या मोराला छाटून आता हे भोपळ्याची पडशी खांद्यावर आणि दांडी हातात घेऊन काशीयात्रा करणार! सरस्वतीचे वाहन छाटून टाकणाराला विद्या कोठून येणार, असे ते म्हणत. बुद्धिदात्री सरस्वती हे जणू काय खांसाहेबांचे आराध्य दैवत होते. ते दैवत केवळ काल्पनिक नव्हे, परंतु साकार दर्शन देणारे तेजोमय आणि आपल्या निस्सीम भक्ताला

कसल्याही संकटातून पार पाडणारे असे अंतराळात वावरत आहे आणि मनाच्या अत्यंत मग्न अवस्थेत एकदा त्या दैवताचे दर्शन घडले अशी त्यांची भावना होती.

येथपर्यंत अल्लादियाखांसाहेबांचे मूळ पुरुष व पूर्वज यांची त्रोटक माहिती सांगितली. त्यावरून पिढीजाद गायकांच्या कुळात खांसाहेब जन्माला आले होते आणि त्यांच्या पितृकुलाचे तसेच मातृकुलाचेही पूर्वज नामवंत सांगीतिक होते असे दिसून येईल. यानंतर खांसाहेबांच्या जन्मापासूनचा कालखंड सुरू होतो.

# ४. बालपण व शिक्षण



जयपूर संस्थानामधील एका छोट्याशा जहागिरीच्या उनियारा या गावी ११-८-१८५५ रोजी अल्लादियाखांचा जन्म झाला. त्यांच्या पूर्वी झालेले प्रत्येक मूल अल्पवयात म्हणजे ४–५ वर्षांचे होऊन जात असे. शेवटी एका अवलियाने वडिलांना काही तोडगा व नित्याचार सांगितला. ओळीने चारपाच अपत्यांचा अंत पाहण्यापेक्षा कटुतर दुर्भाग्य कोणते असेल! खांसाहेबांच्या पित्याने हे व्रत पार पाडले आणि त्या अवलियाचा आशीर्वाद खरा ठरला! खांसाहेबांचे पाळण्यातील नाव गुलाम एहमद ठेवले होते; पण अल्लाने जगविलेले मूल म्हणून अल्लादिया असे म्हणू लागले. खांसाहेबांचे वडील ख्वाजा एहमदखां हे उनियारा दरबारचे नामांकित गायक होते. खांसाहेबांचे बाळपण तेथेच गेले. त्यांच्या एका काकाने त्यांना अरबी लिहिणे-वाचणे शिकविले. आठनऊ वर्षांपर्यंतच्या या वयात त्यांची आश्चर्यजनक प्रगती झाली. नंतर फारसी शिक्षण एका उस्तादाकडून देण्यात आले. या सुमारास त्यांच्या वडिलांना टोंक दरबारात बहुमानाची नोकरी मिळाली. तेथे एका गृहस्थापाशी अल्लादियाखां यांनी कुराणग्रंथाचे अध्ययन केले. त्यामुळे लिहिण्यावाचण्याचाच मनस्वी छंद लागला. कोल्हापुरात एकदा खांसाहेब चिजा लिहून काढीत होते. तेव्हा प्रस्तुत लेखकाने त्यांच्या अक्षराची प्रशंसा केली; तेव्हा ते उद्गारले, "लहानपणी लिहिण्यावाचण्याचं इतकं व्यसन होतं की, त्या पायी वडील मंडळींचा कित्येकदा मारदेखील खावा लागत असे. याचं कारण, जुजबी जरूर तेवढं लिहितावाचता आलं म्हणजे गवयाच्या पोराला पुष्कळ झालं! गाणंबजावणं हा मुख्य पिढीजाद पेशा. तोच आपला कुलाचार, तीच आपली खरी विद्या, व धन-दौलत. लिहिणे-वाचणे ही काही मोठी जरुरीची बाब आहे हे मानायलाच घरातील वडील मंडळी तयार नसत. मुलाला शाळेला धाडायचेदेखील त्यांना संकट वाटे!" पण संगीतविद्येपुढे लिहिण्यावाचण्याच्या विद्येलाही तुच्छ मानणारी आणि सरस्वतीची खरी उपासना संगीतानेच होते अशी दृढभावना बाळगणारी ही पिढीजाद घराणीच असामान्य गायक निर्माण करू शकली. त्यांच्या अज्ञानाबद्दल व अशिक्षितपणाबद्दल त्यांना कमीपणा देणे किंवा त्यांना निर्बुद्ध समजणे म्हणजे मेघदूत काव्यामधील मेघातील पाण्याचे पृथक्करण कोठे केलेले नाही म्हणून कालिदासाला तुच्छ मानणाऱ्या एखाद्या विज्ञान-पंडिताच्या दर्पोक्तीप्रमाणेच असमंजसपणाचे

होईल. पिढीजाद सांगीतिकांच्या ठिकाणी उमाप बुद्धिमत्ता होती आणि ती त्यांनी सर्वस्वी संगीत कलेप्रीत्यर्थ राबविली, म्हणून तर भारतीय गायन-वादन व नृत्य या कला त्यांनी शिखराला पोहोचविल्या. व्यवहारनैपुण्य किंवा पुस्तकी पांडित्य इत्यादींचा संगीत-साधनेला उपयोग न होता उलट उपसर्गच होतो असा त्यांना अनुभव आला असल्यास नवल नाही. आजही तोच अनुभव आहे. पुस्तकी पांडित्य भरपूर गळी उतरलेल्यांच्या कंठातून रसदार संगीत क्वचितच बाहेर पडते.

## आग्र्याचा प्रवास व सूरसिंगार

वयाच्या १४-१५ व्या वर्षी त्यांच्या एका चुलत्याबरोबर टोंकहून आग्र्यास जाण्याचा अल्लादियाखांना योग आला होता. हे त्यांचे चुलते पुढे पंधरा वर्षांनी खांसाहेबांचे सासरे झाले. रामपूरचे नबाब कल्बेअलीखां हे आग्र्यास आले होते. हे संगीताचे केवळ षोकीच नव्हे तर ज्ञानीही होते. शेकडो, हजारो चिजा त्यांना आणि त्यांचे बंधू कल्लनखां यांना मुखोद्‌गत होत्या. या नबाबसाहेबांच्या खास निरोपावरून चचा चम्मनखां यांना आग्र्यास यावे लागले. बरोबर त्यांनी पुतण्यालाही नेले. नवाबसाहेबांचे उस्ताद बहादुर-हुसेनखां—एकमेव असे सूरसिंगारवादक—हे त्यांच्याबरोबर आग्र्यास आले होते. सहजगत्या नबाबसाहेबांना भेटायला जाताना चचा चम्मनखां अल्लादियांना घेऊन गेले. त्या वेळी नबाबसाहेबांना बहादुरहुसेनखांसाहेब सूरसिंगार हे वाद्य ऐकवत होते. पहिल्याच मुशाफिरीमध्ये पहिल्याच मोक्याला हे दिव्य वादन खांसाहेबांच्या कानावर पडले. खांसाहेब सांगत की, बहादुरहुसेनखांसाहेबांच्यासारखे सूरसिंगार काय, पण दुसरे कसलेही तंतुवाद्य आपण उभ्या आयुष्यात कधी ऐकले नाही. बहादुरहुसेनखां केवळ अलौकिक कलाकारच नव्हते; ते त्या कसबी जमान्यामध्ये 'नायक' पदवीला पोहचले होते आणि सर्व गुणीजनांनी तसा त्यांना मानही दिला. तानसेन, गोपाल, बैजूबावरे इत्यादी दहा-बारा नायकच त्यांच्यापूर्वी होऊन गेले. चिजा बांधण्यात, संगीत-शास्त्रात आणि प्रत्यक्ष गायन-वादनात जे पूर्णपणे पारंगत, त्यांनाच 'नायक' म्हणतात. अशा दर्जाचे हे बहादुरहुसेनखां होते. सूरसिंगार हे वाद्य त्यांच्याबरोबरच नष्ट झाले असे सर्व कलावान सांगतात. रामपूरच्या नबाबांनी एक लाख रुपये गुरुदक्षिणा देऊन बहादुर-हुसेनखांचा गंडा बांधला होता आणि नायकाच्या पदवीला पोहोचलेल्या या कलासंपन्न विभूतीला प्रसन्न ठेवण्यासाठी पुढे लाख दोन लाख रुपये आनंदाने खर्चले. केवढे त्या काळचे ते कलावान आणि कलेची कदर व आवड असलेले केवढे ते राजे! पुढील जमान्यातील व आजकालचेही अनेक राजे कलेची कदर करणारे निपजले; नाही असे नाही. पण त्यांची कलादृष्टी शर्यतीतील चतुष्पादांच्या चापल्यावर आणि उंच टाचांच्या विलासावर केंद्रित झालेली असते! शर्यती घोडा हा सूरसिंगार व जॉकी हे गुरुदैवत!

खांसाहेबांचे धाकटे चुलत-चुलते चम्मनखांसाहेबांबरोबर ही जी आग्र्याची सफर झाली त्या वेळी अलिगढ, अत्रोली इत्यादी ठिकाणी अनेक नामवंत गायकांची गाणी

खांसाहेबांच्या कानावरून गेली इतकेच. चौदा-पंधरा वर्षांचे वय आणि गायनाऐवजी लिहिण्यावाचण्याकडे ओढा; तेव्हा गाण्याची समज कितीशी असणार? घरच्या वडील-धाऱ्या मंडळींनी जुलुम–जबरदस्तीने ध्रुपद सांगावे, ते या मुलाने अंथरुणावर पडल्यापडल्या अर्धवट झोपेत म्हणावे, अशी ही तालीम! वडिलांची तर मुळीच तालीम नाही. नवसाने लाभलेले मूल म्हणून वडिलांनी त्याच्या कलाप्रमाणे त्याला वागू देणे साहजिकच होते. सुमारे पंधरा वर्षे वयापर्यंत गायनविद्येकडे दुर्लक्ष करणारा हा मुलगा पुढे संगीत–विद्या-पारंगत होऊन त्या कलाक्षेत्रातील उच्चतम पदवीला पोहोचावा ही एक कल्पनातीत अद्भुत घटना म्हणावी लागेल; किंबहुना हा एक विचित्र ईश्वरी संकेत होता असेही वाटेल. परंतु त्यात केवळ दैवाची लीला नसून मनुष्याचे कष्ट होते. जेवढ्या जिव्हाळ्याने व एकतानतेने त्यांनी अरबी-फारसीचा अभ्यास केला, सुंदर हस्ताक्षर घटविले, त्याच्या शतपट कष्टाने व तन्मयतेने अल्लादियाखांनी संगीतविद्येची उपासना व आराधना केली. सौंदर्यदृष्टी आणि प्रज्ञा या दोन देणग्या मात्र ईश्वरदत्त होत्या आणि त्यामुळे त्यांच्या कष्टांना एक प्रकारची नवीनच संपन्नता प्राप्त झाली. कारण, सौंदर्यदृष्टीवाचून कष्ट आणि प्रज्ञेवाचून पाठांतर ही दोन्ही कलेच्या क्षेत्रात निष्फळ ठरतात.

अल्लादियाखांसाहेबांचा पुढील वृत्तांत सांगण्यापूर्वी या त्यांच्या दौऱ्यातील त्यांनी सांगितलेला एक प्रसंग, खांसाहेबांच्या मनावर विशेष परिणाम करणारा, सांगणे आवश्यक आहे. कोल्हापुरास, रजबअलीखांचा धाकटा भाऊ होता. बालआवाज विलक्षण चमक-दार आणि तयार होता. प्रस्तुत लेखकाने त्या मुलाचे गाणे अनेकवार ऐकले होते. खांसाहेबदेखील त्या मुलाच्या गायनावर खूष होते आणि एकदा ते म्हणाले, हा मुलगा तर चांगलाच आहे, पण सिकंदरवाल्यांच्या कुद्रतुल्ला–अज्मतुल्ला या दोन मुलांसारखी आवाजदार आणि तयार मुले आपण कोठेही ऐकली नाहीत. या मुलांचा बाप सिकंदरवाला हा आपल्या मुलांच्या असामान्य कर्तबगारीमुळे व वाढत्या कीर्तीमुळे मस्त व मगरूर बनला होता. अलिया–फत्तूसारख्या त्या वेळी अजोड जवानांच्या जोडीलादेखील या सिकंदरवाल्यांच्या जोडीचे गायन ऐकून मागच्या पावली पळ काढावा लागला होता! मग बापाच्या मस्तपणाला काय ठिकाणा! त्याने एका मैफलीत वयोवृद्ध **तानरसखां** (गायनाचे जणू काय अवतार) गायल्यानंतर मैफलीचा सर्वमान्य संप्रदाय झुगारून आपल्या मुलांना ईर्षेने गायला बसविले. चमत्कार असा की, या दोन पठ्ठ्यांनी तानरसखांच्या अत्यंत रंगलेल्या गाण्यावर पाणी फिरविले. पित्याचा गर्व गगनात मावेना! त्याच मैफलीत तानरसखां आवेशाने उद्गारले की "खुदाची कृपा होवो आणि वडील माणसांची बेइज्जत करण्याची वेळ तुमच्या मुलावर पुन्हा कधी न येवो." योगायोग असा की थोड्या दिवसांनी या जोडीपैकी अधिक तेजस्वी अज्मतुल्ला एकाएकी वारला! तानरसखांची शापवाणी बाधली, अशी त्या वेळच्या गुणिजनांना दहशत बसली!

"हा एक अनिष्ट योगायोग!" असे म्हणताच खांसाहेब म्हणाले, "तानरसखांच्या शापाने अज्मतुल्ला वारला, असा गाणाऱ्यावाजविणारांचा हा दावा इतरांना न पटो; पण

मला पटला खरा बाबा! वडिलांची बददुआ बाधल्याशिवाय रहात नाही. कसेही असो, पण वाडवडिलांनी घालून दिलेले मैफलीचे कायदे न पाळून वयस्कांना दुखवणं केव्हाही श्रेयस्कर नसतं. त्यांच्याच आग्रहानं एखाद्या वेळी आणि एकंदर मैफलीच्या कायद्याला मुरड घालणं निराळं आणि ईर्षा बाळगून असलं काम करणं निराळं. बरोबरीच्या वयाचा आणि योग्यतेचा गायक असता तर **तानरसखांनी** त्याच्याशी केव्हाही सामना दिला असता. पण या पोराबरोबर सामना देण्यात त्यांचाच कमीपणा झाला असता. म्हणून वडील गायकानंतर त्यांची व मैफलीची परवानगी घेतल्यावाचून लहानांनी सहसा गाऊ नये. शाप नाही बाधला तरी गुणिजनांचा तिरस्कार जन्मभर बाधतो."

अल्लादियाखांसाहेबांच्या पन्नाशीपुढील वयातील हे विचार ऐकले असता त्यांच्या पंधराव्या वर्षी घडलेल्या वरील गोष्टीचा त्यांच्या मनावर कायमचा परिणाम झाला होता असे म्हणावे लागते. शिवाय त्या काळातील श्रद्धाशीलांच्या अहर्निश सहवासामुळे खांसाहेबांच्या मनाची बैठक, पूर्वजांविषयी व वडील माणसांविषयी अलोट आदर, गुरुजनांवर निस्सीम भक्ती व देवदेवता, साधुसंत, यतीयोगी आणि वली-अवलिये यांच्यावरची श्रद्धा, अशा अनेक भावनांवर आधारलेली होती. असो. आग्रा, अत्रोली वगैरे ठिकाणांची ही सफर आटपून परत टोंक येथे घरी आल्यावर अल्लादियांचे पुनश्च अरबी, फारसी शिकणे सुरू झाले. पण थोड्याच दिवसांनी टोंक येथे त्यांच्या वडिलांचा अंतकाल झाला. त्यांचे वय सुमारे ऐंशी वर्षांचे होते. संगीत-मंदिराचा एक आधारसंग्रह-स्तंभ कोसळला. कारण ख्वाजा एहमदखांइतका चिजांचा संग्रह इतर कोणाकडेही नव्हता.

## जहांगीरखां

शाळेत जाणारे अल्लादिया १५ वर्षांचे आणि पाठीवर दोन बहिणी, एक छोटा भाऊ हैदरखां, मातोश्री आणि दोनतीन नातलग–असे सातआठ माणसांचे कुटुंब चालविण्याची जबाबदारी अचानक त्यांच्यावर येऊन पडली. अशा या परिस्थितीत त्यांनी विचार केला की, फारसी शिकून आपण कितीही जाडे विद्वान झालो तरी दहापंधरा रुपये दरमहाची मास्तरकी करण्यापलीकडे आपली मजल जाणार नाही. त्यापेक्षा आपल्या घराण्यातली आपल्या हकाची विद्या शिकलेले काय वाईट? ताबडतोब त्यांनी फारसी शिकण्याचा नाद सोडून दिला. चुलते चचा **जहांगीरखांही** त्या वेळी त्यांच्या वडिलांकडे शिकत असत. यामुळे ते टोंकमध्येच होते. तेव्हा त्यांच्यापाशी गायनविद्या शिकण्याचे अल्लादियांनी ठरविले. जहांगीरखां यांनीही ते मान्य केले आणि येथूनच अल्लादियाखांचा व संगीताचा संबंध जडला. शिवाय, जहांगीरखांना अल्लादियाखांच्या वडिलांकडून अखेरपर्यंत गायनाची व शेकडो चिजांची तालीम मिळाली होती. तेव्हा घराण्याच्या गायकीत फरक पडण्याचाही प्रश्न नव्हता. वडिलांच्या जातीचीच तालीम मिळणार होती. अल्लादियाखां जहांगीरखांचे वर्णन सद्‌गदित होऊन वारंवार करीत. "एकेक स्वर लागला म्हणजे कुतुबमिनारसारखे जणू काय स्तंभ उभारले आहेत असे वाटे. गमकेचे उपजअंग सुरू झाले म्हणजे उफाळलेल्या

दर्यावर लाटा नाचत आहेत असा भास होई. चिजांचा भरणा तरी केवढा! माझ्या वडिलांना कोठीवाले गवयी म्हणत; त्यांच्या संग्रहातील चिजांची गणतीच नव्हती. पण जहांगीरखां चचांना निदान अठरा-वीस हजार चिजा मुखोद्गत होत्या. फार काय, भाई दौलतखां (माझे सर्वांत मोठे चुलते नत्थूखां यांचे मुलगे) यांना चौदा-पंधरा हजार चिजा पाठ आहेत! दुसऱ्याचं कशाला—मला दहाबारा हजार चिजा पाठ आहेत; त्यांच्या मानाने काहीच नाही." आजकाल जर हे कोणाला सांगितलं तर ते त्यांना खरं वाटत नाही. इतक्या चिजांचं पाठांतर शक्य नाही म्हणतात. पण अमरकोश, कौमुदी, गीता, काव्य, कवनं, वगैरे ग्रंथच्या ग्रंथ एकेकाला मुखोद्गत असलेले विद्वान पंडित आपण पहात आलो आहोत ना! त्यांच्या पाठांतरांचा आकडा केवढा तरी प्रचंड होईल. मग हजारो चिजा पाठ असण्यात अशक्य काय आहे? खांसाहेबांचे, बसल्या बसल्या लिहून काढलेल्या चिजांचे भागवताच्या पोथीएवढे बाड लेखकाने स्वतः पाहिले आहे. तरीदेखील, खांसाहेब म्हणत, अर्ध्याअधिक चिजा लिहायच्या राहिल्याच आहेत! त्या चिजा तर त्यांच्याबरोबरच गेल्या. पण लिहिलेल्या चिजांचा उपयोग तरी कुणाला आहे? अलीकडे पुस्तकी ज्ञानाने रागरागिण्यांचे स्वरूप कळू लागले आहे. तेव्हा प्रत्येक रागात एखादीदुसरी चीज पाठ केली म्हणजे गवयी बनता येते. पण खांसाहेबांच्या वेळी रागविद्या, स्वरविद्या, तालविद्या यांचे ज्ञान अनेक चिजा प्रत्यक्ष गायला शिकवूनच देण्यात येत असे. गुरूने रागांचे चलन समजावून सांगितले तरी ते नानाविध चिजांच्या पठणानेच आत्मसात होऊ शकते. केवळ वर्ज्यावर्ज्य आणि वादीसंवादी माहीत झाले म्हणजे रागाची सारी अंगे समजत नाहीत, अर्थातच ती वठवताही येत नाहीत.

जहांगीरखां यांची तालीम घेण्याचे ठरल्यामुळे खांसाहेबांची सर्वच मंडळी टोंक सोडून उनियारा येथे राहू लागली. थोड्याच दिवसांनी जहांगीरखांनी अल्लादियांना आपल्याबरोबर प्रथम बुंदीस व काही दिवसांनी उदेपुरास नेले. खांसाहेबांचे दुसरे दोन चुलत बंधू दौलतखां (प्रसिद्ध ध्रुपदिये) व अलीअकबरखां हे प्रथमपासूनच जहांगीरखांपाशी शिकत होते व त्यांनाही बरोबर आणले होतेच. जहांगीरखांचे धाकटे बंधू चम्मनखां हे उदेपुरच्या दरबारात नोकर होते. अल्लादियाखांची व्यवस्थित व दीर्घकाल अशी तालीम उदेपुरासच झाली. गुरू ख्वाजा एहमदखां यांच्या मागे त्यांच्या सर्व कुटुंबाची उनियारा येथे व्यवस्था करून त्यांच्या पुत्राच्या शिक्षणाच्या उद्देशाने, हे वात्सल्यमूर्ती जहांगीरखांसाहेब घर सोडून पुतण्यासह आपल्या धाकट्या भावाच्या घरी उदेपुरास येऊन राहिले असावेत असे वाटते. केवढी ही कृतज्ञबुद्धी व कर्तव्याची जाणीव!

खांसाहेबांच्या संगीतशिक्षणाची काय गोष्ट सांगायची! विहिरीत उगवलेल्या रोपाला पाण्याची काय कमतरता! जहांगीरखांसारखा समृद्ध गुरू आणि अल्लादियासारखा कृतनिश्चयी व कष्टाळू शिष्य! शिवाय अष्टौप्रहर गुरुशिष्यांचे सान्निध्य. सुमारे बारा वर्षे जहांगीरखांकडून खांसाहेबांना तालीम मिळाली असेल; आणि ती सकाळ-संध्याकाळ मिळून किमान पक्षी दररोज सहा तास! खांसाहेबांची बुद्धी व धारणाशक्ती असामान्य

आणि कंठ स्वरेल, गोड व लवचिक असल्यामुळे दररोज दहापाच ध्रुपदे त्यांना सहज कंठगत होत. अशा रीतीने गुरूसमक्ष आत्मसात झालेली चीज ते जन्मभर विसरले नाहीत. अगदी अखेरअखेरच्या दिवसांत. पंचाऐंशीच्या पुढेदेखील चिजेचे बोल, रागाचे सूक्ष्मस्वरूप आणि लयीचा झोक, या तिन्ही बाबतींत त्यांचे अवधान कधी सुटले नाही, याचा प्रत्यक्ष अनुभव प्रस्तुत लेखकाने घेतला आहे. यावरून तारुण्यात त्यांची स्मृती आणि धारणा-शक्ती किती विलक्षण असेल याची कल्पना करता येते. खांसाहेब त्या वयात तरी एकपाठी असावेत.

पहिली चारपाच वर्षे तर आपण नुसते ध्रुपद-धमार शिकलो; गळ्यातून तानपलटे काढावयाची मनाईच होती, असे खांसाहेब सांगत आणि तीच प्रथा त्यांनी स्वतःच्या पुत्रांच्या तालमीबाबत कसोशीने पाळली होती.

पहिल्या चारपाच वर्षांतील ध्रुपद-धमाराच्या तालमीमुळे स्वराची दृढता, रागांचा सच्चेपणा आणि लयीचा पक्केपणा गळ्याला पूर्णपणे निभावतो अशी जहांगीरखांची खात्री झाल्यानंतरच त्यांनी अल्लादियांना ख्याल शिकविण्यास सुरवात केली. म्हणजे स्थूलमानाने हिशेब केला तर येथपावेतो सातआठ हजार ध्रुपद-धमाराच्या चिजा खांसाहेबांना कंठगत झाल्या असाव्यात. अर्थात या चिजा अनेक रागांच्या व निरनिराळ्या तालांतील असणारच. सारांश, वयाच्या वीसएकविसाव्या वर्षी खांसाहेबांना पाचसात हजार चिजांच्या द्वारे, मामुली, मुष्कील, जोड आणि अनवट अशा बहुतेक रागांची सर्वांगीण स्वरूपे यथातथ्य आत्मसात झाली होती, असे म्हणायला हरकत नाही. परंतु ही कमाई केवळ चिजांची संथा घेऊन किंवा पाठांतर करून होण्यासारखी नसते. त्या कामी निदिध्यासही पाहिजे आणि विद्यासंपादन करण्याचा निग्रहपूर्वक निदिध्यास हे गुरुमुखा-इतकेच आवश्यक साधन असते. गुरुमुखातून रत्ने मिळतात परंतु निदिध्यासाने त्यांना पैलू पडतात. गुरू जहांगीरखांपासून नित्य पाचसहा तास तालीम मिळाली तरी तितकाच काळ अल्लादियाखां त्या चिजांचे मनन व गुंजन करण्यात घालवीत. [सुमारे चाळीस वर्षांपूर्वी प्रस्तुत लेखक नुकताच नाटक-व्यवसायात पडला होता. त्या वेळी 'मानापमान' नाटकातील पदात गाण्याकरिता काही त्यांच्या अभिनव पद्धतीचे तानपलटे शिकण्याच्या हेतूने खांसाहेबांकडे सुमारे तीन आठवडे दररोज जात असे. त्या वेळी त्यांचे नेहमी सांगणे असे की, माझ्यासमोर हे पलटे आल्यासारखे वाटले तरी त्यांच्यावर सारखे मनन व रियाझ पाहिजे. आठ आणे शिक्षण आणि आठ आणे स्वतःचे मनन (म्हणजे निदिध्यास) असावे तेव्हा त्यातील दोन आणे वेळेवर काम देतात. माझ्या बचपणात मी हेच केले. मी कोठेही असलो तरी, अगदी आगगाडीच्या प्रवासातदेखील चाकांच्या लयीत माझे मनन व गुंजन चाले. पुढे मुशाफरीत धर्मशाळेमध्ये उतरलो तरी माझी मेहनत कधी बंद पडली नाही.]

पुढील सातआठ वर्षे ख्याल-गायकीचे शिक्षण खांसाहेबांना मिळाले. शिवाय त्यांचे चुलत बंधू दौलतखां यांच्या ध्रुपद गायकीच्या तालमीच्या वेळीही खांसाहेब न चुकता

बसत. आता ऐकूनदेखील ह्या गायकीचा झोक व वैशिष्ट्य आकलन करण्याइतकी त्यांची बुद्धी प्रगल्भ व संस्कारसुलभ झाली होती. जहांगीरखांच्या मागे तंबोरा घेऊन मध्येच एखादा आलाप किंवा तान घेण्याइतका आत्मविश्वास त्यांना वाटू लागला होता. जहांगीरखांनी एखादी सुंदर वलयेचांची तान घेतली तर तशीच तान घेण्याचा प्रयास करावा! आणि ती बिघडली म्हणजे भर मैफलीत थप्पड खाण्याचीही परवा करू नये! सारांश, आपली विद्या लोकांपुढे मांडण्याची आतुरता वाटण्याइतकी त्यांची प्रगती असावी. याखेरीज चचा, मामा, नाना, भाई वगैरे घराण्यातील दूरचे नातलगदेखील खांसाहेबांच्या धारणाशक्तीवर आणि चलाख बुद्धीवर खूष होऊन अनेक चिजा त्यांना शिकवीत असले तर नवल नाही. परकी घराण्याचे **मुबारक अलीखां**—'गायनदेवता'—यांनी बेटा अल्लादियाला शिकवून तयार करण्याची उत्कट मनीषा अनेक वेळा दर्शविली. परंतु परकी घराण्याचा शागीर्द बनणे म्हणजे स्वतःच्या घराण्याच्या विद्येला कमीपणा आणणे, असा सर्वच वडीलधाऱ्या मंडळींचा तीव्र विरोध झाल्यामुळे इच्छा असूनही खांसाहेबांना त्यांची तालीम घेता आली नाही. खांसाहेबांना शेवटपर्यंत या गोष्टीची मनस्वी खंत वाटत असे.

इतकी भरपूर तालीम झाली असूनसुद्धा मैफलीमध्ये स्वतंत्रपणे गाण्याची त्यांना अद्याप-पावेतो जहांगीरखांनी परवानगी दिली नव्हती. पुढे मैफलीत मोठमोठ्या गायकांचा जेव्हा कौतुकाने फार आग्रह होऊ लागला तेव्हा चुकून कधीतरी स्वतंत्र गाण्यास मुभा मिळू लागली. गाणे कितीही सुंदर झाले, सर्वांच्याकडून कितीही वाहवा मिळाली, खुद्द जहांगीरखां मनात कितीही खूष झाले असले तरी अल्लादियांची ते चांगलीच हजेरी घेत! शिष्याच्या तोंडावर त्याची तारीफ गुरूने सहसा करू नये; गुरूच्या प्रशंसेचे पर्यवसान व्यासंगाच्या समाप्तीत होते असे त्यांचे मत होते!

अल्लादियाखांनी मात्र गुरुजींच्या या हेटाळणीचा किंवा नाराजीचा आपल्या मनावर यत्किंचितही परिणाम होऊ दिला नाही की आपल्या अलोट गुरुभक्तीत व आदरभावनेत तिळमात्रही न्यून पडू दिले नाही. गुरूच्या हातचे किंवा वाचेचे प्रहार हे शेवटी प्रच्छन्न आशीर्वादच असतात असे ते म्हणत. खांसाहेबांच्या एकंदरीत बोलण्यावरून, जहांगीरखां यांच्याकडे ते एक घरातील वयोवृद्ध व वडिलांचे ठिकाणी होऊन केवळ आपला संभाळ करणारे शास्ते आहेत अशा भावनेपेक्षा आपल्या महद्भाग्याने मिळालेली अशी अथांगविद्यासंपन्न गुरुमाऊली आहे या भावनेने खांसाहेब पाहत असत. ऐन विशी-बाविशीच्या वयात चुकून एकदा खांसाहेब काही चंगीभंगी दोस्तांबरोबर कुठेतरी भटकून बऱ्याच उशिराने घरी आले. जहांगीरखांसाहेबांना असली संगत वावगी वाटली. त्यांनी दुसरे काही केले नाही; अल्लादियांच्या मस्तकावर पायातल्या चढावाच्या प्रहारांचा नुसता वर्षाव केला. मस्तक जमिनीला टेकले तरी या मुलाने हूं की चूं केले नाही, की केविल-वाण्या मुद्रेने प्रतिकारही केला नाही. शेवटी त्यांच्या आईने त्यांना सोडवून घेतले! समजुतीच्या वयात मिळालेले हे अत्यंत अप्रतिष्ठेचे पारिपत्य खांसाहेबांची अपार गुरुभक्तीच सहन करू शकली. खांसाहेब म्हणत की आचार-विचार, विद्या, कला, प्रतिष्ठा वगैरेंबाबत

मी जी काही कमाई केली आणि दुनियेत जी काही मानमान्यता मला मिळाली त्या सर्वांचे श्रेय माझ्या डोकीवर पडलेल्या माझ्या गुरुमाऊलीच्या जूते-प्रहारांना आहे. नाही तर मी कसल्या लोकांच्या संगतीला लागलो असतो आणि माझं काय झालं असतं, कोणी सांगावं!

इतके प्रहार सोसूनसुद्धा, दुसरे दिवशी खांसाहेब पूर्वीच्याच उत्साही मुद्रेने तालमीस येऊन बसले! जहांगीरखांनी त्यांचे मस्तक प्रेमाने कुरवाळले! कसोटीला उतरलेल्या या शिष्याला हे कुरवाळणे पुढील उत्कर्षाचे जणू काय प्रसादचिन्हच वाटले तर नवल काय? तेव्हापासून गुरुआज्ञेवाचून घराबाहेर त्यांनी पाऊल टाकले नाही. स्वतः तालीम घेणे, दौलतखां इत्यादिकांच्या तालमी लक्षपूर्वक ऐकणे, जहांगीरखांच्या बरोबर राहून त्यांच्या बरोबरीच्या थोरथोर गायकांच्या बैठकीत होणारी संगीतविषयक चर्चा आणि गायनवादन ऐकणे, जहांगीरखांनी "आता झोपायला जा" म्हटल्यानंतरच त्यांच्या समोरून उठणे, अशी आपली दिनचर्या खांसाहेबांनी ठेवली. थोड्या दिवसांनंतर जहांगीरखां त्यांना स्वतंत्र अशी रात्री बारा वाजेपर्यंत तालीम देऊ लागले. हा खास शिक्षणाचा क्रम सातआठ वर्षे अव्याहत चालू राहिला. आणि याच कालखंडात ख्यालाच्या असंख्य चिजा, अनेक अनवट राग, त्यांची सूक्ष्म लक्षणे, त्यांतील सौंदर्यस्थले, मांडणीचा झोक, विस्तार वगैरेंचे साद्यंत शिक्षण खांसाहेबांना मिळाले. शिवाय त्या जमान्यातील जयपूर, जोधपूर, उदेपूर इत्यादी अनेक दरबारांना विभूषित करणारे असे कितीतरी थोरथोर कलावान त्यांना ऐकायला मिळाले व त्यामुळे त्यांच्या प्रगल्भ बुद्धीवर अनेक प्रकारचे सुंदर संस्कार घडणे साहजिकच होते.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे, आपल्यापेक्षा वयाने, व्यवहाराने व विद्येने श्रेष्ठ अशाच मंडळींत मोकळा वेळ घालविण्याचे खांसाहेबांना जणू काय व्यसनच जडले. त्यामुळे शालीनता व प्रतिष्ठितपणा हे गुण त्यांच्या अंगी त्या संस्कारसुलभ वयामध्ये पूर्णपणे बाणले गेले. तसेच विद्येच्या व कलेच्या उन्मादाचा संपर्क त्यांच्या वृत्तीला जन्मभर झाला नाही. कोल्हापुरातील खांसाहेबांची भर जोषातली गाणी प्रस्तुत लेखकाने अनेकदा ऐकली. त्या प्रत्येकात विविधता, विद्वत्ता, सौंदर्य इत्यादी गुण त्या त्या वेळी प्रत्ययास येतच; परंतु एक गाणे असे काही अपूर्व झाले की, इतर सर्व आल्हादकारक कल्पना बाजूस राहिल्या आणि अशा या गायनविभूतीला केव्हातरी मृत्यू येणार आणि मग गायनकला कितीशी उरणार या अनिष्ट विचाराचे काहूर लेखकाच्या मनात माजले. दुसरे दिवशी खांसाहेबांना जेव्हा हे अनिष्ट विचार, त्यांची तारीफ करणाऱ्या शब्दांत परंतु विषण्ण मुद्रेने सांगितले त्या वेळी ते म्हणाले, "गोविंदरावजी, देव तुम्हांला सुखी ठेवो. माझ्यासारख्या नाचीज माणसाबद्दल तुम्ही हळहळता! पण ज्या पूर्वीच्या प्रचंड गवयांना मी ऐकले आहे त्यांच्या-बद्दल मी मग किती अश्रू ढाळावेत? ईश्वरसाक्ष, मी त्यांच्यापुढे खरोखरच एक नाचीज आहे. माझे नाना होते त्यांच्यासारखी स्वर लावण्याची आणि आलापचारीची परिणामकारक पद्धती, पुष्कळ प्रयास करूनदेखील मला, साधली नाही. माझे उस्ताद जहांगीरखां यांची उफाळलेल्या दर्यासारखी गमक माझ्या गळ्याला झेपली नाही. शिवाय हद्दूखां,

तानरसखां, मुबारक-अलीखां वगैरेंच्यापुढे मी काय चीज आहे?" सारांश, हे अलौकिक गायक जरी दिवंगत झाले होते तरी त्यांच्या कल्पनातीत गुणांच्या स्मृतीचा भार खांसाहेबांच्या शिरावर कायमचा राहिला होता. नौकाविहार करताना बादशहाने मोठ्या गौरवाने तानसेनाला म्हटले, "मिया तानसेनजी! संगीतकला तुमच्यामध्ये ओतप्रोत भरली आहे, नाही?" तानसेनांनी नदीप्रवाहात करंगळी बुडवून बाहेर काढली आणि तिच्यातून पाण्याचे दोन थेंब गळले; त्या वेळी तानसेन उद्गारले "माझ्या गायन-गंगेतले मला एवढेच दोन थेंब मिळाले आहेत!" स्वमुखाने शेखी मिरवली असती तरी तिचे कौतुक बादशहाने खास केले असते; परंतु गुरुजनांच्या अपरंपार विद्येची स्मृती, शेखी मिरवण्याचे पातक कसे करू देईल?

गुरूच्या मुखाने चिजांची संथा, गुरूच्या समक्ष मेहनत आणि गुरूच्या सान्निध्यात कालक्षेप असे भाग्य त्या काळात बहुतेक गायकांच्या मुलांच्या वाट्यास येई. कारण ती स्वतःचीच किंवा निकट आप्तांचीच मुले असत. घराण्याची विद्या पुढील पिढीमध्ये उतरली तरच घराण्याचे अस्तित्व टिकेल या भावनेमुळेच संगीताची परंपरा कित्येक पिढ्या टिकून राहिली. शिवाय राजेरजवाड्यांच्या रसिकतेमुळे व भरपूर आश्रयामुळे मनमुराद व्यासंग करून नाव मिळविणे आणि उतारवयात पुढील पिढीला शिक्षण देणे यावाचून त्या काळातील कलावंतांना इतर ध्येय किंवा इतर उपाधी नव्हती. पुत्राकडे आपल्या घरादाराचा किंवा जिंदगीचा वारस या दृष्टीने न पाहता मुख्यत्वे आपल्या विद्येचा वारसा त्याला ते बहाल करीत. कलासंपादनाच्या बाबत तो जर बेफिकीर किंवा नालायक ठरला तर निपुत्रिकाइतके त्यांना दुःख होई.

आता जहांगीरखांसाहेब अगदी म्हातारे झाले होते. आपल्या शिक्षणाचे सार्थक करणाऱ्या अत्यंत आज्ञाधारक व विद्यासंपन्न अल्लादियाखांना जयपुरास ठेवून त्यांना उनियारास कायमची विश्रांती घेण्याकरिता जाणे भाग पडले. परंतु तेथे गेल्यावरदेखील अल्लादियांचे धाकटे बंधू हैदरखां यांना तालीम देण्याचा त्यांनी क्रम सुरू केलाच! पुढील पिढीतील एहमतभैय्या, भूर्जीभैय्या यांसारख्या अल्पवयी मुलांनादेखील मुद्दाम पहाटे जागे करून ते गायला बसवीत. या घराण्यातील सर्व मुलांना शिक्षण देण्यासाठीच जणू काय त्यांनी जन्म घेतला होता. स्वतः अत्युच्च दर्जाचे गायक असूनदेखील स्वतःला कृतकृत्य न मानता ते अखेरपर्यंत संगीताची सेवा करीत राहिले. तंबोरा वाजवून वाजवून त्यांच्या उजव्या खांद्याला पुढेपुढे कायमचा तिरपा झोक आला होता! त्यांच्याच कष्टामुळे आणि कृपेमुळे या पूर्वापर घराण्यात त्यांची गायकी पुढच्या दोन पिढ्यांपर्यंत तरी जिवंत राहिली.

## मुबारकअलीखां

रामपूरच्या नबाबांचे बंधू कल्लनखां हे नेहमी जयपुरास राहत. आणि खांसाहेबांना त्यांनी प्रेमाने जवळ केले होते. जयपूर दरबारचे बरेचसे नामी नामी गवयी नबाब कल्लनखां यांच्याकडे नोकर वा आश्रित या नात्याने नेहमी गायला बसत. अल्लादियाखांना

अशा अनेकांचे गायन साहजिक ऐकायला मिळे. जहांगीरखां आपल्या गावी गेल्यावर नबाबसाहेबांनी त्यांना अनेक चिजा शिकविल्या; अशा योग्यतेचे हे नबाब होते! अमुक मुष्कील राग अशा पद्धतीने गायचा असे स्वतः ते गाऊन सांगत. खांसाहेबांच्या बयाचे ग्वाल्हेरचे नझीरखां यांची नबाबसाहेबांनी एकदा रामदासी मल्हाराबाबत अशी छेडछाड केली की पुन्हा त्यांनी मान वर केली नाही. खरा देशी राग कसा गातात हे त्यांनी अल्लादियाखांकडून त्यांना ऐकविले हे विशेष! खांसाहेबांवर त्यांचे पराकाष्ठेचे प्रेम होते. त्या वेळी जे मोठमोठे गायक खांसाहेबांनी ऐकले त्यांमध्ये, ज्यांच्या गायकीने त्यांच्या मनाचा ठाव घेतला ते बडे महमदखांचे पुत्र 'मुबारक अलीखांसाहेब' हे कल्लनखां नबाबांच्या भेटीला आठवड्यातून एकदा तरी यायचे. आणि एकदा अल्लादियांचे गाणे ऐकल्यापासून मोठ्या कौतुकाने ते त्यांना गायला बसवायचे. एक दिवस ते नबाबसाहेबांना म्हणाले, "हा मुलगा मला द्या. मी त्याला असा तयार करतो की याला दुनियेत जोड मिळणार नाही." अल्लादियाखांचे वय त्या वेळी पंचविशीच्याही आतच होते. अर्थात मुबारकअलीखांच्या आणि त्यांच्या गायकीच्या मानाने अल्लादिया हे मूलच होते. नबाब-साहेबांनी त्यांना विचारले तेव्हा अल्लादियांच्या मनात एकीकडे गोंधळ माजला. ज्यांच्या गायनाची त्यांच्या मनावर विलक्षण मोहिनी पडली ते मुबारकअलीखां तालीम देण्यास उत्सुक आणि दुसरीकडे जहांगीरखांनी पुत्रवत प्रेम करून दिलेली समृद्ध गायकी; शिवाय स्वतःच्या घराण्याचे खानदान! अल्लादियाखांनी नम्रपणाने नकार दिला. परंतु असले भाग्य दूर लोटून देणे भाग पडले या गोष्टीची त्यांना अखेरपर्यंत हळहळ वाटत असे. जेव्हा जेव्हा मुबारकअलीखांचे नाव निघे–आणि ते अनेक वेळा निघे–त्या वेळी ही हळहळ दिसून येई. खांसाहेबांच्या वरील नकाराचे दुसरे एक कारण म्हणजे मुबारकअली हे बडे महमदखांचे अनौरस पुत्र होते हे एक आणि बडे महमदखां हे विजातीय मुसलमानी पठाणाच्या कुळात जन्मले होते. गोमंतक प्रांतातील बामण क्रिश्चन आणि इतर क्रिश्चन यांच्यामध्ये बेटीव्यवहार होत नाही, तसाच मुसलमान झालेल्या हिंदूंचा आणि मूळचेच जे मुसलमान यांच्यामध्ये बेटीव्यवहारच काय पण विद्येचीदेखील देवघेव होत नसे. धर्मांतर झाले, चालीरीती बदलल्या, कायदा बदलला तथापि, प्राचीन काळापासून पिढीन्‌पिढीतून खेळणारे हिंदू रक्त आणि हिंदू संस्कृतीचे द्योतक असे जे भारतीय अस्सल संगीत या दोहोंमध्ये यत्किंचितही संकर न होऊ देण्याचा या घरंदाज गायकांचा जणू काय बाणाच असावा!

मुबारकअलीखांच्या आपल्याविषयीच्या आस्थेची आणि त्यांच्याकडून काही शिकायला मिळाले नाही याची हळहळ अल्लादियाखांना वृद्धापकाळातदेखील वाटे. ते म्हणत, जहांगीरखांची, मुबारकअलीखांची आणि भास्कररावाची आठवण झाली म्हणजे अद्यापिही डोळ्यांना पाणी येतं. एकानं मला जीव तोडून बारा वर्षं शिकवलं त्याबद्दल कृतज्ञतेचे अश्रू; मुबारकअलीजवळून मी काही शिकलो नाही याबद्दल पश्चात्तापाचे अश्रू आणि भास्कर-रावाला भरपूर शिकविता आलं नाही म्हणून! माझी त्याची माहिती झाली त्या वेळी तो प्रपंचाच्या जंजाळात पडला होता."

"मुबारकअलीखांसाहेबांची योग्यता काय सांगावी! पटमंजरीसारखा पाच निरनिराळ्या त्यांच्या रागांगांनी नटलेला राग—पण मुबारकअली प्रत्येक तान उपजेमध्ये जणू काय पंचरंगी रेशमी गोफ गुंफीत; आणि या गोफाची उकल अशी करीत की येताना पाचही रेशमी धागे ऐकणाराला अलग अलग दिसत. केवढी कल्पना! केवढी मेहनत! कल्पना जाईल तिथे गळा हजर. आणि हे सहजिक होते; बडे महंमदखांसारख्या सिंहाचे हे छावे!"

"बडे महंमदखांचे गायन हद्दू-हस्सूखां हे बंधू राजाच्या पलंगाखाली लपून चोरून तरी शिकले. परंतु मुबारकअलीखां यांच्याकडे फार थोडे लोक फार थोडे गाणे शिकले. याचे कारण, त्यांची गायकी विलक्षण कठीण, पेचदार आणि अतिकष्टसाध्य अशी होती. दुर्दैवाने आज त्यांच्या घराण्याची कसलीही निशाणी राहिलेली नाही. मुबारकअलीखांच्या दर्जाचा गवई मी माझ्या आयुष्यात पाहिला नाही. खरोखर मुबारकअलीखां, तानरसखां आणि हद्दूखां हे गायनाच्या क्षेत्रात देवतास्वरूप विभूती होऊन गेले, यात संशय नाही."—असे ते म्हणत.

"मुबारकअली खूप तय्यार गात होतेच, पण त्यांच्यासारखी पेचदार तिढ्याची फिरत माझ्या ऐकण्यात नाही. असे काही तिढे देऊन तानांचे जाळे ते विणायचे की हे आता त्यातून बाहेर पडणे अशक्य असे वाटे; पण ती एकेक गाठ सहज लीलेने सोडवून त्याच दोराने चिजेच्या तोंडाला अचानक लगाम घालून ते समेवर खडे होत. समेला 'हा' द्यायचीच अशा ईर्ष्येने टपून बसलेला तज्ञ श्रोतादेखील धोका खाऊन खजील होत असे." मुबारकअलीखांच्या गायकीची प्रशंसा करताना आणि त्यांच्या गोष्टी सांगताना खांसाहेब अगदी तल्लीन होत. त्याच त्या गोष्टी आणि तेच ते वर्णन कितीदा केले तरी त्यांना पुरे वाटत नसे. त्यांच्या अत्यंत आवडीची गळ्यावर चढलेली अशी ती एक रागिणीच होती! "खांसाहेब, आपल्या गाण्यात तर मग मुबारकअलींच्या गायकीची छबी पुष्कळ उतरलेली असणार." असेदेखील म्हटलेले त्यांना खपायचे नाही. ते ताडकन उत्तर देत, "माझी काय हैसियत आहे त्यांचे गाणे गायची? गळा जेव्हा तापून अगदी नरम होईल आणि फेकेन तसा हमखास जाईल असे वाटेल त्या वेळी कुठं त्यांच्यासारख्या चारदोन ताना निघतात. गमकेच्या तानेचा नुसता नमुना दाखविताना, जिच्यावर ते स्वतः आणि चार बडी धेंडे बसली होती ती पलंगडीच पाय मोडून उलटली! असा त्या गमकेचा जोर! तो कोणाला येणार? जणू काय काळजाचा रस पिळून त्यातून ते तानेची किमया साधीत! तानपलटे घेताना ते हाताचे तळवे एकमेकावर घाशीत! असा गवय्या पुन्हा होणार नाही. मग माझी काय गोष्ट!"

## हवेची मोट

तरी पण गाणं हे हवेची मोट बांधण्यासारखे मोठे दगाबाज कठीण कर्म आहे. हवा जमली तर जमली. म्हणून एखादेच गाणे ऐकून नामी कलाकाराची किंमत ठरविणे अगदी चूक आहे. मुबारकअलीखां एवढे अतुल गायक ना? पण त्यांचीदेखील एकदा कठीण अवस्था झाली. त्यांचा विलक्षण लौकिक ऐकून ग्वाल्हेरच्या महाराजांनी त्यांना मुद्दाम बोलावून

घेतले आणि त्यांच्या तब्येतीला न जुमानता आठ दिवस महाराजांनी दररोज गाणं ऐकलं. पण चमत्कार असा की दिलपसंत असे एक दिवसही गाणे जमले नाही! महाराजांचा विरस झाला आणि खांसाहेबांचा दिल खचला—पण करतात काय? हवा नाही बनली!

अशा विमनस्क स्थितीत असताना मुबारकअलीखां यांना महाराजांच्या कृपेतील एका गायिकेने मेजवानीचे आमंत्रण दिले. ग्वाल्हेरमधील निवडक गुणिजन मेजवानीला उपस्थित होते. मेजवानीनंतर शिरस्त्याप्रमाणे गाण्याची खास मैफल सुरू झाली आणि शेवटी मुबारकअलीखां यांना गाण्याविषयी आग्रह करण्यात आला. मोठमोठ्या नामवंत गायकांची ती खास मैफल. मुबारकअलीखांनी गायनास सुरवात केली. थोड्याच वेळाने हवा जमली! खांसाहेबांची तब्येत लागली! गाण्याला अपूर्व रंग चढू लागला! हे पाहताच घरच्या यजमानणीने महाराजांना गुप्त निरोप पाठविला की खांसाहेबांची खूप तब्येत लागली आहे—जरूर यावे, पुन्हा असा योग यायचा नाही. महाराज ताबडतोब येऊन पोहोचले आणि मैफल विसकटू नये म्हणून शेजारच्या खोलीत बसून गायन ऐकू लागले. गाणे अतोनात रंगू लागले. शेवटी महाराजांना राहवेना. ते मैफलीत शिरले आणि गाणे बंद झाले. अर्थात सर्वांचा विरस झाला. पण महाराज संगीतकलेचे खरे षोकी—त्यांनी ती सर्व मैफल त्याच घटकेला तशीच राजवाड्यातील खासगी दालनात जमविली! जमलेली हवादेखील जणू काय त्यांनी बरोबर घेतली! मुबारकअलीखांसाहेबांनी त्या जमलेल्या रंगतीला जणू पकडून ठेवली होती! त्याच जोरशोराने त्यांनी अखेरपर्यंत गाण्याची बहार उडविली. "गाणं म्हणजे हवेची मोट आहे. मोठमोठ्यांनाही ती दगा देते."

तानरसखां, हद्दूखां आणि मुबारकअलीखां या त्रिमूर्तींना अल्लादियाखां देवतास्वरूप मानीत; यावरून त्यांच्या गुणग्राहकवृत्तीमध्ये घराण्याच्या अंध अभिमानाचा हिणकसपणा यत्किंचितही नव्हता असे कबूल करावे लागेल. ही त्यांची वृत्ती अखेरपर्यंत कायम होती. वरील तीन गायनविभूतींपुढे सर्वच समकालीन गायकांनी मान झुकविली होती म्हणा. परंतु इतर लहानथोर गायकांच्या ठिकाणीसुद्धा खांसाहेबांना अल्पसा जरी गुण दिसला तरी त्याचा गौरव ते मुक्तकंठाने करीत—मग तो बडा गवैय्या असो, नाटकातील नट असो की गर्भा गाणारी गुजराथी पोर असो; ते त्या ठिकाणी हटकून रमत.

हद्दूखांची बिजलीसारखी कडाडणारी व चकमकणारी तान, तानरसखांची बरछीच्या पातीसारखी भेदिक तान आणि मुबारकअलीखांची पट्ट्याच्या फेकीसारखी गुंतागुंतीची चक्री तान—अशा या त्रिमूर्तींचे एकत्र गायन ऐकण्याचा सुयोग अल्लादियाखांना त्या वेळी जयपूर येथे अचानक आला होता. खांसाहेब म्हणत, ज्यांनी ते चुरशीचे गायन ऐकले ते खरे भाग्यवान!

मुबारकअलीखांच्या गाण्यामध्ये शास्त्राला सौंदर्याची जोड दिली जात असे, हद्दूखांच्या गाण्यामध्ये केवळ मेहनतीचा प्रचंड प्रभाव दिसत असे. मात्र रागाची शुद्धता त्यांच्या गाण्यात राहत नसे, असा गुणिजनांचा आक्षेप असे. कमावलेल्या कंठाच्या प्रभावाने रंग जमविणे ही एकच सिद्धी त्यांनी अजस्र मेहनतीने मिळविली होती. अल्लादियाखांसाहेब

म्हणत की रागाबाबत हा दोष निर्माण होणे अगदी साहजिक होते. यात हद्दू-हस्सूखांचा दोष नव्हता; त्यांच्या शिक्षणाचा तो दोष होता. कारण, राजाच्या पलंगाखाली लपून बडे महमदखांचे गाणे ऐकून तयार झालेले हे हद्दू-हस्सूखां. प्रत्यक्ष तालीम नाही. तानेमध्ये रागाचा बिघाड झालेला सांगायला कोणी नाही. गाणे लपून ऐकायचे आणि घरी जाऊन मेहनत करायची; साहजिकच काही सोप्या गोष्टी ध्यानात राहत आणि त्यावर किंवा नको त्या गोष्टीवर मेहनत होई; त्यामुळे रागरागिणीचे धर्म गाताना बिघडत. म्हणून त्या वेळचे बडे बडे खानदानी गायक असलं गाणं कबूल करीत नसत. ते म्हणत, आपल्या वाडवडिलांची मींड, घसीट, गमकेची शुद्ध रागदारीची गायकी सोडून नुसत्या तानबाजीवर हद्दूखांनी मदार ठेवली; आणि ती तानबाजीदेखील साधीसुधी. कारण बडे महमदखांच्या ताना रागाला धरून—अर्थात गुंतागुंतीच्या आणि विलक्षण पेचदार असत व तशा ताना प्रत्यक्ष गुरूने शिकविल्यावाचून गळ्यात कशा बसणार? अगदी साध्या-सरळ एकेरी ताना होत्या तेवढ्या आल्या; पण प्रत्येक रागात एकडाल सरळ ताना घेतल्या तर रागांचे स्वरूप अर्थात बिघडणारच.

हद्दूखांचे चुलत भाऊ नत्थेखां यांना मी ऐकलं होतं. फारच छानदार गात होते. तसेच ते चांगले जाणकार होते. त्यांनी आपली गायकी रागांच्या बाबतीत निर्भेळ व सोज्ज्वल राखली होती.

असो. हद्दूखां, मुबारकअलीखां व तानरसखां या तीन प्रचंड गायकांचा एकत्र व अत्यंत चुरशीचा गायनसामना जयपुरीत एकदाच झाला. त्या वेळी अल्लादियाखांची उमर पंचवीशीच्या आतबाहेर असावी. ग्वाल्हेर इत्यादी इतर संस्थानांतील कोणी तरुण व तयार गायक जयपुरास आले म्हणजे खासगी मैफलीमध्ये जयपूरचे जवान पट्ठे म्हणून केव्हा केव्हा अल्लादियाखांना नाही तर नत्थनखां आग्रेवाले (विलायत हुसेनखांचे वडील) यांना तेथील वयस्क कलावान मंडळी मुद्दाम गायला बसवीत. यावरून गुणिजनांच्या मैफलीत गाण्याइतकी या दोघाही जवानांची तयारी झाली होती असे दिसते. त्या वेळी हिंदुस्थानात जे समवयस्क गायक नावारूपाला आले होते त्या सर्वांमध्ये नत्थनखां व त्यांच्या गायकीविषयी अल्लादियाखांना अतिशय प्रेम व आदर वाटत असे; आणि हा आदरभाव जन्मभर कायम होता.

वयोवृद्ध जहांगीरखांचे गायन ऐकण्याची कोणी आतुरता दाखविली तर "माझं म्हाताऱ्याचं आता कसलं गाणं ऐकता? ऐकायचंच असलं तर बेटा अल्लादियाचं गाणं ऐका" अशी शिफारस बेटा अल्लादियाच्या गैरहजेरीत ते करीत! मुलांच्या तोंडावर कधी कोणी तारीफ करू नये, त्यामुळे त्यांची डोकी फिरतात, असे ते म्हणत.

खांसाहेबांच्या वयाला पंचवीस वर्षे होईतोपर्यंत असे स्वतंत्र गाण्याचे मधूनमधून योग येत असत आणि होतकरू गवयाच्या सदरात त्यांची गणना होऊ लागली. ते मेहेनतही खूप करीत होते. (एकाच तानेवर चार चार घंटे गळा घासण्याची अल्लादियांची अजब साधना प्रस्तुत लेखकाने प्रत्यक्ष ऐकली आहे.)

## ५. देशभर संचार

### पहिली मुशाफरी

उत्तरेकडील अजयगड संस्थानच्या राजेसाहेबांना गायनाचा फार शोक असे. जहांगीरखांच्या संपन्न व समृद्ध गायकीची तारीफ मोठमोठ्या ज्ञानी आणि कसबी कलावंतांच्या तोंडून त्यांच्या कानावर वारंवार पडत होती. त्यांचे गायन ऐकण्याची राजेसाहेबांना एकदा लहर आली. पण जहांगीरखां वयोवृद्ध झाल्यामुळे लाचारी दाखवून त्यांनी अल्लादियाखांना आपल्याऐवजी पाठवून दिले. त्यांच्याबरोबर चुलतबंधूही होते. गाणे ऐकून राजेसाहेब आणि तेथील जाणते व मुरब्बीदेखील फार खूष झाले. बिदागीही चांगली मिळाली.

स्वतःच्या कर्तबगारीवर वाहवा व बिदागी मिळविण्याचा हा पहिलाच प्रसंग! आणि तो दोन्ही दृष्टीने कल्पनेबाहेर यशस्वी झाला! हाच शुभ शकुन अशी खूणगाठ बांधून हे दोघे जवान तेथूनच मुशाफरीला निघाले. अल्लादियांचे अद्यापि जरी लग्न झाले नव्हते तरी गुरू जहांगीरखां, आई, भावंडे वगैरेंच्या निर्वाहासाठी कमाई करण्याची आच त्यांना लागलेली होतीच. आता घराबाहेर एकदा पडल्यावर काय! खूपशी कमाई करूनच मग परत यायचे अशा इरादाने हे दोघे बंधू अजयगडहून निघाले.

ही पहिलीच मुशाफरी; परंतु ती स्थळ आणि काल या दोन्ही दृष्टींनी कल्पनेपेक्षाही लांबली. घरातून बाहेर पडल्यानंतर पाचसहा वर्षांनी खांसाहेब परत घरी आले. पल्ल्याच्या दृष्टीने नेपाळच्या राजधानीपर्यंत त्यांनी मजल मारली!

या प्रवासात अनेक छोट्यामोठ्या संस्थानी दरबारांत आणि स्थानिक कलावानांच्या खास बैठकींत खांसाहेबांची गाणी झाली. तसेच पाटणा, अलाहाबाद, कलकत्ता यांसारख्या मोठमोठ्या शहरांतही त्यांच्या अनेक बैठकी झाल्या. साहजिकच आहे. ख्वाजा एहमदखांचे हे पुत्र आणि जहांगीरखांसारख्या बड्या प्रस्थाचे हे चेले. शिवाय गाण्याची तारीफ कर्णोपकर्णी आधीच पुढील मुक्कामाच्या गावी पोहोचलेली! खांसाहेबांना तर हा दौरा तीर्थयात्रेसारखा पुण्यकारक वाटला. कारण जेथे जेथे जे जे नामवंत महशूर कलावंत होते त्या सर्वांचे गायन-वादन ऐकण्याची त्यांना संधी मिळाली. कलावंताच्या वास्तव्यामुळे राजांचा आणि संस्थानांचा बोलबाला होण्याचा तो जमाना होता. अल्लादियाखांना अशी ठिकाणे म्हणजे गायनकलेची पुण्यप्रद तीर्थे वाटल्यास आश्चर्य नाही. अनेक उच्च

दर्जाच्या कलावानांना व गायक, बीनकार, पखवाजी, तबलिये इत्यादींना मनमुराद ऐकण्याचा योग आल्यामुळे त्यांच्या समृद्ध विद्येत व्यापक दृष्टीची आणि नानाविध कल्पनांची भर पडली. या गोष्टींचा त्यांनी पुढे फार उपयोग करून घेतला.

या दौऱ्यात त्यांच्या विद्येचे सर्व ठिकाणी अतिशय कौतुक झाले असले तर नवल नाही. त्यांचे शिक्षण आणि मेहनत तशीच जबरदस्त होती. गैरमाहितीच्या गावी मुशाफर-खान्यात उतरले तरी त्यांच्या मेहनतीत खंड पडत नसे. त्या वयात अल्लादियाखांचा गळा फार तयार फिरत असे. एके ठिकाणी ते खूपच तयारीचे गाणे गायले. मैफल खासगी होती. पुढील हकिकत तयारीचे वेड असणाऱ्या गायकांना उद्बोधक वाटेल कदाचित.

## सोनाराने कान टोचले!

सुमारे चाळीस वर्षांपूर्वीची गोष्ट. मुंबईस मिय्याजान या अजब तयार गायकाचे नाना शंकरशेटच्या हॉलमध्ये सकाळी गाणे झाले. अल्लादियाखां, गु. भास्करराबजी बखले व इतर अनेक छोटी-मोठी कलावान व गायनप्रेमी मंडळी जमली होती. मिय्याजान विलक्षण तयार गायले. त्यानंतर खांसाहेब, भास्करराव व प्रस्तुत लेखक असे आम्ही भास्कर-रावांच्या घरी आलो. मिय्याजानच्या तयारीची तेथे खूपच तारीफ झाली. त्या वेळी खांसाहेब म्हणाले, "मिय्याजान नुसता तयार नाही, तो कसबीही आहे. मात्र ही तयारी पुढे उतारवयात त्याची वैरीण होईल. ऐन पंचविशीच्या वयात मलादेखील खूप तयारीने गाण्याचे वेड लागले होते. पण एका म्हाताऱ्या सारंगीवाल्याने मला कानमंत्र दिला. त्याचे असे झाले—

"बांदा येथे एका खासगी मैफलीत मी खूप तयार गायलो; आणि सर्वांनी माझ्या तयार तानबाजीची भलतीकडे तारीफ केली. मी मोठ्या खुषीत बिऱ्हाडी आलो. माझ्या मागोमाग एक जुनापुराणा म्हातारा सारंगीवाला आला. तो म्हणाला, 'खांसाहेब, वाहवा! तुम्ही फार सुंदर आणि विलक्षण तयार गाणं गाता. पण रागावू नका; एक गोष्ट सांगतो.—जोपर्यंत जवानी आणि ताकद आहे तोपर्यंत ही तयारी ठीक आहे; पण उतारवयास शक्ती कमी कमी होऊ लागली म्हणजे या तयारीला सुरेलपणा आणि दाणेदार-पणा राहणार नाही; म्हणून मध्यलयीत फिरण्याची सवय करा. तयारी काय, चार दिवस काम देईल आणि पुढील अर्धे आयुष्य बेकार करील.' त्यांचं म्हणणं मला पूर्णपणे पटलं. मनामध्ये तत्क्षणी मी खूणगाठ बांधली आणि दुसऱ्या दिवसापासून मध्यलयीतील फिरतीची मेहनत सुरू केली. माझे काका जहांगीरखांजीसुद्धा तयारीनं गळा फिरविण्याच्या बाबतीत मला फार कडक बोलायचे. पण त्या वेळी कोणीतरी गळा दाबल्याचं मला दुःख वाटायचं आणि त्यांना नकळत गळा फिरवण्याची कसरत चालू ठेवायची! पण आता या सोनारा-नेच कान टोचले! तयार गळा फिरविणे ही एक नादिष्ट कसरत आहे—विद्या नव्हे. तयारीचा एकदा नाद लागला म्हणजे रागाची शुद्धता इत्यादी महत्त्वाच्या बाबींकडे साहजिकच दुर्लक्ष होते. गळा तानबाजीच्या आहारी जातो व गायक गळ्याच्या आहारी

पडतो. परंतु पुढे म्हातारपणी गळा काम देत नाही. तानेमध्ये दाणा राहत नाही आणि गळ्यात स्वर राहात नाही."

नंतर गया, पाटणा, दरभंगा वगैरे शहरे घेऊन खांसाहेब मुजफ्फरपूर येथे आले. कोणाची माहिती नाही. अशा या दूरच्या आणि अनोख्या ठिकाणी धर्मशाळेत उतरण्याखेरीज गत्यंतर नव्हते. पाटणा, दरभंगा इत्यादी शहरांत विशेष कमाईही झाली नव्हती; आतापर्यंत मिळालेले पैसे न चुकता घरी पाठविलेले. त्यातून प्रवासखर्च. थोडी शिल्लक होती ती बंधुराज घेऊन गेले! धर्मशाळेत उतरायचे आणि हाताने करून दुपारची वेळ निभवायची! मुजफ्फरपुरास तर खांसाहेबांना दोन-तीन दिवस कडकडीत उपास काढावे लागले. तेथे एका ओळखीच्या गृहस्थाची अचानक गाठ पडली. त्याने खांसाहेबांना आपल्या घरी ठेवून घेतले आणि एक मैफल करून चांगली बिदागी देऊन त्यांची रवानगी केली. वास्तविक मुजफ्फरपुराहून परत फिरण्याची कोणालाही बुद्धी झाली असती; पण खांसाहेबांचा हिय्या जबरदस्त—त्यातून आता जवळ पैसेही भरपूर. शिवाय नेपाळ-नरेशाला संगीताचा अतिशय षोक असल्याचे त्यांच्या कानावर आले होते. इतक्या नजीक आल्यावर नेपाळच्या राजधानीपर्यंत मजल मारण्याची साहजिकच आतुरता वाटली असावी आणि त्यामुळे मुजफ्फरपुराहून परत न फिरता सरहद्दीनजीकच्या बीतिया रियासतीत ते गेले. पण तेथील नरेशाची अंग्रेजी तऱ्हा त्यांना मानवली नाही. तथापि नेपाळात जाण्याची मनातील ओढ कमी झाली नव्हती. बरे, परत फिरून कोणत्या ठिकाणी जायचे याचाही निश्चय होईना. अशा मनस्थितीत बीतियापासून वीसपंचवीस मैलांवर मोतीहारी या स्टेशनवर ते उतरले आणि त्यांनी गावानजीकच्या मुशाफरखान्यात मुक्काम केला.

## नेपाळातील वास्तव्य

उत्कट इच्छा असली म्हणजे परमेश्वर ती कोणत्या तरी मार्गाने पुरी करतो असे म्हणतात. अल्लादियाखांना याची प्रचिती मोतीहारीच्या मुशाफरखान्यात आली. पाटणा, मुजफ्फरपूर आणि बीतिया या तीनच ठिकाणी ते अनाहूतपणे व आपण होऊन गेले. त्यापूर्वी कोणा ना कोणाचा तरी आग्रह अथवा अगत्यपूर्वक निमंत्रण आल्याखेरीज ते कोणत्याही परस्थळी गेले नव्हते. नित्य परिपाठाप्रमाणे मोतीहारीच्या धर्मशाळेत खांसाहेब गाण्याच्या मेहनतीला बसत. एके दिवशी असा योगायोग जमून आला की, नेपाळ-महाराजांचे सरसेनापती काही कामकाजानिमित्त मोतीहारी येथे आले होते आणि धर्मशाळेच्या बाजूने जाताना त्यांच्या कानावर खांसाहेबांचे गायन पडले. ते काही वेळ ऐकत उभे राहिले. खांसाहेबांची मेहनत संपल्यावर त्यांनी खांसाहेबांजवळ जाऊन कोण, कुठले वगैरे हकिगत विचारली. शेवटी ते म्हणाले की, माझे बंधू नेपाल-नरेश यांना गाण्यांचा अतिशय षोक आहे. इतकेच नव्हे, तर ते त्यातले दर्दी आहेत; तेव्हा तुम्ही त्यांना गाणे ऐकवा. ईश्वर एकाऐवजी दोन डोळे देतो! खांसाहेबांनी रुकार देताच ते गेले आणि त्यांना नेण्यासाठी वाहन-हौद्याचा हत्ती वगैरे

पाठविले. महाराजांचा शिकारी कॅंप फारसा दूर नव्हता. तेथे खांसाहेबांना नेण्यात आले. महाराजांनी गाणे ऐकले; तीनचार रागांची त्यानी फर्माईशही केली. ते राग खांसाहेबांनी गाऊन दाखविले. महाराज व इतर सरदार फार खूष झाले आणि त्यांनी दरमहा तीनशे रुपयांवर त्यांना दरबारची नोकरी दिली. शिवाय भोजन वगैरेचा कच्चा खर्च आणि हत्तीचे वाहन! दोन महिने नेपाळच्या जंगलात महाराजांबरोबर खांसाहेब शिकारीमध्ये फिरत होते. शिकारीनंतर नेपाळच्या काठमांडू राजधानीत, दरबारी गायक अशा प्रतिष्ठित दर्जाने खांसाहेबांनी प्रथम प्रवेश केला. नेपाळच्या महाराजांना उच्च दर्जाच्या संगीताचा इतका काही शोक होता की, राणीवंशातील स्त्रियांनादेखील संगीतकलेचे शिक्षण देण्यात येई. हिंदुस्थानातील चारदोन गायक-वादक मुद्दाम तैनातीत ठेवून परिवारातील हुशार दासींना गाण्यात आणि तबला वाजविण्यातदेखील तरबेज केले होते. महाराजांना झोप लागेनाशी झाली म्हणजे शय्यामंदिरात खांसाहेबांना गाण्याचा प्रसंग येई. त्या वेळी तंबोरा वाजवायला व तबल्याचा ठेका धरायला या दासीच असत! गेल्या महाराजांच्या कारकिर्दीतील नेपाळचे जलसे महशूरच आहेत. महाराजांच्या कृपेत अशा रीतीने नेपाळमध्ये खांसाहेबांनी दोन वर्षे काढली. महाराजांच्या बरोबर शिकारी दौऱ्यातही भाग घेणे, अनेक ठिकाणी निसर्गरम्य अद्‌भुत व भव्य वनश्रीची शोभा पाहणे, यमराजालाही दूर उभे करणाऱ्या पुराणपुरुषांचे दर्शन होणे, वाढदिवसानिमित्त, दिवाळीनिमित्त गाणी-बजावणी, जल्लोष, रोषणाई अशा मजेत ही दोन वर्षे गेली.

आता मात्र खांसाहेबांना घरची ओढ लागली. पाचसहा वर्षे त्यांनी बाहेर काढली. तेव्हा घरच्या माणसांना भेटावेसे वाटणे साहजिकच होते. खांसाहेबांचे वय या वेळी तीस वर्षांच्या आसपास होते. शिवाय लग्नही झाले नव्हते. दूर देशात वडीलधाऱ्या माणसांचा दाब नाही. अशा स्थितीत आणि ऐन तारुण्याच्या अवस्थेत भलताच प्रमाद घडण्याचा संभव! असले आमिष दाखविण्याचा उपद्व्याप तेथील एका विघ्नसंतोषी व मत्सरी मुत्सद्दी व्यक्तीने केलाही होता. साहजिकच नेपाळात राहणे त्यांना धोक्याचे वाटू लागले. सुदैवाने थोड्याच दिवसांत महाराजांचे एक बंधू हिंदुस्थानात जाण्याच्या तयारीत होते. त्यांच्या-मार्फत महाराजांकडे रदबदली करून त्यांच्याबरोबर खांसाहेब मायदेशाला परत आले.

## विवाह व पुत्रप्राप्ती

जोधपुरास आल्यावर त्यांचे दुसरे चुलते—जहांगीरखां यांचे धाकटे बंधू—चम्मनखां यांनी आपल्या कन्येशी खांसाहेबांचे लग्न करून टाकले. खांसाहेबांना दोन-दोन वर्षांच्या अंतराने तीन पुत्र झाले. ज्येष्ठ पुत्राचे नाव नसरुद्दीन ऊर्फ 'बडेजी', मधल्याचे बदरुद्दीन ऊर्फ 'मंजी' आणि कनिष्ठाचे नाव शमसुद्दीन ऊर्फ 'भूर्जी'.

वयाच्या पंचवीस ते तीस वर्षांतील या दौऱ्यात खांसाहेबांनी त्या काळातील अनेक वाणींच्या लहानथोर गायकांची गाणी ऐकली; अनेक नामवंत पखवाजी, तबलिये ऐकले. जाणूनबुजून तेढी चाल चालणाऱ्यांची आदबीने आणि हसतमुखाने हजेरी घेतली. अर्ध्या

मात्रेवर सम ठेवणाऱ्या तालशांना पखवाजाचे नवे नवे बोल रचून दाखविले. काही सरगमच्या कूट समस्या सोडवून सर्व वडील व बड्या कलावानांकडून प्रशस्ती मिळविली. आणि जहांगीरखांची तालीम राग, ताल व स्वर यांच्या विलासक्रियेत किती समृद्ध होती याची त्या सर्वांना प्रचिती आणून दिली.

अल्लादियाखांसाहेबांच्या गायनामध्ये जी विशालता आणि विविध विस्तार आढळून येई त्याचे श्रेय त्यांना मिळालेले समृद्ध शिक्षण, त्यांची बुद्धिमत्ता व मेहनत यांच्या इतकेच ते, असामान्य दर्जाच्या अनेक कलाकारांना ऐकण्याचे त्यांना जे असंख्यात योग या पहिल्या दौऱ्यात लाभले, त्यांनाही दिले पाहिजे. अनेक गायकांना ऐकल्यामुळे त्यांच्या पेचदार गायनाला झिलई, सफाई आणि सहजता ही तर आलीच, परंतु गळ्याच्या कशाही बिघडलेल्या अवस्थेतदेखील मैफलीवर छाप पाडण्याची किमया त्यांना साध्य झाली होती. आणि सर्वात महत्त्वाची बाब ही की, त्यांची सौंदर्यदृष्टी अनेक अंगांनी विकास पावली. केवळ आवाजाच्या सुस्थितीवर आपल्या गायनाची रंगत त्यांनी कधी अवलंबून ठेविली नाही.

अल्लादियाखांसाहेबांच्या तारुण्याच्या जमान्यात इतर संस्थानांपेक्षा ग्वाल्हेर व जयपूर या दोन संस्थानांतील गुणिजनखाते फार समृद्ध व तुल्यबल होते. अनेक सुप्रसिद्ध गायकवादकांखेरीज बहिरामखांसारखे शास्त्रज्ञही जयपुरात होते; त्यांचे मत जयपूरचे गुणिजन प्रमाण मानीत. 'रंगीले', 'दरस'सारखे उत्कृष्ट चिजा बांधणारे, रागदारीच्या कूट समस्या सोडविणारे अशा कित्येक विद्वानांशी खांसाहेबांचा निकट ऋणानुबंध त्या काळात घडून आला. 'रंगीले' (हे म. फैयाजखां यांचे मातुल–आजे) यांच्या चिजांची बांधणी व शब्दरचना पूर्वापर चिजांच्या तोडीची असल्यामुळे त्यांच्याकडून अनेक चिजा घेऊन खांसाहेबांनी त्या मैफलीत गाऊन व आपल्या पुत्रांना व शिष्यांना शिकवून त्या अजरामर केल्या. 'दरस पिया' (हे प्रो. विलयत हुसेनखां यांचे मामा) यांच्या बहुतेक चिजांचा आग्रा घराण्यातील गायकांनी उत्कर्ष केला. त्या संस्कारक्षम तरुणपणात अल्लादियाखांनीही चिजा रचण्याचा प्रयास केला आणि त्यांचे कौतुकही झाले. परंतु चिजा रचण्यापेक्षा गायनामध्येच यशस्विता संपादण्याचे ध्येय खांसाहेबांनी ठेवल्यामुळे तो नाद त्यांना लागला नाही. तरीदेखील त्यांच्या चौरस बुद्धीची चमक संगीताची कोडी किंवा समस्या सोडविताना दिसून येई. प्रस्तुत लेखकाला खांसाहेबांनी त्या वयात रचलेली एक चीज व सरगम गाऊन दाखविली होती. मालकंस रागाचा प्राणस्वर जो शुद्ध मध्यम तो सर्वस्वी वर्ज्य करून ही रचना केली होती! आणि मालकंस रागाचे स्वरूप तर स्पष्टपणे प्रतीत होई. यमन-कल्याण रागाची एक चीज त्यांनी म्हणून दाखविली, तीत तीव्र मध्यमच नाही. फक्त कोमल मध्यम! आणि यमनाची छबी मात्र कायम! मालकंस हा राग संपूर्ण आहे असे एका बैठकीत खांसाहेब बोलून गेले आणि रिषभ व पंचम लागणाऱ्या मालकंसाची चीज त्यांनी गाऊन दाखविली. तर मग, अगदी प्राचीन मूळचा मालकंस कोणता? सात स्वरांचा की प्रचारातील पाच स्वरांचा? खांसाहेब उत्तरले, "मूळचा मालकंस संपूर्ण सात स्वरांचा! पुढे त्यातील रिषभ व पंचम वर्ज्य करण्यात

आले!" अर्थात हे सारे वादविवाद मनोरंजक असत. मात्र त्यामुळे खांसाहेबांची वृत्ती मुष्कील स्वरविलासाकडे झुकली तर नवल नाही. विशेष हे की, या मुष्कीलपणाला त्यांनी सौंदर्य आणल्यामुळे अल्लादियांच्या गायकीचे ते एक मुख्य लक्षण होऊन बसले.

## वजीरखां बीनकार

जोधपुरास चम्मनखांकाकांच्या कन्येशी अल्लादियाखांनी कौटुंबिक जीवनाचा काही काळ अनुभव घेऊन होळीच्या उत्सवानिमित्त ते इंदोर शहरी गेले. त्या वेळी हल्लीच्या महाराजांचे आजे गादीवर होते. इंदोरात त्यांचा व वजीरखां बीनकार यांचा प्रथमच परिचय झाला. "असा बीनकार व विद्वान झाला नाही व होणार नाही. कारण बीनवादनाचे खास कायदे त्यांच्याबरोबरच नाहीसे झाले", असे खांसाहेब म्हणत.

खांसाहेब पुढे कोल्हापुरास नोकर झाल्यावर १९०५-६ सालच्या सुमारास वजीरखां-साहेब मुंबईस आले होते, त्या वेळी अल्लादियाखांचा शाहू महाराजांबरोबर मुंबईस मुक्काम होता. वजीरखांना भेटण्यासाठी खांसाहेब बाहेर पडताना प्रस्तुत लेखकाला म्हणाले, "गोविंदरावजी, तुम्हीही माझ्याबरोबर या. एका फार मोठ्या माणसाचे तुम्हालाही दर्शन घडू दे." मी मुकाट्याने निघालो. वजीरखां व्हरांड्यात बांधलेल्या झोपाळ्यावर बसले होते. या दोन महान कलावंतांची भेट म्हणजे एक चिरस्मरणीय दृश्य होते. अल्लादियाखांनी वाकून केलेला सलाम वजीरखांनी वरचेवर झेलला आणि दोघांनी ईद-मुबारकप्रमाणे गळ्यात गळा घातला. कुशलवृत्त आणि इकडच्या-तिकडच्या गप्पागोष्टी झाल्यावर शेवटी वजीरखां म्हणाले, "अल्लादियाखां! कोणीकडच्या कोणीकडे या दरिद्री दक्खनमध्ये पडून राहिला आहा. चला माझ्याबरोबर रामपूरला. आमचे नवाब तुम्हाला काही कमी पडू देणार नाहीत, याची मी जिम्मेदारी घेतो." खांसाहेब म्हणाले, "माझे शाहू महाराज मला काही कमी पडू देत नाहीत. बीन शिकण्याचे आता वय नाही; नाहीतर त्यासाठी मी आपल्याकडे जरूर आलो असतो." त्यावर वजीरखां गद्‌गदलेल्या स्वरात उद्‌गारले, "खुदा बचाए! माझ्यापाशी शिकणाऱ्याला मृत्यूची सजा मिळते!" आणि वजीरखांच्या डोळ्यांतून अश्रू वाहायला लागले. परत येताना खांसाहेबांना मी याविषयी विचारले, तेव्हा ते म्हणाले, "यांनी जीव घालून तयार केलेला जवान पुत्र एकाएकी वारला! ईश्वराने पुत्रशोकाचे दुःख कोणाला देऊ नये."

इंदोरहून अल्लादियाखां नजीकच्या रतलाम रियासतीत दाखल झाले. रतलाम दरबारात मात्र खांसाहेबांना एक विचित्र अनुभव आला. त्यावरून संस्थानिकांच्या विक्षिप्तपणाइतकीच खांसाहेबांच्या स्वाभिमानाची आणि कलेच्या प्रतिष्ठेची त्यांना केवढी जाणीव होती याची कल्पना येईल.

रतलामच्या महाराजांनी खांसाहेबांचे गाणे ऐकले आणि ते अत्यंत खूष झाले. इतकेच नव्हे, तर त्या खुषीच्या भरात त्यांनी दरबारात जाहीर केले की, अल्लादियाखां यांना आम्ही रतलाम दरबारचे आजपासून नोकर केले आहे!

खांसाहेब चकितच झाले! पण दरबारात काय बोलणार! दुसरे दिवशी महाराजांच्या खास बैठकीत पुन्हा गाणे व्हायचे ठरले. या बैठकीची तऱ्हा अजबच होती. महाराज व राणीसाहेब वरच्या मजल्यावर बसलेले आणि तळमजल्यावर दरबारची गायक-वादक व साजिंदे-सफरदायी मंडळी! कोणीही दुसरी श्रोतेमंडळी नव्हती! खांसाहेबांना हा प्रकार अपमानकारक वाटला आणि त्यांनी तिथल्या एका नोकरामार्फत महाराजांना असा विनंती-वजा प्रश्न कळविला की, मी कोणाच्या पुढं गायन करू? येथे संस्थानची गादीदेखील दिसत नाही! महाराजांना ही गोष्ट मानवली नाही, आणि त्यांनी खांसाहेबांना रजा दिली! दुसरे दिवशी खांसाहेबांनी रतलाम सोडण्याची तयारी केली. हे कळताच खासगी कारभारी आले आणि म्हणाले, महाराजांनी आपण होऊन तुम्हाला नोकर केल्याचे जाहीर केले आहे. असली नोकरी सोडून तुम्ही जाऊ नका; मी महाराजांची समजूत घालीन. खांसाहेबांनी सांगितले की, जिथं आपल्या विद्येची बेइज्जत झाली तिथं माझं मनच रमणार नाही. त्यांनी सरळ रतलामचे स्टेशन गाठले. प्लॅटफॉर्मवर आमलेटा संस्थानचे राजेसाहेब भेटले आणि अतिशय आग्रहाने त्यांनी खांसाहेबांना आमलेटास नेले. खांसाहेबांच्या आयुष्यातील ही अत्यंत दुर्दैवी घटना ठरली.

## दुर्दैवी घटना

आमलेटा संस्थानच्या राजेसाहेबांइतका संगीताचा अतिमनस्वी परंतु डोळस पोक करणारा दुसरा राजा क्वचितच असेल. त्यांनी आठही प्रहरातील नव्या नव्या रागरागिणी दिवसा-रात्री अलग-अलग बैठकीमध्ये खांसाहेबांकडून ऐकल्या. त्यांनी जसे खांसाहेबांचे गाणे ऐकले तसे दुसऱ्या कोणत्याही राजाने ऐकले नव्हते. त्यांचे दरबारी लोकही मोठे रसिक होते. दिवसा चार-पाच तास आणि रात्री तीन-चार तास असा दहा-बारा दिवस एकसारखा गाण्याचा जल्लोष चालला. पण इतका ताण पुढे न झेपल्यामुळे आवाज जो बसला तो दोन वर्षेपर्यंत बिल्कुल कामातून गेला! या आमलेटा महाराजांनी त्यांना चांगले इनाम दिले-पण ते खांसाहेबांना फार भारी पडले!

आमलेटातून ते जोधपुरास परत आले. आवाज आज सुधारेल, उद्या सुधारेल अशा आशेत महिनेगणती गेले. "देवा! माझा आवाज मला परत दे, नाहीतर मला मरण दे" अशी दर नमाजाच्या वेळी ते हृदय फोडून प्रार्थना करू लागले. शेवटी दोन वर्षांनी आवाज किंचित काम देऊ लागला—पण पूर्वीची रोषणी व तासीर राहिली नाही. "त्या दोन वर्षांमध्ये मनाच्या कसल्या अवस्थेत मी काळ कंठला, त्याचं वर्णन करायला येत नाही. जिवंत असून जगात नाही अशी स्थिती झाली होती." पण खांसाहेबांनी धीर सोडला नाही. इतकी विद्या आणि आतापर्यंतचे कष्ट केवळ आवाज बिघडला म्हणून मातीत जाऊ द्यायचे? बिघडलेल्या गळ्याला एक स्वतंत्र वळण लावण्याच्या उद्योगाला ते लागले आणि बिघाडातून त्यांनी अजब बनाव निर्माण केला!

गळ्याच्या गोडीवर अवलंबून असणारे स्वरालापनाचे अंग काही दिवस बाजूला ठेवून

केवळ बुद्धीची करामत आणि विद्येचा संचय यांच्या आधारावर त्यांना अवलंबून रहावे लागले. बिघडलेल्या आवाजातील तासिरीची उणीव त्यांना नव्यानव्या वेलपत्तींनी भरून काढावी लागली. ईश्वरकृपेने त्यात पुढे यश येऊन गायकीची एक अगदी स्वतंत्र जाती त्यांना निर्माण करता आली; तिचा इतका प्रभाव की, आवाजाच्या बरे-वाईटपणाकडे लक्ष देण्याचे कोणाला कारणच पडू दिले नाही; किंवा आवाजदारांच्या गायकीशी त्यांच्या गायकीची तुलना करून तिची योग्यता ठरविणेही कोणाला शक्य झाले नाही. मात्र हा एक अजिबात स्वतंत्र रंग आहे अशी सर्वांची खात्री पटे. आवाजाची खामी गायकीच्या नव्या रंगाने भरून काढण्याची किमया त्यांना साधली, याची कारणे गुरूने दिलेली विद्या, मोठमोठ्या कलावानांचे आदर्श आणि अहर्निश निदिध्यास ही होत.

## दक्षिणाभिमुख

वझीरखां बीनकार व त्यांच्यासारख्या योग्यतेच्या गायकांविषयी अल्लादियाखां म्हणत, "ईश्वरसाक्ष, मला त्यांची विद्या तर नाहीच आली पण त्यांच्या गुणांच र्णन करण्याची-देखील माझी ताकद नाही." यात शालीनतेचा थोडाफार अंश असला तरी खुद्द खांसाहेबांची प्रचंड गायनकला व विद्या म्हणजे पूर्वजांच्या कल्पनातीत गुणांचा प्रत्यक्ष पुरावाच नव्हे का?

मध्यंतरी बुंदी संस्थानामध्ये खांसाहेबांना दोन वर्षे सहकुटुंब राहावे लागले. बुंदीच्या राणीसाहेब या जोधपूर नरेशाच्या भगिनी; तेव्हा त्यांचा आग्रह मोडणे शक्य नव्हते. बुंदी येथे कनिष्ठ चिरंजीव शमसुद्दीन ऊर्फ भूर्जीखां यांचा इ. स. १८९० साली जन्म झाला. त्यापूर्वी इ. स. १८८८ साली उनियारा येथे बद्रुद्दीन ऊर्फ मंजीखां आणि त्यांच्या आधी १८८६मध्ये नसरुद्दीनखां जन्मले होते. १८९१ च्या सुमारास खांसाहेब दक्षिणाभिमुख झाले. प्रथम अहमदाबाद, नंतर बडोदा–मुंबई–कोल्हापूर.

अहमदाबादेस चौधरी आणि हत्तीसिंग असे दोन संगीताचे अत्यंत षोकी श्रीमान गृहस्थ होते. त्यांनी तानरसखां, अलिया–फत्तू, इम्रतसेनजी अशा नामवंत गवयांना ऐकले होते. बुंदी येथे असताना त्यांनी एकदा खांसाहेबांचे गाणे ऐकले आणि आग्रहाने अहमदाबादेस ते त्यांना घेऊन गेले. मोठ्या इतमामाने त्यांनी अल्लादियाखांची बैठक केली. त्यांच्या साथीला कीरचखां सारंगिया होते. त्यांचे उस्ताद सुप्रसिद्ध मीरचखां. अल्लादियाखां म्हणत की, मीरचखांसारखा कसबी सारंगिया हिंदुस्थानात दुसरा झाला नाही. त्यांच्या मेहनतीला सीमा नव्हती. घंटोगणती नित्य बैठक मारून बसल्यामुळं त्यांच्या बसायच्या ठिकाणी घट्टे पडून तिथली चामडी टाचेसारखी जाड झालेली होती आणि डाव्या हाताच्या बोटांना कायमचा बाक आला होता! मीरचखांच्या बोटांचा बाक आणि जहांगीरखांच्या खांद्याला तंबोरा वाजवून आलेला कायमचा बाक अशा गोष्टी ऐकल्या म्हणजे पूर्वीच्या कलाकारांच्या अतिमानुष तपस्येपुढे नकळत अंजली जुळते.

अहमदाबादमध्ये थोडे दिवस राहिल्यानंतर खांसाहेब बडोद्यास आले. कोणाची

ओळख नव्हती, तेव्हा एका सराईमध्ये खांसाहेब आणि छोटेभाई हैदरखां उतरले. संध्याकाळी शेजारच्या मशिदीत हे दोघे नमाज पढण्यासाठी गेले. तिथल्या इमामसाहेबांनी त्यांना रात्रीच्या मजलिसला जरूर या म्हणून निमंत्रण दिले. रात्री हे दोघे बंधू तेथे हजर झाले. बडोद्यातील बहुतेक गुणिजन आले होते. फैझमहमदखां (भास्करराव बखले त्या वेळी त्यांचेकडे गाणं शिकत होते), मौलाबक्ष वगैरे मंडळींची ओळख झाली. बडोद्यास त्या वेळी एक नामांकित, अत्यंत थोर्की व रसिक हकीम हजर होते. त्यांच्या घरी ही धार्मिक सोहळ्यादाखल मजलिस होती आणि जमलेल्या सर्वच गायकांनी तीत भाग घेण्याचा शिष्टाचार होता. खांसाहेबही तेथे एक सलाम (ईश्वराचं भजन) गायले. त्यात तानपलट्याच्या गायकीला मनाई असते. भास्កररावांचे गुरू फैजमहमदखां यांनी तर खांसाहेबांची योग्यता फार मोठी आहे असे या एका भजनावरून उद्गार काढले. पुढे हकीमसाहेबांनी खांसाहेबांना व हैदरखांना आपल्या इथेच ठेवून घेतले आणि सयाजीराव महाराजांना गाणे ऐकविण्याची त्यांनी होऊन खटपट सुरू केली. खांसाहेबांना बडोदा दरबारात नोकरी मिळावी अशी त्यांची मनापासून इच्छा होती. शहरात या नव्या गवया-विषयी चर्चा सुरू झाली आणि गाण्याच्या बैठकी होऊ लागल्या. या बंधुद्वयाच्या गायनाची बडोदे शहरभर ख्याती पसरली. सयाजीराव महाराजांनी गाणे ऐकले व तेदेखील फार खूष झाले. खांसाहेबांना नोकर करण्याची त्यांची मनीषा होती. परंतु **मौलाबक्षच्या** विरोधा-मुळं तो योग जुळून आला नाही. ती सारीच हकिकत मोठी उद्वेगजनक आणि खांसाहेबांच्या करारी बाण्याला न खपणारी अशी घडली. हकीमसाहेबांसारख्या सज्जनाने आपल्याकरिता निष्फल कष्ट घेतले याचेच खांसाहेबांना फार वाईट वाटे.

सयाजीराव गायनकलेपेक्षा इंग्रजी शिस्तीचे आणि पाश्चिमात्य सूत्रबद्धतेचे चहाते असल्यामुळे त्यांनी मौलाबक्ष यांना गुणिजनखात्याचे मुख्य अधिकारी नेमले होते. मौलाबक्ष मोठे चलाख वृत्तीचे—तेव्हा इंग्रजी बँडच्या धर्तीवर नोटेशन पद्धती, गाण्याच्या शाळा, चिजांची पुस्तके वगैरेंचे औडंबर माजवून महाराजांची मर्जी त्यांनी संपादन केली होती. फैझमहमदखांसारखा विद्वान, जाणकार आणि रसदार गवयी—ज्यांनी भास्करराव बखले यांना तयार केले—परंतु आमच्या संगीतविद्येचे लेखी रूपांतर करणाऱ्या नोटेशनच्या भानगडीत पडण्याची तयारी न दाखविल्यामुळे ते बिचारे मागे पडले! आणि हे मौलाबक्ष पुढे सरले. अर्थात अल्लादियाखांसारखे कलाकार बडोद्यात नोकर होणे त्यांना मानवणे शक्य नव्हते. महाराज अल्लादियाखांना नोकरीचा हुकूम देणार हे पाहून मौलाबक्ष महाराजांना म्हणाले, मी अल्लादियाखांना संगीताबाबत काही शास्त्रीय सवाल विचारतो आणि मग यांच्या नोकरीचे नक्की करावे. महाराजांनी त्याप्रमाणे हकीमसाहेबांना कळविले. आल्लदियाखांना ही गोष्ट मुळीच पसंत पडली नाही. ते हकीमसाहेबांना बोलले, " माझी लहर लागेल तोपर्यंत मी बडोद्यास आपल्याजवळ राहीन. नोकरीविषयी आपण जास्त खटपट करू नये—मला असल्या नोकरीची मुळीच पर्वा नाही. आमच्या हातात तंबोरा आहे आणि दुनिया आहे. कोठेही आम्ही पोट भरू." मौलाबक्षांच्या शास्त्रीय सवालांची

खांसाहेबांना फिकीर नव्हती. त्या जमान्यातील सुप्रसिद्ध संगीतशास्त्रज्ञ बहिरामखां यांच्या तोंडून शास्त्रीय चर्चा व कूट समस्या अल्लादियाखांनी मुबलक एकल्या होत्या व संग्रहित केल्या होत्या. परंतु गायनावरून गवैयाची योग्यता ठरविण्याऐवजी शाब्दिक पोपटपंचीवर त्याची लायकी ठरवायची, असल्या मूर्खपणाला मान तुकविणारी खांसाहेबांची वृत्ती नव्हती. केवळ हकीमसाहेबांच्या प्रेमळ आग्रहामुळे खांसाहेब बडोद्यास सुमारे दीड वर्ष राहिले. हकीमसाहेबांचे प्रयास चालूच होते.

खांसाहेबांना आता बडोद्याचा कंटाळा आला होता आणि मौलाबक्षांच्या कारवायांची किळस आली होती. शेवटी नाइलाजास्तव हकीमसाहेबांनी खांसाहेबांची मुंबईस रवानगी केली. मुंबईस हकीमसाहेबांचे एक संगीतप्रेमी स्नेही होते, त्यांच्याकडेच या दोघांच्या राहण्यासवरण्याची सोय त्यांनी केली होती. गु. भास्करराव बखले ज्या ज्या वेळी ही बडोद्याची दुर्घटना सांगत त्या त्या वेळी त्यांचे उद्‌गार असत की, खांसाहेब बडोद्यास नोकर झाले असते तर मी बडोद्यातून बाहेरच पडलो नसतो. परंतु त्यामुळे महाराष्ट्र या दोन अतुलनीय गायकांना आणि तीन प्रकारच्या उच्चतम गायकीला पारखा राहिला असता. ईश्वराचा कौल महाराष्ट्राच्या बाजूला होता !

## मुंबईचे प्रथम दर्शन

बडोदा येथील बनावाला विटून अल्लादियाखांसाहेब आपल्या बंधूंसह मुंबईस १८९३-९४ च्या सुमारास आले. ही घटना महाराष्ट्राला गायन-कलेच्या दृष्टीने फार भाग्याची ठरली यात संशय नाही. कारण अर्धशतकाच्या त्यांच्या वास्तव्यामुळे महाराष्ट्रामधील गायनकलेत अनेक प्रकारच्या नव्या रंगांची व रागांची भर पडली आणि गायकांना व रसिक श्रोत्यांना एक नवीनच सौंदर्यदृष्टी प्राप्त झाली. प्रथमतः महनीय बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांनी दक्षिण महाराष्ट्राला ख्याल गायकीची ओळख करून दिली आणि तिची मोहिनी महाराष्ट्रियांवर कायमची पडली होती. मधूनमधून भास्करराव बखले, अब्दुल्लाखां, रहिमतखां, अब्दुलकरीमखां, मुगलखां व त्यांचे चिरंजीव रजबअलीखां (देवास), धारचे हैदरखां, इत्यादी गायकश्रेष्ठ आपापल्या घराण्याच्या विशिष्ट गायकीचा प्रभाव महाराष्ट्रियांवर पाडत आले होते. तथापि कल्पना, शास्त्र व कला यांच्या त्रिवेणी संगमाचे अतुलनीय सौंदर्य प्रत्ययास आणून देणारी अशी गायनकला, अल्लादियाखांसाहेबांच्या रूपाने महाराष्ट्रात सतत पन्नास वर्षे आपले घर करून राहावी, हा योग महाराष्ट्राच्या भाग्याचा नव्हे असे कोण म्हणेल ?

बडोद्याच्या हकीमसाहेबांनी मुंबईच्या ज्या गृहस्थांना पत्र दिले होते तेदेखील हकीमसाहेबच होते व बडोद्याच्या हकीमसाहेबांप्रमाणे तेही गायनाचे अत्यंत षोकी, वृत्तीचे उमदे आणि प्रेमळ होते. खांसाहेबांना त्यांच्या बंधूंसह हकीम **अब्दुलवाहाब** यांनी मोठ्या आदराने आपल्या घरी ठेवून घेतले.

त्या काळी मुंबई शहर हल्लीच्या इतके अफाट व बकाल वाटत नव्हते. तरी पण या

जोधपूरवाल्या अनोख्या सभ्याचारी गायकांची तत्काळ प्रसिद्धी होण्याइतके मुंबई शहर लहानही नव्हते. तथापि खांसाहेबांचा मुंबईकर रसिक जनतेत बोलबाला होण्याचा लौकरच एक योग आला.

## मुंबईची पहिली सलामी

काळबादेवी रस्त्यावर **बापूतारा** या नावाचे एक गोवेकरांचे घराणे[1] मुंबईस फार प्रसिद्ध होते. संपत्ती, सौंदर्य, आदरातिथ्य आणि गुणिजनांचा परामर्ष इत्यादी गुणांमुळे मुंबई शहराला शोभा आणणारी गोवेकर कलावानांची त्या वेळी जी घराणी होती त्यांमध्ये बापूताराचें घराणे अग्रभागी होते. त्यांच्याकडे एक दिवस जलसा होता आणि हकीम-साहेबांमार्फत खांसाहेबांना आग्रहाचे निमंत्रण आले. कलासौंदर्य आणि ललनासौंदर्य एकवटून तेथील दुमदार दिवाणखान्याला जणू काय गंधर्वांच्या आणि अप्सरांच्या मेळाव्याचे स्वरूप आले होते. क्रमशः अनेक गायक-गायिकांची गाणी झाली. परंतु स्मरणात राहण्यासारखे असे **बाबलीबाईंचे** गायन झाले. दीड तासपर्यंत बाई फारच उत्तम गायल्या. **नत्थनखां** आग्रेवाले—म्हैसूरचे राजगायक—यांच्या त्या एकमेव पट्टशिष्या होत्या. नत्थनखांसाहेबांसारखे अतुल योग्यतेचे गायक—भास्करराव बखले यांचे दुसरे गुरू! मग दहा-बारा वर्षे त्यांची सतत तालीम मिळालेल्या अशा बाबलीबाईंच्या गाण्याचा प्रभाव काय विचारावा! पहाटे पाच वाजता त्यांनी गायन संपविले. सर्व मंडळींना वाटले की, जलसा आता संपला; कारण बाबलीबाईनंतर गाण्याचे धारिष्ट कोण करणार? इतक्यात बाई स्वतः अल्लादियाखांपुढे येऊन उभ्या राहिल्या आणि म्हणाल्या, "आपलं गाणं ऐकण्यासाठी मी माझं गाणं लौकर संपविलं आणि रात्रभर त्या आशेनं मी जागत राहिले आहे. माझी निराशा करू नये. आपलं गाणं ऐकल्यावाचून मी घरी जाणार नाही." इतक्या मिनतवारीला नकार देणे खांसाहेबांना शक्यच नव्हते. ते गायला बसले आणि एक नवेच वातावरण निर्माण झाले. चीज संपताच बाबलीबाई भर मैफलीत खांसाहेबांपुढे उभ्या राहिल्या आणि म्हणाल्या, "मला बोलल्यावाचून राहावत नाही. क्षमा करावी. आपलं गाणं ऐकलं नव्हतं म्हणून मला वाटत होतं, माझे गुरू नत्थनखांसाहेब यांच्या हयातीपर्यंतच गायनकला जिवंत राहणार–त्यांच्याबरोबरच ती नाहीशी होणार. आपण होऊन मी कबूल करते की, ती माझी चूक होती. आपण हयात आहात तोपर्यंत गायनकलेला मरण नाही खास!" एका घराण्याच्या नामांकित शिष्येने दुसऱ्या घराण्याच्या गायकाची अशी प्रांजलपणे केलेली प्रशंसा जमलेल्या सर्व श्रोत्यांवर परिणाम करती झाल्यास नवल नाही. खांसाहेबांचा लौकिक हां हां म्हणता मुंबईस पसरला. पण हा झाला त्यांच्या गायनाचा लौकिक. परंतु त्यांच्या विद्वत्तेचाही लौकिक होण्याचा प्रसंग लौकरच आला.

१. 'बापूतारा' या एक प्रसिद्ध गायिका होत्या. त्यांनी काही परंपरा जतन केली म्हणून त्यांचा उल्लेख घराणे म्हणून केला आहे. यांचे मूळ नाव ताराबाई वेलिंगकर.

मुंबईतील बहुतेक गायकांना तालीम देणारे छज्जूखां, नजीरखां, खादिमहुसेन हे तीन बंधू पंडित भातखंडे यांच्या शास्त्रचिकित्सेला आत्मीयतेने हातभार लावीत. हे तिघेही चांगले कलासंपन्न होते. तथापि शास्त्रीय चिकित्सा करण्यात त्यांना धन्यता वाटे. अल्लादियाखांसारखा एक मारवाड्चा गायक मुंबई शहरावर आपला प्रभाव पाडू लागलेला पाहून त्यांनी अप्रसिद्ध अशा काही रागांच्या स्वरूपाविषयी चर्चा करण्याचे खांसाहेबांना आव्हान दिले. खांसाहेबांनी पुराव्यानिशी त्यांची खात्री पटविली. परंतु छज्जूखां बंधूंच्या मनात तेव्हापासून अल्लादियाखांविषयी निष्कारण वितुष्ट राहिले. ('माझा संगीतव्यासंग' या पुस्तकात प्रस्तुत चरित्रलेखकाने वरील हकिगत थोड्या विस्ताराने दिली आहे.) मात्र याचा उलट असा परिणाम झाला की, शास्त्र व कला या दोहोंतही पारंगत असलेल्या या नवख्या जोधपूरच्या कसबी गायकाचा आणि हौशी बीनकार व 'संगीत रत्नाकर' या ग्रंथाचे संशोधन करणारे श्री. मंगेशराव तेलंग, त्यांचे बंधू पुरुषोत्तम तेलंग, डॉ. सर भालचंद्र भाटवडेकर इत्यादींसारख्या अनेक प्रतिष्ठित मंडळींचा व खांसाहेबांचा हळूहळू स्नेहसंबंध जडू लागला. शिवाय त्या काळच्या गायक-वादकांमध्ये अभावाने दिसून येणाऱ्या निर्मळ व सोज्वळ राहणीमुळे तर अल्लादियाखां हे उच्च दर्जाच्या समाजात इतर गायकांपेक्षा अधिक मानसन्मानाने वावरू लागले. शिवाय त्यांच्या स्वभावात द्रव्यलालसा, आशाळभूतपणा, प्रसिद्धीची हाव, आत्मप्रौढी इत्यादी अनिष्ट गुणांचा अल्पांशही नसल्यामुळे, थोरामोठ्यांच्या घरी त्यांचे केव्हाही आदरपूर्वक स्वागत होई. अशा प्रतिष्ठेने खांसाहेब मुंबईमध्ये कालक्रमणा करू लागले.

परंतु लौकरच मुंबई सोडून कोल्हापुरास जाण्याचा योग अगदी अकल्पित असा आला. पुढे त्यांचे वास्तव्यही कोल्हापुरासच झाले. तेव्हा ती सर्व हकिगत पुढील स्वतंत्र प्रकरणातच देणे योग्य ठरेल.

# ६. कोल्हापुरातील वास्तव्य

## कोल्हापुरचा योग

कृष्णाबाई कोल्हापुरकरीण या नावाच्या पुण्यास राहणाऱ्या एक प्रतिष्ठित गायिका होत्या. प्रो. विष्णुपंत छत्रे यांच्यापाशी त्यांनी संगीताचा अभ्यास केला होता. त्यांची एकुलती कन्या तानीबाई[1] या श्री. बापूसाहेब कागलकर (श्री. छत्रपती शाहू महाराज यांचे बंधू) यांच्या जहागिरीत नोकर होत्या. कृष्णाबाईंनी खांसाहेबांचे गायन ऐकले तेव्हापासून आपल्या कन्येला त्यांच्याकडून शिक्षण देऊन गायनकलेत प्रवीण करावी असा त्यांच्या मनाने ध्यास घेतला आणि बापूसाहेबांशी तसा त्यांनी हट्टच धरला. परंतु केवळ आपल्या आश्रिताला गायन शिकविण्यास कोल्हापुरास येऊन राहाल का, असे खांसाहेबां-सारख्या जाड्या विद्वानाला विचारायचे कसे, हा श्री. बापूसाहेबांना प्रश्न पडला. तेव्हा त्यांनी श्री. शाहू महाराजांच्या समोर खांसाहेबांच्या अतुलनीय गुणांची प्रशंसा करण्यास सुरवात केली. शाहू महाराजांना गाण्याचा मोठा षोक होता किंवा त्यातले त्यांना काही कळत होते असा मुळीच भाग नव्हता. परंतु प्रत्येक क्षेत्रामध्ये प्रकर्षाने चमकणारी व्यक्ती आपल्या राज्यात आहे असे अभिमानाने दाखविता यावे अशी त्यांची महत्त्वाकांक्षा होती. माणसाची अचूक पारख करून त्याला आपल्या अंकित करण्याचा विलक्षण गुण शाहू महाराजांच्या अंगी अगदी उपजत होता. आपल्याला डोईजड न होईल व आपल्या आश्रयाचा अभिमान वाटेल अशाच गुणमंडित व्यक्ती ते निवडून काढीत व स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाने त्यांना ते आपल्याशा करीत. शिकारी, फासेपारधी, साठमार, पहिलवान, गायक-वादक इत्यादींपासून तो थेट ऑफिसर्सपर्यंत त्यांची अशी निवड असे. कलाक्षेत्रात कोल्हापूरचे नाव अग्रगण्य ठरण्यास केवळ करवीर भूमीचाच गुण कारणीभूत आहे असे नसून, चाणाक्षपणाने गुणवान व्यक्तींची निवड करण्याचा श्री. शाहू महाराजांच्या अंगी असलेला गुण त्यास तितकाच कारणीभूत झालेला आहे.

श्री. शाहू महाराजांना खांसाहेबांचे गाणे ऐकविण्याचा योग श्री. बापूसाहेबांनी मुंबईस

१. पान ८ पहा. कोल्हापुरात राजघराण्याशी संबंधित आणखी एक गायिका तानीबाई (फोटो आर्टिस्ट शंकरराव घोरपडे यांच्या आत्या) होत्या. त्या या नव्हेत.

मुद्दाम घडवून आणला. त्या गायनाचा आणि खांसाहेबांच्या प्रतिष्ठित व्यक्तिमत्त्वाचा महाराजांच्या मनावर इतका परिणाम झाला की, खांसाहेबांना कोल्हापुरास आणण्याची श्री. बापूसाहेबांपेक्षा महाराजांनाच अधिक उत्कंठा लागून राहिली! राजाच्या मनाने घेतल्यावर अशक्य काय? खांसाहेब व त्यांचे पूर्वज उत्तरेकडील संस्थानिकांच्याच आश्रयाने आजपर्यंत राहिलेले. तेव्हा मुंबईच्या बकाली वातावरणापेक्षा नित्यपरिचित अशा संस्थानी मानपानाची खांसाहेबांना त्या काळात अधिक महती वाटावी हे साहजिक होते. दुसरी गोष्ट, खांसाहेबांनी पैशाची कधी हाव धरली नाही; तो त्यांचा स्वभावच नव्हता. पैसा सांभाळण्यापेक्षा प्रतिष्ठा व विद्या सांभाळणे हाच त्यांचा जीवितहेतू होता. तात्पर्य, उभयपक्षी सन्मान्य अटींवर खांसाहेब व त्यांचे बंधू हैदरखां करवीर संस्थानचे दरबारी गायक बनले.

## करवीर[२] निवास

श्री. शाहू छत्रपतींनी आपल्या अंतकालापर्यंत खांसाहेबांना आपुलकीच्या आदरभावनेने वागविले, हे पुढील हकिगतीवरून वाचकांच्या लक्षात येईल. खांसाहेबांना राहण्यासाठी त्यांना वंशपरंपरा मालकीचे घर, त्यांच्या कनिष्ठ चिरंजीवाच्या (शमसुद्दीन ऊर्फ भूर्जी) नावाने जमीन, बंधू हैदरखां यांना राजवाड्यातील कुलस्वामिनीच्या दरबारात गाण्याची नोकरी, पुढे मंजीखां यांना फॉरेस्ट खात्यात नोकरी, अशी सर्व तरतूद महाराजांनी करून दिली. आपल्या दरबारात खांसाहेबांसारखे अमूल्य रत्न आहे या गोष्टीचा अभिमान प्रसंग येईल तेव्हा ते प्रकट करीत. खांसाहेबांच्या समाधानी कलासर्वस्ववृत्तीला यापेक्षा अधिक कसली अपेक्षा असणार!

अल्लादियाखांसाहेबही या आपल्या आश्रयदात्या राजर्षीच्या गादीशी अंतकालपर्यंत एकनिष्ठ राहिले. अनेक संपन्न लोकांकडून चौपट तनख्याची आमिषे आली तरी त्यांनी त्याचा लोभ धरला नाही आणि इतर कोणाही संस्थानची किंवा व्यक्तीची नोकरी म्हणून जन्मभरात केली नाही. "माझे शाहूमहाराज मला मीठभाकर देत आहेत, तेवढी मला पुष्कळ आहे!" हेच त्यांचे प्रत्येकाजवळ अभिमानयुक्त एकनिष्ठेचे उद्‌गार असत.

खांसाहेबांना, जुन्या राजवाड्यातील सरकारी कुलस्वामिनीपुढे आठवड्यातून दोन दिवस मात्र गावे लागत असे. नवरात्रोत्सवाच्या नऊ दिवसांत एकदोन वेळा आपल्या इच्छेनुसार खांसाहेब जाहीररीत्या गात असत. शिवाय पंतअमात्य श्री. माधवराव बावडेकर आदी प्रमुख संस्थानिकांकडे व गुणिजनांच्या मैफलींत ते महाराजांची परवानगी घेऊन गात असत. पंचवीस वर्षांच्या या कालखंडात (सन १८९६ ते सन १९२१–२२ पर्यंत) त्यांची भर जवानीतील गाणी कानावर पडल्यामुळे, कोल्हापुरच्या रसिकांचे कान विशेष चोखंदळ व चिकित्सक झाले असले तर नवल नाही.

जुन्या राजवाड्यात देवीपुढे खांसाहेब व बंधू हैदरखां हे नवरात्रामध्ये प्रथमच गायला

२. करवीर हे कोल्हापुरचे पुरातन नाव. अजूनही कोल्हापूर हे करवीर तालुक्यातच समाविष्ट आहे.

बसले. स्थानिक व आसपासचे अनेक गायक उत्सवानिमित्त जमले होते. त्या बंधुद्वयाचे राजस्थानी पद्धतीने बांधलेले झोकदार फेटे, त्यांची धोतर नेसण्याची नवी तऱ्हा, रुबाबदार गलमिशा आणि चेहऱ्यावरील विद्येचे तेज व आत्मविश्वास यांची सर्वांवर एकदम छाप पडली. गाणे सुरू झाल्यावर लयबद्ध स्वर लावण्याच्या पद्धतीपासून तो तानक्रियेपर्यंतचे नवेनवे प्रकार ऐकताना आपण एका नव्या सृष्टीत वावरत आहोत असे प्रत्येकाला वाटले. दक्षिणी गवयांची ख्याल-गायकी या उत्तरेकडील साजशृंगारापुढे कानाला फिकी वाटू लागली. नित्य परिचयाचा तोडी रागच पण अगदी नव्या पेहरावात! ग्वाल्हेरी परंपरेची साधीसुधी सरळ गायनपद्धतीच नेहमी कानावर असल्यामुळे खांसाहेबांची गायकी असामान्य व आकर्षक वाटे. परंतु तिचे मर्म ध्यानात न आल्यामुळे व तिच्या कोणत्याही अंगाचे अनुकरण करणे अशक्य वाटल्यामुळे प्रथम काही वर्षे कोल्हापुरातील व दक्षिणेतील गायकांना खांसाहेबांविषयी आदराऐवजी उपेक्षेची भावना दाखविणे, हेच आपली प्रतिष्ठा राखण्याचे सोयिस्कर साधन वाटू लागले.

## विरोधी वातावरण

अल्लादियाखां कोल्हापुरास नोकर झाले त्या वेळी मुगलखां व त्यांचे चिरंजीव सुप्रसिद्ध रजबअलीखां कोल्हापुरास होते. त्या वेळी खांसाहेबांची खरी योग्यता कोणी जाणली असेल आणि त्यांच्या गाण्यावर खरी आसक्ती कोणी ठेवली असेल तर ती रजबअलीखां यांनी. वडिलांच्याकडून त्यांना गाण्याचे शिक्षण मिळाले होतेच. त्याखेरीज त्यांनी बीन, सतार, जलतरंग वगैरे वाद्यांवरदेखील तरुणपणी प्रावीण्य मिळविले होते. बुद्धीचे तल्लख आणि मेहनतीचे खंबीर असल्यामुळे त्यांना अल्लादियाखांच्या गाण्याची ढब उचलण्याची ईर्ष्या वाटू लागली आणि लपूनछपून त्यांचे गाणे ऐकण्याची ते कोशीष करीत. पूर्वी हद्दू–हस्सूखनी पलंगाखाली लपून बडे महमदखांची गायकी उचलण्याचा प्रयास केला, तसलाच हा लहान प्रमाणात प्रयास होता! अल्लादियाखांच्या कानावर जेव्हा ही कारवाई गेली तेव्हा त्यांनीही उलट एक तरकीब केली. मंदिरात गाताना ते अस्ताई, अंत्रा, आभोग, संचारी अशी चार अंगे असलेली लांबलचक ध्रुपदे म्हणू लागले! अशी असंख्यात ध्रुपदे कंठगत असल्यामुळे ती कित्येक वर्षे पुरून उरली आणि ऐकणाराच्या पदरात काहीच पडेनासे झाले; कारण प्रत्येक वेळी नवे ध्रुपद व नवी रागिणी! यामुळे तीन गोष्टी घडून आल्या. ध्रुपदाच्या गायकीचे गंभीर सौंदर्य कोल्हापुरच्या गायक-वादकांच्या प्रत्ययास आले, खांसाहेबांच्या अगाध गायनभांडाराची प्रचिती आली आणि त्यांच्या चिजांची उजळणीही झाली! मात्र रजबअलीखां यांना त्याचा विषाद वाटणे क्रमप्राप्तच होते. प्रस्तुत लेखकाने एकदा खांसाहेबांचे बंधू हैदरखां यांच्याजवळ याबाबत भाषा काढली त्या वेळी ते म्हणाले की, "उवड उवड गंडा बांधून शिकायला रजबअलींना कमीपणा वाटतो त्याला कोण काय करणार? माझ्या भाईसाहेबांना चोरून शिकण्याची कारवाई मुळीच आवडत नाही." पुढे पुढे हे वितुष्ट वाढतच चालले.

रजबअलीखांचे घराणे आणि अल्लादियाखांचे घराणे निरनिराळे, तेव्हा एकाने दुसऱ्या घराण्याचे राजरोस शिष्यत्व पतकरणे ही केवढी तरी अप्रतिष्ठा! उभयपक्षी उत्कट इच्छा असूनही अल्लादियाखांसाहेबांना जयपुरास मुबारकअलीखांचे शिक्षण घेणे ज्या कारणामुळे अशक्य झाले तेच कारण कोल्हापुरास रजबअलीखांच्या आड आले! अर्थात लहानाची फार मोठ्या व्यक्तीशी तुलना करणे चुकीचे आहे; परंतु इतिहासाची पुनरावृत्ती कशी होते हे दाखवण्यापुरतेच त्याचे महत्त्व. रजबअलींचे वयोवृद्ध वडील मुगलखां हे करवीर देवस्थानात नोकर होते. कोल्हापुरचे एक अत्यंत रसिक जहागीरदार श्रीमंत बाळासाहेब गायकवाड यांना सतार वाजविण्याचा मनस्वी शोक होता. म्हणून रजबअलीखांना त्यांनी आपल्याजवळ ठेवले होते. व्यक्ती-व्यक्तींमधील वितुष्ट भोवतालच्या पक्षाभिमानी मंडळींमुळेच वाढत राहते. अर्थात बाळासाहेब गायकवाड यांचा एक पक्ष आणि बापूसाहेब महाराज यांचा दुसरा म्हणजे अल्लादियाखांचा पक्ष असे दोन विरोधी तट पडले. या विरोधाची मजल पुढे अशा थराला गेली की अल्लादियाखां हे खानदानी गवयीच नाहीत, त्यांना घराणे नाही, परंपरा नाही, असा त्यांच्याविरुद्ध प्रवाद सुरू करण्यात आला. तो अल्लादियाखांच्या कानावर पडताच त्यांनी आपल्या जन्मभूमीहून आपली वंशावळ व पूर्वजांनी जोधपुरास गायनकलेवर मिळवलेला ताम्रपट मागविला आणि तो श्री. शाहूमहाराजांच्यापुढे सादर केला. मग काय! महाराजांचा व बापूसाहेबांचा आनंद पोटात मावेना! प्रत्येक सरदारा-पुढे, अधिकाऱ्यापुढे, कारकुनापासून तो हुजऱ्यापर्यंत खांसाहेबांच्या ताम्रपटाचे कौतुक शाहूमहाराज करीत! येथून पुढे तर महाराजांना खांसाहेबांविषयी वाढता अभिमान व आपलेपणा वाटू लागला; कारण महाराजांची पारख सर्व कसोट्यांना शंभर टक्के उतरली.

खुद्द खांसाहेबांना मात्र ही घासाघीस मुळीच आवडली नाही. उत्तरेतून दक्षिणेत येताच बडोद्यामध्ये मौलाबक्षाचे, मुंबईस छज्जूखां-नजीरखांचे, आणि आता कोल्हापुरास रजबअलींचे वितुष्ट संपादन करण्याचे विनाकारण प्रसंग आले, याचा त्यांना अत्यंत विषाद वाटला. विशेषतः विद्येने किंवा गुणाने त्यांच्या उच्च पायरीला हात लावण्याची ज्यांची कुवत नव्हती, त्यांनी तिला पाय लावण्याचा प्रयत्न लोकांच्या चिथावणीने करावा याचा त्यांना फार खेद वाटला. तरी पण, शाहूमहाराजांच्या प्रेमळ पाठिंब्यावर व आपल्या गुणाच्या सामर्थ्यावर त्यांनी महाराष्ट्रातील आपले आसन शाबूत ठेवले आणि थोड्याच अवधीत संगीतक्षेत्रातील आपला ज्येष्ठ अधिकार जो एकदा प्रस्थापित केला, तो आपल्या अंतकालापर्यंत अबाधित राखला.

पहिली दहा-बारा वर्षे या दोघाही बंधूंना कोल्हापूरची हवा मानवली नाही व इकडचे धान्यही पचनी पडले नाही. शैत्य व संग्रहणीसारख्या आजारांशी पाचसहा वर्षे त्यांना झगडावे लागले. सन १९०० सालापासून कोल्हापूर संस्थानामध्ये प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यामुळे घरदार सोडून दरवर्षी पन्हाळ्यास किंवा रजपूतवाडीच्या माळावर झोपडीमध्ये पाचसहा महिने त्यांना कष्टाने काढावे लागत. बुंदीहून वरची मुलेमाणसे त्यांनी आता कोल्हापुरास आणविली होती म्हणून जेवण्याखाण्याचे तरी हाल वाचले; नाहीपेक्षा

त्यांना दक्षिणेत वास्तव्य करणे अशक्य झाले असते. या पहिल्या आठदहा वर्षांमध्ये राजबंधू श्री. बापूसाहेब कागलकरांच्या आश्रित श्री. तानीबाई यांना तालीम देणे व घरी आल्यावर बंधू हैदरखां यांना तालीम देणे ही दोनच महत्त्वाची कर्तव्ये खांसाहेबांनी केली. खांसाहेबांच्या ऐन उमेदीतील जोरकस व पेचदार गायकीचा रंग तानीबाईंच्या गाण्यामध्ये जितका दिसून येई तितका तो त्यांच्यानंतरच्या शिष्यांमध्ये दिसून येत नाही. प्रस्तुत लेखकाला व भास्करराव बखले (हे त्या वेळी धारवाड येथे ट्रेनिंग कॉलेजमध्ये संगीताचे प्रोफेसर होते व बडोद्याचे फैझमहमदखां व म्हैसूर दरबारचे नत्थनखां यांचे शिष्य होते व त्यानंतर अल्लादियाखांसाहेबांचे त्यांनी शिष्यत्व पतकरले आणि त्यांची थोरवी महाराष्ट्राला मान्य करायला लावली) यांना तानीबाईचे गायन ऐकायला एकदा खांसाहेबांनी मुद्दाम नेले होते. त्या वेळी " जैता गुणकली "सारख्या मुष्कील रागिणीमध्ये त्या खांसाहेबांच्या बरोबरीने गळा फिरवू लागल्या होत्या! केसरबाईंना मिळालेली तालीम त्या मानाने खांसाहेबांच्या उतारवयामधील—म्हणजे साठी उलटल्यानंतर; मात्र ती तालीम वयोमानाने मुरून मुलायम झालेल्या विद्येची होती. म्हणूनच केसरबाईंच्या गाण्यामध्ये करामतीच्या अजस्रपणाइतकाच कंठाचा नरमपणा आढळून येतो आणि त्यामुळे त्यांची बिकट गायकी-देखील तज्ञांवर व अज्ञांवर सारखीच मोहिनी घालू शकते, याचा सर्वांनाच प्रत्यय आहे.

## हैदरखांसाहेब

बंधू हैदरखां यांच्या आवाजासारखा सुंदर आवाज फार थोड्या गायकांना मिळाला असेल. परंतु तरुणपणी त्यांच्या संगीतशिक्षणाची थोडीफार आबाळच झाली होती. शिवाय दांडपट्टा, भालाफेक, निशाणबाजी वगैरेंसारखे अवखळपणाचे चाळे करण्याचा त्यांना मनस्वी नाद! कोल्हापुरास आल्यावर मात्र खांसाहेबांनी त्यांना बरेच शिक्षण दिले आणि गाण्याची त्यांच्याकडून मेहनत करून घेतली. पुढे शेवटपर्यंत हैदरखांनी आपल्या गुरुतुल्य बंधूच्या गायनाची साथ करण्याचे शक्यतो टाळले नाही. 'टाळले नाही' म्हणण्याचे कारण, प्रपंचातील मतभेद, बेबनाव, स्वभाववैचित्र्य इत्यादी कारणांनी स्वयंपाकघरात भांड्याला भांडे आपटू लागल्यामुळे निराळ्या चुली व निराळी बिऱ्हाडे करणे भाग पडले असले, तरी उभयतांच्या बंधुप्रेमात कधी न्यून पडले नाही. खांसाहेबांची भर मैफलीमध्ये साथ करता करता हैदरखांचा कंठ दाटून येई व डोळ्यांतून अश्रू निघत! याचे कारण खांसाहेबांच्या कल्पनातीत गानसौंदर्याचा अभिमानपूर्वक आनंद त्यांच्या हृदयात दाटून येई हे तर खरेच, परंतु अशा अतुल गुणवंत बंधूच्या अष्टौप्रहर सान्निध्याला मुकावे लागले याची जाणीव त्यांना शल्यासारखी टोचत असे.

## एक अविस्मरणीय मैफल

सन १९३४ साली बॉम्बे म्यूझिक सर्कलतर्फे अल्लादियाखांसाहेबांचे सँडहर्स्ट रोड, भटवाडीतील लक्ष्मीबाग हॉलमध्ये हैदरखां साथीला बसलेले शेवटचे गायन! मध्ये

खांसाहेब, डाव्या बाजूला हैदरखां, उजव्या बाजूला भरजवान पुत्र मंजीखां तंबोरे छेडीत आहेत; दोघेही आवाजदार! मध्ये ऐंशी वर्षांचे जणू काय सिंहासनस्थ राजर्षी, सम्राट अल्लादियाखांसाहेब; समोर गानदेवता तानरसखांचे नामवंत पुत्र उमरावखांसाहेब, 'आफताबे-म्युसिकी' सुप्रसिद्ध फैय्याझखां, प्रो. विलायतखां इत्यादी मुंबईतील सर्व घराण्यांच्या प्रमुख कलाकारांचा व रसिक जनतेचा तो चिकित्सक व मार्मिक असा भरगच्च मेळावा होता. संध्याकाळचा समय होता आणि या गायनत्रिमूर्तींनी 'जैतश्री' रागाचा ख्याल अशा काही लक्षणाने सुरू केला, की मावळत्या सूर्यनारायणाला हे सामवेदी तपस्वी स्वरसिद्ध मंत्रोच्चारपूर्वक जणू काय अर्घ्यप्रदान करीत आहेत असा भास झाला! इतके त्या गायनात पावित्र्य व गांभीर्य होते. जवळजवळ तासभर अस्ताई खूपच खेळविली. इतक्यात समोर बसलेले उमरावखां मध्येच म्हणाले, "अंत्रा तो कहो!" खांसाहेब ऐन रंगात आलेले; भरतीच्या लाटा एकामागून एक उसळत याव्यात आणि पुढच्या लाटेला आपल्या पोटात सामावून दुप्पट आवेशाने किनाऱ्यावर आदळाव्यात, तशी खांसाहेबांच्या तानांची तुफानी क्रीडा चालली होती! साहजिकच अंत्र्याचे बोल त्यांना तत्काळ आठवेनात! मोठा बेइज्जतीचा प्रसंग! दोन सेकंदच अशा भांबावलेल्या अवस्थेत गेले असतील, इतक्यात हैदरखांनी अंत्र्याचे 'श्याम बिना' हे बोल तारषड्जाला भिडविले. एवढा इषारा मिळताच खांसाहेबांपुढे अंत्रा हात जोडून उभा राहिला! या जलशयात त्रिवेणी, भूपनट या नव्या रागिणींमधील खांसाहेबांचा अनिर्बंध विलास श्रोत्यांना मनमुराद ऐकावयास मिळाला. पुत्र मंजीखां यांच्या सुंदर व तयार गळ्याला तुलना नव्हती; तरीदेखील त्यांना खांसाहेबांच्या जातीने गळा फेकणे अशक्य झाले. एकदा तर हताश होऊन ते उद्गारले, "अब क्या खाक गाऊं!" असे हे अविस्मरणीय गायन झाले. खांसाहेबांना मात्र या गाण्याचे एकच महत्त्व वाटले; प्रत्येक वेळी त्यांचे एकच उद्गार निघत की "समयसूचकता दाखवून हैदरखांने माझी अब्रू बचावली!" कलेच्या बाबतीत किंचितही नामुष्की येणे हे त्यांना खपत नसे.

हैदरखां यांना स्वतंत्र गायनापेक्षा खांसाहेबांच्या साथीला बसण्यातच विशेष प्रेम व धन्यता वाटे. विद्यादानाच्या बाबतीत हैदरखांसारखे उदारात्मे फार क्वचित आढळतात. कोल्हापुरात थोरल्या खांसाहेबांनी तानीबाईंना तयार केले, तर धाकट्या हैदरखांसाहेबांनी श्रीमती लक्ष्मीबाई जाधव यांना तयार केले. उच्च दर्जाच्या गायनाची जोपासना करणाऱ्या ज्या थोड्या कीर्तिमान गायिका आज महाराष्ट्रात उपलब्ध आहेत त्यांमध्ये लक्ष्मीबाईंचे नाव प्रामुख्याने घेतले जात आहे. गायनविद्येच्या व्यासंगाची त्यांच्याइतकी आवड क्वचितच आढळेल.

हैदरखांच्या हयातीची शेवटची दहाबारा वर्षे मुंबईमध्ये गेली. तेथे त्यांनी बऱ्याच गायिकांना शिक्षण दिले. त्या सर्वांमध्ये चमकून राहिलेल्या अशा भारतीय कीर्तीच्या श्रीमती मोगूबाई कुर्डीकर या होत. श्रीमती केसरबाई केरीकर आणि श्रीमती मोगूबाई कुर्डीकर या दोघी अनुक्रमे अल्लादियाखां व हैदरखां यांच्या गायनशिक्षणाचा प्रभाव

दाखविणाऱ्या गायनतारका, श्रोत्यांना आजकाल आल्हाद देत आहेत. सारांश, विद्यादान-उदार, निष्ठावान व अत्यंत प्रेमळ असे हैदरखां हे एक कंठसुंदर गायक होऊन गेले. सन १९३६ साली त्यांचा अंतकाल झाला आणि अल्लादियाखांच्या साथीची प्रभावळ नाहीशी झाली! हैदरखांसाहेबांच्या स्मृतिप्रीत्यर्थ कथानकाचा क्रम किंचित बदलावा लागला. वाचकांनी क्षमा करावी.

## मुलांचे शिक्षण

कोल्हापुरास आपले वास्तव्य आता कायम झाले अशी खांसाहेबांना खात्री वाटल्यानंतरच आपल्या मुलामाणसांना त्यांनी सन १९०० च्या सुमारास कोल्हापुरास आणले. तोपर्यंत एक स्वयंपाकी व हे दोघे बंधू इतकाच प्रपंच असे. कोल्हापुरास मुले आली त्या वेळी थोरल्याचे (बडेजी) वय सुमारे बारा वर्षांचे, मधल्याचे (मंजी) दहा वर्षांचे आणि धाकट्याचे (भूर्जी) आठ वर्षांचे होते. कोल्हापुरास दरवर्षी प्लेगचा उपद्रव होऊ लागल्यामुळे कँपमध्ये दरसाल चारसहा महिने त्यांना काढावे लागत. तरीदेखील हैदरखांना, तानीबाईंना व मुलांना संगीताचे शिक्षण देण्याचा खांसाहेबांचा क्रम अव्याहत चालू असे. मुलांना काही वर्षेपर्यंत फक्त ध्रुपद-धमाराच्या चिजांचे शिक्षण खांसाहेबांनी व हैदरखांनी दिले. स्वरसाधनेपलीकडे तानपलटे, गळा फिरविणे वगैरे प्रकारचे शिक्षण त्यांना कधीच दिले गेले नाही. तथापि तानीबाईंची तालीम मुलांना नित्य ऐकायला मिळत असे आणि मुले आपण होऊनच खांसाहेबांच्या अपरोक्ष त्या तऱ्हेने गळा फेकू लागली!

एक दिवस श्री. बापूसाहेब कागलकरांच्या बंगल्यात खांसाहेब व हैदरखां 'मेरो पिया' ही नायकी-कानड्यातील चीज गात होते. बडेजी व मधले मंजी हे दोघे पुत्र, तंबोरे छेडीत होते. मधूनमधून ते आळीपाळीने एखादी तान घेत. ते पाहून बापूसाहेब म्हणाले, "खांसाहेब, तुम्ही तर सांगता की मुलांना फक्त ध्रुपदधमाराची तालीम चालू आहे-इतक्यात गळा फिरविण्याची त्यांना मना आहे-आणि ही पोरं तर ताना मारून राहिली आहेत; हे कसं?" खांसाहेब स्वतःच आश्चर्यचकित झाले होते. "तानीबाईंची तालीम ऐकून चारदोन ताना घेतल्या-मी त्यांना शिकविल्या नाहीत." इतके बोलून आपण स्तब्ध राहिले आणि मुलांनाच मनसोक्त गाऊ दिले आणि शेवटी दोघांनाही जवळ घेऊन कुरवाळले. त्या दिवसापासून मुलांना ख्यालाची तालीम त्यांनी सुरू केली.

## भूर्जीखां

धारणाशक्ती इतकी चांगली असूनही, मुलांचे लक्ष, खांसाहेबांना पाहिजे होते तितके, गाण्याकडे मुळीच नसे. मुलेच ती! शिवाय राजवाड्यातील थोरामोठ्यांच्या मुलांची संगत! मोठ्याला—बडेजीला—क्रिकेटचा पराकाष्ठेचा नाद, तर मंजीला सायकलपोलोचा नाद! भूर्जीखांला इंग्रजी व संस्कृत शिकण्यासाठी वाड्यावरील इतर मुलांबरोबर पाठविण्याची शाहूमहाराजांनी आज्ञा केलेली! परंतु मुसलमानाला संस्कृत शिकण्याचा भ्रष्टाकार करण्यास

मास्तर मनापासून कबूल नव्हते; या कारणाने भूर्जीखांला ना संस्कृतचा ना इंग्रेजी शिक्षणाचा फायदा मिळाला. बरोबरीच्या मुलांमध्ये खेळण्याबागडण्यातच त्याचे दिवस गेले. थोरल्या भावांच्या बरोबर कधीमधी गायला बसेल तीच काय ती तालीम. भूर्जीखांचा आवाज लहानपणी दोघाही भावांपेक्षा पल्लेदार व छानदार होता; बुद्धीदेखील तेजस्वी असल्यामुळे भावांची तालीम ऐकूनच त्यांच्या सर्व चिजा तो गात असे. परंतु पुढे बडेजीच्या व मंजीच्या लग्नाकरता तो उनियारास गेला तेव्हा तेथे 'मोतीझरा'चा (अंगावर पुरळ उठून ताप येणे–मधुराज्वराप्रमाणे) त्याला आजार झाला. आणि खेड्यातील गावठी आसुरी इलाज! डोक्यावर थंड पाण्याचे घडेच्या घडे रिते करावयाचे! त्यामुळे छातीत भयंकर कफ व नाकातून रक्त जाऊ लागले; डोके हलके झाले आणि पूर्वीची स्मरणशक्ती व धारणाशक्ती उरली नाही. शिकविलेल्या चिजांचीदेखील आठवण राहीना! आवाजात कायमचा बिघाड उत्पन्न झाला. अशा दुर्दैवामुळे ऐन शिक्षणाच्या व मेहनतीच्या वयात बिचाऱ्या भूर्जीखांची गाण्याबाबत उमेद खचली तर आश्चर्य नाही. शाहूमहाराजांनी जमीन दिली होती. तेव्हा शेतकीकडे व इतर काहीतरी व्यवसायात गुंतवून घेण्यावाचून त्यांना गत्यंतर नव्हते. देवीच्या मंदिराची नोकरी असल्यामुळे तेथे रोज तासभर गावे लागे हाच काय तो गायनाचा व्यासंग! (आणि तो मात्र शेवटपर्यंत चालू होता.) स्मरणशक्ती वगैरे सुधारली, परंतु छातीचा कमकुवतपणा व गळ्याचा बिघाड काही सुधारला नाही. तरीसुद्धा बुद्धी जातीचीच सतेज असल्यामुळे त्यांच्या गायनात वडिलांच्या गायकीची काही अंगे हुबेहूब आढळून येत. चिजांचे भांडवल होते, घराण्याचे संस्कार होते, परंतु छातीच्या कमजोरपणामुळे मैफली गाजविण्याचे भाग्य त्यांना लाभले नाही.

खांसाहेबांच्या सर्वांत वडील पुत्राचादेखील असाच प्रकार झाला. मंजीखां किंवा भूर्जीखांच्या मानाने बडेजीचा गळा किंचित बोजड असल्यामुळे त्यांनी कुवतीपेक्षा जास्त जोराने काही काळ मेहनत केली. त्याचा परिणाम मात्र असा अनिष्ट झाला की गाता गाता त्यांच्या छातीतून रक्त पडू लागले! शेवटी अनेक उपचार करूनही काही फायदा झाला नाही. तेव्हा डॉक्टरांच्या सांगण्याप्रमाणे त्यांना गायन अजिबात सोडावे लागले. ते उनियारास संस्थानी नोकरी व घरदार संभाळून आहेत.

## मंजीखां

मंजीखांचा गळा सुंदर, तालीम पोहोचलेली, जन्मजात रसिकवृत्ती; परंतु मेहनतीच्या ऐन जमान्यात सरदारी छानछुकीचा व डामडौलाचा जो त्यांच्यावर पगडा बसला तो अशा थराला पोहोचला की गवयाचा पेशा करणे किंवा तो सांगणे हेदेखील त्यांना अप्रतिष्ठेचे वाटू लागले! आणि घरची अफाट विद्या शिकण्याचे सोडून त्यांनी जंगलखात्यात इन्स्पेक्टरची नोकरी पत्करली!! दूरवरचा पोच नसल्यामुळे आपण केवढी पिढीजाद दौलत पायाखाली तुडवीत आहोत व पित्याचा वारसा गमावीत आहोत याची त्या वयात त्यांना कल्पना आली नसावी. गवयाचं जिणं लाजिरवाणं—ते सरदारी जिणं नव्हे—एवढी एकच

भावना त्या वेळी त्यांच्या डोकीत ठाव धरून बसलेली होती. तरी पण सुदैवाने त्यांच्यामधील उपजत कलावानाची रसिक वृत्ती सदैव जागरूक राहिली आणि जंगलातून एकाकी फिरताना आपसूकच त्यांच्याकडून गायनाचा रियाझ होऊ लागला. त्यामुळे पुढे पाचसहा वर्षांनंतर त्यांच्या अनेक हितचिंतकांनी—विशेषतः बापूसाहेब कागलकरांनी—अत्यंत कळकळीने त्यांचे डोळे उघडले; इतकेच नव्हे तर त्यांच्याकरिता म्यूझिक सुपरिटेंडंट अशा हुद्द्याची जागा निर्माण केली. चमत्कार असा की आपला श्रेष्ठ दर्जा राखण्यासाठी पुन्हा गायनाची मेहनत त्यांना करावी लागली नाही; ते असामान्य गायकाच्या दर्जाला तत्काळ पोहचू शकले! देवीच्या गाभाऱ्यातील गायन जसे भूर्जीखांना अंतकालपर्यंत उपकारक ठरले; तसे जंगलातील अनिर्बंध मेहनतीचे पुण्य मंजीखां यांना जन्मभर पुरे पडले! आपल्या पिढीजाद गायनकलेची मुलांच्याकडून कोणत्या ना कोणत्या कारणाने होत असलेली आबाळ व उपेक्षा पाहून अल्लादियाखांसाहेबांना अत्यंत वाईट वाटे. तेव्हापासून त्याबाबत निराशा होऊन त्यांची अशी ठाम कल्पना झाली होती की आपल्या घराण्यातील विद्या आता अस्ताच्या मार्गाला लागली. बंधू हैदरखां मृत्यू पावले; वडील चिरंजीव छातीच्या विकारामुळे अधू झालेले; त्यानंतर घराण्याचा लौकिक फैलावणारा व नुकताच ढगांतून बाहेर पडलेल्या सूर्याप्रमाणे तळपू लागलेला पुत्र मंजीखां वयाच्या अवघ्या अठ्ठेचाळिसाव्या वर्षी दिवंगत झाला; स्वतःचे वय ऐंशीच्या जवळ गेलेले! अर्थात आपल्या घराण्याची विद्या संपुष्टात आली अशी त्यांची भावना होणे साहजिक होते. तथापि म्हातारपणीदेखील त्यांच्या गायनाचा प्रभाव श्रोत्यांवर हमखास पडत असे. गायनाची ही एक नवीनच निराळी दुनिया आहे असा सर्वांना प्रत्यय येत असेच; तथापि तो त्यांच्या वैयक्तिक बुद्धिमत्तेचा व गुणसंचयाचा प्रताप होता. परंतु घराण्यातील हजारो चिजा, कितीतरी अप्रसिद्ध राग व त्यांचा निभाव करणारी गायकी इत्यादी गोष्टी स्वतःच्या बरोबरच नष्ट होणार याचे त्यांना किती दुःख होत राहिले असेल याची कल्पनादेखील इतरांना होणे अशक्य. बरे, गाण्याचा पेशा करून परंपरेचा निसुळता धागा वळणारे एकटे भूर्जीखां, परंतु त्यांची प्रकृतीही गाण्याची मेहनत करण्यासारखी कणखर नसल्यामुळे व आवाजाचा भरवसा नसल्यामुळे जी काही विद्या त्यांना मिळाली तेवढ्यावरच त्यांना नाइलाजाने संतुष्ट राहून गुजारा करणे भाग पडले. तथापि ते गायनकेसरीचेच छावे असल्यामुळे खांसाहेबांच्या गायकीची विशिष्ट अंगे श्रोत्यांना पटविण्याइतके त्यांच्या अंगी सामर्थ्य होते. असे असले तरी खांसाहेबांच्या मनाला तेवढ्याने कितीसे समाधान वाटणार! संगीताच्या बाबतीत आपले घराणे उजाड झाले अशा निराशेने त्यांना अखेरच्या दशकामध्ये ग्रासले होते यात संशय नाही.

कोल्हापुरातील त्यांच्या पंचवीस वर्षांच्या वास्तव्यात खांसाहेबांची अनेक गाणी झाली. ती त्या त्या वेळी एकजात वाखाणली गेली. त्या प्रत्येकाचे वर्णन करणे म्हणजे एकाच झाडाला लागणाऱ्या प्रत्येक गुलाबाच्या फुलाचे तेच ते वर्णन केल्यासारखे होईल. अगदी थोडक्यात सांगायचे म्हणजे मुरलेली विद्या, बुद्धीची अचाट करामत व मेहनतीचा प्रभाव ही तिन्ही अंगे सौंदर्यदृष्टीच्या मुशीतून तावून-सुलाखून निघालेली अशी त्यांच्या प्रत्येक

गाण्यात प्रतीत होत. सारांश, खांसाहेबांच्या ऐन जोषाच्या व पूर्ण विकास पावलेल्या कलेच्या जल्लोषाची ती कोल्हापुरातील पंचवीस वर्षे होती.

### मधाचा रांजण

एकदा १९०२ मध्ये विष्णुपंत छत्रे (आद्य सर्कसवाले) कोल्हापुरास आले. हद्दूखांचे चिरंजीव भूगंधर्व रहिमतखां त्यांच्याबरोबर आले होते. शाहूमहाराजांची व विष्णुपंतांची भेट झाली त्या वेळी ते म्हणाले, "महाराज, आपली सेवा मी कोणत्या रीतीने करू शकणार? पण माझ्याबरोबर मी मधाचा रांजण आणला आहे, त्याचा आपण स्वाद घ्यावा. ग्वाल्हेरच्या हद्दूखांचे चिरंजीव रहिमतखां यांना मी या खेपेस घेऊन आलो आहे; त्यांचे गायन आपण ऐकावे. पण आम्ही येणार असं ऐकताच आपले दरबारचे गवई अल्लादियाखां आपल्या गावी रवाना झाले असं ऐकतो! ते इथं असायला पाहिजे होते." शाहूमहाराजांना साहजिकच ही भाषा झोंबली. खांसाहेब काही आकस्मिक कारणाकरिता उनियारास गेले होते. तेव्हा त्यांना तारेने बोलावून घेतले आणि शाहूमहाराजांनी एके रात्री मैफल भरविली. रहिमतखां म्हणजे कंठमधुर भूगंधर्व आणि वृत्तीने अवलिया! अल्लादियाखांसाहेबांचे गायन ऐकून बडोद्यास एकदा रहिमतखांनी जे प्रशंसेचे उद्गार पूर्वी काढले होते ते विष्णुपंतांना खटकत होते. अल्लादियाखांचा पाडाव करण्याची आता आपल्याला चांगलीच संधी मिळाली अशा आनंदात ते म्हणाले, "हुजूर, आपले दरबारचे गवई प्रथम गाऊन घेऊ देत, कारण रहिमतखांनंतर रंग जमविण्याचं कर्म फार कठीण आहे, म्हणून म्हणतो!" महाराजांनी खांसाहेबांना गायला बसवले. खांसाहेब दोन-अडीच तास एकच राग आणि एकच चीज अशी सांगोपांग गायले की तज्ञांवर आणि अज्ञांवरही त्यांच्या अफाट कलेचा सूर्याप्रमाणे एकजात प्रभाव पडला. नंतर रहिमतखांसाहेबांना विष्णुपंत छत्र्यांनी गायला बसविले. बनारसमध्ये रहिमतखां सैरभैर स्थितीत असताना श्री. छत्र्यांनी त्यांना गाठून आपल्या नजरेत व जरबेत ठेविले होते. दादा (छत्रे) सांगतील तेव्हा, सांगतील तसे गायचे आणि सांगतील तेव्हा गाणे बंद करायचे—अशा सर्कशीतील कडक शिस्तीत रहिमतखांना त्यांनी जखडलेले होते! मात्र त्यामुळे त्या दिव्य गायनाचा आस्वाद जनतेला थोडा तरी घेता आला. रहिमतखांचा तो दिव्य आवाज, ते गाण्यातील बाळसे– अवर्णनीयच! चिजेची मांडणी करून चारदोन ताना जुल्माने त्यांनी घेतल्या आणि कधी न झालेली गोष्ट त्या वेळी झाली– रहिमतखांना वाचा फुटली आणि मध्येच ते उद्गारले, "दादा, अल्लादियाखां अस गाणं गाऊन गेले आहेत की माझ्या बाबांची (हद्दूखां) आठवण झाली मला; आज माझी तब्बेत नाही लागत!" रहिमतखांची तान जशी कमालीची साफ आणि रसदार तशीच त्यांची अवलियाची वृत्तीही साफ आणि निर्मळ! शाहूमहाराज छत्र्यांना म्हणाले, "आम्ही आमच्या खांसाहेबांना बोलावून घेतलं नसतं तर फार चांगलं झालं असतं–तुमच्या रहिमतखांसाहेबांचं गाणं तरी ऐकायला मिळालं असतं!"

वरील प्रसंगामुळे शाहूमहाराजांच्या मनात खांसाहेबांविषयीचा असलेला आदरभाव आणखी वृद्धिंगत झाला आणि अल्लादियाखांसाहेबांना पुढे भर पगाराइतकी पेन्शन, इच्छेनुरूप नोकरी करणे, बाहेरगावी राहून हवापालट करण्याची मोकळीक वगैरे अनेक सवलती देऊन तो आदर महाराजांनी प्रकट केला. खांसाहेब शाहूमहाराजांचे आवडते मानकरी बनले.

## पोलिटिकल गवई

अल्लादियाखांसाहेबांवर तूर्त शाहूमहाराजांची बहाल मर्जी आहे या गोष्टीचा गवगवा व्हायला फार वेळ लागला नाही. एकदा असा योग आला की, महाराज रजपूतवाडी कॅंपमध्ये राहत होते. महाराजांच्या मर्जीतले गायक, नट, विट, चेट इत्यादी आश्रितांकरिता तेथे अनेक घरे बांधलेली होती. एका घरात पांडोबा गुरव यवतेश्वरकर (हे हिंदुस्थानातील अग्रणी ध्रुपदिये वजीरखांसाहेब यांचे शागीर्द होते) हे एका शिष्यिणीला एक चीज शिकवीत होते. 'बादशहा उनसे कहिये जो बज आवे' असे त्या चिजेचे पहिले शब्द होते. इतक्यात शाहूमहाराज तिथे आले आणि त्यांनी पांडोबांना चिजेचा अर्थ विचारला. ते म्हणाले, "मला चिजेचा अंत्रा येत नाही; कदाचित खांसाहेबांना पुरी चीज माहीत असेल आणि ते अर्थही नीट सांगतील." महाराजांनी खांसाहेबांना बोलावून घेतले. खांसाहेबांनी अस्ताई, अंत्र्याचे शब्द म्हणून दाखविले व अर्थ सांगण्यास सुरुवात केली.

येथे यापूर्वीची थोडी हकिगत सांगणे जरूर आहे. राजाला पुरुषसंतती जितकी जास्त होईल तितके प्रजेचे जास्त हाल! शाहूमहाराजांना राजाराम युवराज व कनिष्ठ शिवाजीराजे असे दोनच पुत्र होते. युवराजांना हक्काची गादी मिळणारच. प्रश्न काय तो धाकट्या राजपुत्राचा. तेव्हा कायदेशीर कब्जा नसलेल्या अशा मिळतील तेवढ्या जमिनी शेरी (खासगी मालकी) च्या करण्याचा महाराजांनी हुकूम जारी केला. हांजीखोर, नालायक अधिकाऱ्यांच्या हाती असला हुकूम म्हणजे माकडाच्या हाती कोलीत! राजाला खूष करण्याकरिता आणि स्वतःचा लाग साधण्यासाठी गैरहक्कदारांबरोबर हक्कदारांच्या जमिनीही शेरीत जमा होऊ लागल्या.

बिचाऱ्या जमीनवाल्यांनी पुष्कळ अर्ज-विनंत्या केल्या, परंतु व्यर्थ. पुढे या हताश झालेल्या रयतेला कोणी तरी कानमंत्र दिला की तूर्त अल्लादियाखांसाहेबांवर महाराजांची मर्जी आहे, तेव्हा त्यांच्यामार्फत कदाचित दाद लागेल. साहजिक ती मंडळी खांसाहेबांकडे आली आणि वरील अन्यायाची दाद लावावी म्हणून धरणे धरून बसली. शक्यतो प्रयत्न करण्याचे खांसाहेबांनी त्यांना वचन दिले आणि योग्य समयाची ते वाट पाहत राहिले. अकल्पित योगायोगाने वरील चिजेचा अर्थ सांगण्याची मजेदार संधी खांसाहेबांना मिळाली.

"बादशाह उनसे कहिये जो बाज आवे, खैरा बेहरिसों इसकी बुरा पहचाने ॥अ०॥ ग्यान ध्यान तुरमति नहि, शिखरा उनसे क्याकेह दीनी। कर शाहिनी बात तुरकवा, लगड-झगडवाले शोखरंग। ऐसे लट्टूरे इस जगवाले, उनसे कहा कुई ना चाहिये॥" वरील

चीजेचा अर्थ सांगताना खांसाहेब म्हणाले, "बाशा, बाज, खेरा, बेहरी, जुर्रा, तुरुमती, शिकरा, लगड, झगड, लटूरे ही सारी शिकारी पक्ष्यांची नामावळी आहे. शोखरंग नावाचे एक मोठे नायक व गायक पूर्वीच्या जमान्यात होऊन गेले. त्यांनी ही सुंदर चीज बांधली. ही चीज श्लेषात्मक आहे. तिच्यातून दोन अर्थ निष्पन्न होतात आणि हेच तिचे वैशिष्ट्य; एका अर्थी शिकारी पक्ष्यांची नावे आणि दुसरा अर्थ:—बादशहा कोणाला म्हणावं—की जो रयतेला सतावत नाही; तिला लुटत नाही; वैऱ्याशीदेखील जो न्यायनीतीने वागतो त्याला बादशहा म्हणावं. शोखरंग पुढे म्हणतात 'राजा ज्ञानी व स्थितप्रज्ञ असावा, चंचल वृत्तीचा नसावा. बादशहाची खुषमस्करी करून इकडे लढाई, झगडे, फंदफितुरी फैलावणाऱ्या कुटाळ लोकांना शासन करावे, सत्संगतीत वाढूनही ज्यांची जन्मजात अधमवृत्ती नष्ट होत नाही अशा नीचांना राजाने केव्हाही जवळ करू नये; ज्ञानी व शीलवन्तांनाच आश्रय द्यावा इत्यादी अर्थ खांसाहेबांनी मोठ्या खुबीने सांगितला!

शाहूमहाराज मोठे चाणाक्ष! त्यांनी हे सर्व ऐकून घेतले आणि खांसाहेबांना म्हटले, "खांसाहेब, तुम्ही चिजेचा अर्थ खूप तरकीबीने सांगितला खरा! मग आता म्हणणं काय आपलं?" खांसाहेबांना पाहिजे होती ती संधी मिळाली! ते म्हणाले "हुजूर, चार दिवस झाले, शेतकरी लोक इथं जमा झाले आहेत, त्यांची कोणी दाद घेत नाही. गैर-हक्कदारांबरोबर हक्कदारांच्याही जमिनी शेरीकडे घेतल्या जात आहेत– हे न्यायाचे नव्हे. तरी सरकार; खुद्दांनी हा अन्याय दूर करावा."

त्याच दिवशी महाराजांनी सर्व शेतकऱ्यांना बोलावून घेतले आणि हक्कदारांच्या सनदा पाहून त्यांच्या जमिनी त्यांना परत दिल्या आणि गैरहक्काने जमिनी दाबून बसलेल्यांच्या जमिनी मात्र शेरीमध्ये दाखल केल्या! रयत लोकांनी खांसाहेबांना धन्यवाद दिले आणि शाहूमहाराजांनी 'पोलिटिकल गवई' असा किताब (?) देऊन त्यांचा गौरव केला!

## ते राजे मरून गेले

केवळ राजाश्रयामुळे संगीत–कलाकार पैदा होतात असे खांसाहेबांचे मत नव्हते. कारण प्राचीन काळाचे प्रचंड कलाकार आपल्या **कलातपस्येच्या** प्रभावामुळे राजाश्रयास पात्र झाले असा त्यांचा दावा होता. तथापि अकबर बादशहाच्या अनुकरणाने मोठमोठ्या राजेलोकांनी पुढे संगीताला आश्रय दिला त्यामुळे त्या कलेचे संगोपन व संवर्धन झाले, हे ते मान्य करीत.

असेच एकदा शिळोप्याच्या गप्पा मारताना महाराज म्हणाले, "खांसाहेब, पूर्वीच्या जमान्यात कमाल दर्जाची कसबी माणसं होऊन गेली; तशी आता का होत नाहीत?" यावर खांसाहेबांनी स्पष्ट उत्तर दिलं, "हुजूर, याचं कारण राजे लोकच आता उरले नाहीत!" महाराजांनी विचारलं, "हे कसं म्हणता तुम्ही?" खांसाहेब म्हणाले, "हूजूरला माहीत आहेच की हिंदुस्थानामध्ये शेकडोवारी संस्थानं आहेत. आपल्याकडे चौदा विद्या आणि चौसष्ट कला मानल्या गेल्या आहेत. परंतु आजकालच्या एकही

राजामहाराजा असा नाही की त्यातल्या एखाद्या कलेची किंवा एखाद्या विद्येची भरपूर जोपासना करावी किंवा ती करणाराला भरपूर साहाय्य करावं अशी ज्याला मनापासून इच्छा आहे. पूर्वीच्या राजेलोकांची गोष्ट अशी नव्हती; विद्यावंतांना आणि कलावंतांना भरपूर आश्रय देणे यात आपली व संस्थानची प्रतिष्ठा आहे असे त्याना वाटे. आमच्या गायनविद्येचीच गोष्ट घ्या–त्यांच्या आश्रयामुळं तीस-तीस चाळीस-चाळीस वर्षे शिकणं, मेहनत करणं, शागीर्द तयार करणं, इत्यादी कलासंवर्धनाची एकनिष्ठ तपश्चर्या, खाण्या-पिण्याची किंवा कपड्या-लत्त्याची ददात नसल्यामुळं करता आली. केवळ कलेची आराधना करण्यात आयुष्य घालविता येत असे. त्यामुळं पूर्वी नवे नवे युगप्रवर्तक कलाकार व विद्यावान निर्माण झाले. त्यांच्या शिरावर राजाचा सदैव हात असे. याच्या उलट आजकाल अशी तऱ्हा आहे की, माधुकरी मागून किंवा दिवसभर काबाडकष्ट करून गाणं शिका, लहर लागली तर आम्ही ऐकू आणि बिदागी देऊ. म्हणजे कलेबाबत कर्तव्य संपलं. अशानं कलेची जोपासना कितीशी होणार? म्हणून लोकांना तात्पुरतं राजी करणारी कला हल्ली फैलावली आहे. प्रत्येक तऱ्हेची फिकीर मागं लागलेली; अशा स्थितीत कमाल दर्जाचे कलाकार कोठून निर्माण होणार? इतक्या अडचणीतदेखील गायनाचा थोडातरी अभ्यास करणारे कुठं कुठं आढळतात हेच आश्चर्य!" शाहूमहाराज म्हणाले, "खरं आहे." वरील भाषणाचा महाराजांच्या मनावर बराच परिणाम झाला असावा. त्याचे दृश्य फल म्हणजे राजवाड्यातील नोकरांची आवाजदार अशी मुले निवडून त्यांना गायन शिकण्याकरिता पांडोबा गुरव यवतेश्वरकर यांच्या स्वाधीन करण्यात आले. या दहाबारा मुलांचा सर्व खर्च महाराजांच्या खाजगीतून होत असे. असो. अल्लादिया-खांसाहेबांची कोल्हापुरातील पहिली दहाबारा वर्षे स्वतःच्या मुलांना, बंधू हैदरखां आणि श्री. तानीबाई याना शिक्षण देणे, स्वतः मेहनत करणे आणि विरोधी वातावरणाशी टक्कर देऊन आपल्या गुणांच्या जोरावर अखिल महाराष्ट्रात आपले स्थान एकमेव दर्जाला नेणे, प्रपंचाची शिस्त बसविणे आणि शारीरिक व्याधीशी झगडणे अशा व्यापात गेले.

कोल्हापुरात खांसाहेबांचे वास्तव्य असताना त्यांच्याशी ज्या बाहेरच्या महत्त्वाच्या व्यक्तींचा संबंध आला त्याबद्दल येथे लिहिणे अप्रस्तुत ठरणार नाही.

## आग्रेवाले नत्थनखांसाहेब

प्रो. विलायतखां यांचे वडील नत्थनखांसाहेब आग्रेवाले एकदोन वेळ कोल्हापुरास आले होते. अल्लादियाखां व नत्थनखां हे आपापल्या घराण्याचे दीप्तिमान उत्तुंग ध्वज असल्या-मुळे एकमेकांच्या मनात स्पर्धेची किंवा मत्सराची सुप्त भावना असती तर ती कोणालाही दोषार्ह वाटली नसती. परंतु चमत्कार असा की, उभयतांच्या अंतःकरणामध्ये एकमेका-विषयी पराकोटीचा आदरभाव होता. "भैय्या! तुम्हारा गला जाता है वहां हमारी नजर भी नहीं जाती" "बाबा, गुलाबपाण्याने प्रथम चूळ भरून तोंड साफ कर आणि नंतर अल्लादियाखांचं नाव घे" असे उद्गार नत्थनखांसाहेबांनी काढावेत; उलट अल्लादिया-

खांनी आपल्या घरी त्यांना ठेवून घ्यावे आणि "असा गवैय्या आपल्याला कधी ऐकायला मिळायचा नाही" असे सांगून शाहू महाराजांना मुद्दाम नत्थनखांसाहेबांचे गायन ऐकविण्याचा योग घडवून आणावा आणि गाणे सर्वांगसुंदर व्हावे म्हणून नत्थखांसाहेबांना त्या दिवशी आपल्या नजरबंदीत ठेवावे! असा उभयतांमध्ये आत्मीय भाव होता.

नत्थनखांच्या मृत्यूची वार्ता ऐकून खांसाहेबांना अत्यंत दुःख झाले. नंतर एकदा नत्थनखांचे पुत्र अब्दुल्लाखां यांचे करवीर लायब्ररीच्या दिवाणखान्यात गायन झाले ते ऐकून खांसाहेबांनी त्यांना पोटाशी धरले आणि अश्रुधारांचा अभिषेक करीत ते उद्गारले "बेटा, नत्थनखां भैय्याच्या गाण्याची तू आठवण करून दिलीस, पण आता तुझ्या गाण्याचा पोशिंदा गेला रे!"

## भास्करराव बखले

तसेच भास्करबुवा बखले यांच्याविषयी अल्लादियाखां यांना सुरुवातीपासूनच विशेष आपुलकी वाटण्याचे कारण बुवांचा खांसाहेबांच्या अफाट विद्येविषयी पराकाष्ठेचा आदरभाव हे तर होतेच, परंतु बुवा नत्थनखांचे शागीर्द होते. त्यामुळे ही आपुलकीची भावना तत्काळ निर्माण झाली आणि वाढत गेली. बुवा मागतील तेव्हा आणि मागतील त्या चिजा व माहिती देण्यात खांसाहेबांनी कधीही कुचराई केली नाही. प्रतिवर्षी प्रकृतीच्या कारणाने खांसाहेब मुंबईस जात तेव्हा कधी कधी श्री. भास्करबुवा त्यांना दोन दोन महिने आपल्या घरीच आग्रहाने ठेवून घेत. यात खांसाहेबांचा फायदा घेण्यापेक्षा शक्य तो त्यांची सेवा करण्याचा उदात्त हेतूच भास्करराव बाळगीत. त्यामुळे खांसाहेब आपण होऊन त्यांच्या या संकोचवृत्तीचा प्रेमाने निषेध करीत आणि त्यांना चिजा शिकवीत.

अल्लादियाखांसाहेबांची गायकी अभिनव सुंदर होती तसेच त्यांचे विद्या-भांडारदेखील अनंत होते, हे सर्व खरे. परंतु या दोन्ही गुणांची पारख करून त्यांचा महाराष्ट्रामध्ये बोलबाला करणाऱ्या लायक व्यक्तीची आवश्यकता होतीच. आणि ही कामगिरी भास्करबुवांनी मनोभावाने व अंतःस्फूर्तीने बजावली. भास्करबुवामुळे खांसाहेबांची खरी योग्यता मान्य करणे महाराष्ट्रीय चिकित्सकांनादेखील भाग पडले. भास्कररावांसारखा अखिल भारतीय कीर्तीचा गायनभास्कर, फैझमहमदखां व नत्थनखां यांचा पट्टशिष्य, तो अल्लादियाखांच्या मागे तंबोरा घेऊन बसण्यात स्वतःला धन्य मानतो, इतकेच नव्हे तर त्यांची साथ करण्याची आपली कुवत नाही असे निरभिमानपणे प्रकट करण्यात त्याला यत्किंचितही कमीपणा वाटत नाही, यापलीकडे खांसाहेबांच्या योग्यतेचा निराळा ताम्रपट काय असणार? भास्करबुवांच्या अकाली निधनामुळे संगीतप्रेमी सर्व जनता एकजात हळहळलीच; पण यापेक्षाही हा हिरा हरपल्याचे खांसाहेबांना अधिक दुःख झाले. आपल्या कलेच्या निस्सीम चहात्यांच्या निधनाचे असीम दुःख, इतर कोणत्याही दुःखापेक्षा श्रेष्ठ कलावंताला अंतकालपर्यंत अधिक तीव्रतेने खुपत राहते. दीपज्योतीच्या मागील चकाकणारी तबकडी (reflector) नाहीशी झाल्यासारखे त्याला वाटते.

खांसाहेबांच्या मुंबईतील प्रतिवार्षिक मुक्कामांमध्ये ठाकुरद्वारी नाना शंकरशेटच्या हॉलमध्ये व इतर ठिकाणी खांसाहेबांची अनेक सुंदर गाणी झाली आणि त्या वेळच्या मुंबईमधील रसिक श्रोत्यांनाच 'काय ती त्यांची जोषदार गाणी ऐकायला मिळाली असे म्हणता येईल. अशाच एका मुक्कामात मिय्याजानसारख्या (अलिया फत्तूचे भाचे) विलक्षण तयार व ढंगदार गवय्याने खांसाहेबांचे शिष्यत्व पत्करण्याची इच्छा प्रकट केली होती; परंतु खांसाहेबानी त्याला गौरवून सांगितले की "तूही आपल्या घराण्याचा निशाणदार कसबी गायक आहेस-आमची ही गायकी आत्मसात करण्यासाठी, स्वतःच्या घराण्याची गायकी सोडून देण्याच्या भानगडीत तू आता पडू नकोस!"

मिय्याजानच्या मनातील आदर-भावनेची आणखी एक मजेदार हकिगत आहे. एकदा कागदगिरण गल्लीतील भास्कररावांच्या घरी अल्लादियाखांसाहेब खिडकीत सहज बसले होते. इतक्यात हे मिय्याजानखांसाहेब त्याच गल्लीमध्ये राहणाऱ्या एका शागीर्दाची नित्याप्रमाणे शिकवणी आटपून आपल्याच नादामध्ये खाली मान घालून चालले होते. इतक्यात अल्लादियाखांनी वरील खिडकीतून त्यांना मजेने सवाल केला, "क्यूं मियां! झुकतेही चले जा रहे हो; ऊपर देखते भी नहीं!" यावर मिय्याजानखांनी चपापून आदबीने उत्तर दिले, "जी हां हुजूर! ये झुकनेकीही जगह है!" आपल्याला तालीम देण्याचा नकार मिळाला असूनसुद्धा खांसाहेबांविषयीचा आदर मिय्याजानच्या मुखातून आपोआप प्रकट झाला.

## बाबू दुलीचंद

१९०३-४ च्या सुमारास कलकत्त्याचे बाबू दुलीचंद हे मुंबईस महिनाभर मुक्काम करण्याच्या इरादाने आले होते. हे बाबू मारवाडी जातीत एक अपवाद होते असे म्हणावे लागते. मारवाडी असून रसिक, शोकी आणि राजे रजवाड्यांनादेखील लाजविण्याइतक्या सढळ हाताचे हे धनिक होते. गोहरजान, गणपतराव भैय्या (विद्वान हार्मोनियमवादक) मिय्याजान, मौजुद्दीनखां अशी कलासंपन्न मंडळी या धनसंपन्न बाबूजींच्या आश्रितांपैकी होती. बाबूजींनी अल्लादियाखांसाहेबांना कोल्हापुराहून मुद्दाम मुंबईस बोलावून घेतले आणि एके रात्री खास बैठक केली. (या मैफलीचे वर्णन 'माझा संगीतव्यासंग' मध्ये विस्ताराने दिले आहे.) खांसाहेबांच्या अतुलनीय गाण्याचा बाबूजींच्या मनावर इतका काही परिणाम झाला की दुसरे दिवशी ते म्हणाले, "कोणता राजाही देणार नाही इतका तनखा मी आपल्याला देईन-- तुम्ही माझ्यापाशी रहा. शिवाय माझं हे वचन की माझ्या रोटीत तुमचा हिस्सा अखेरपर्यंत राहील!" खांसाहेब सद्‌गदित स्वराने उत्तरले- "बाबूजी, तुमचं प्रेम असंच राहो. पण माझ्या शाहूमहाराजांखेरीज आता मी कोणाचीही नोकरी करणार नाही-माझा हा निर्धार आहे; माफ करा." बाबूजींनी या एकनिष्ठेची फार प्रशंसा केली व निदान सहा महिने तरी कलकत्त्यास आपला पाहुणा या नात्याने खांसाहेबांनी राहावे असा आग्रह केला. पुढे खांसाहेब बाबूजींच्या इच्छेप्रमाणे कलकत्त्यास जाऊन सहा महिने राहून आले.

मुंबई येथील खांसाहेबांचे वार्षिक मुक्काम व नैमित्तिक भेटी म्हणजे त्यांच्या आगामी कायमच्या वास्तव्याची पूर्वतयारीच होती असे म्हटले तरी चालेल. मुंबईस त्यांच्या अनेक मैफली झडल्या; स्नेहसंबंध जडले; तालीम घेण्यास उत्सुक अशा मुंबईच्या संपन्न गायिका गळ घालू लागल्या व लौकिक पसरला. तथापि शाहूमहाराजांच्या हयातीमध्ये खांसाहेबांनी कोल्हापूर सोडून जाण्याचे कधी मनातही आणले नाही.

अकृत्रिम स्नेहभावाशी कृतज्ञता हा एक खांसाहेबांच्या अंगी दुर्मिळ गुण होता व तो राजेलोक किंवा धनवान यांच्या पुरता मर्यादित नव्हता. सांगलीस श्री. **आबासाहेब सांबारे** हे त्या वेळी अत्यंत नावाजलेले धन्वंतरी होते. त्यांच्या औषधाने खांसाहेबांचा हृदय-विकार बराच हटला व त्यामुळे उभयतांचा स्नेहभाव वृद्धिंगत होत गेला. श्री. आबासाहेबांच्या वाड्यात प्रचंड प्रमाणावर गणेशोत्सव साजरा होत असे. भजन, गायन, कीर्तन यांचा दहा दिवस जल्लोष चालावयाचा! श्री. सांबारे यांच्या निमंत्रणाला मान देऊन खांसाहेब प्रतिवर्षी सांगलीस जायचे आणि पाहुणे मंडळींच्या दाटीवाटीत अखेरपर्यंत आनंदाने राहायचे आणि आबासाहेब म्हणतील तेव्हा त्या अठरापगड जातीच्या मेळाव्यात खुषीने गायचे! काही काही वर्षी श्री बाळकृष्णबुवादी गायक मंडळी या उत्साहात गाऊन जात. प्रतिवर्षी सांगलीकर रसिकांना खांसाहेबांची जोमदार गाणी ऐकायला मिळत. सांगलीची वार्षिक वारी खांसाहेब कोठेही असले तरी चुकवीत नसत; मग तेथे कशीही अडचण अथवा गैरसोय होवो. 'गरज सरो आणि वैद्य मरो' या म्हणीला खांसाहेब अखेरपर्यंत अपवादच राहिले.

एकंदरीने असे म्हणता येईल की कोल्हापुरातील पंचवीस वर्षांच्या वास्तव्यात खांसाहेबांनी महाराष्ट्राला आपल्या अभिनव व अभिजात गायनविशेषाचा परिचय करून दिला; आपले संगीत क्षेत्रातले उच्चतम स्थान अबाधित व सर्वमान्य केले, विरोधकांनाही अनुयायी बनविले आणि महाराष्ट्रीय जनतेमध्ये आपल्याविषयी आपुलकीची व अभिमानाची भावना निर्माण केली. सारांश, खांसाहेब शक्यतोपरी महाराष्ट्रीय बनले. मराठी भाषेतील कथा कादंबऱ्या पुराणे व संतकाव्यादींच्या वाचनामुळे (मराठीच्या अभ्यासाची हकीकत स्वतंत्र पुढे दिली जाणार आहे) आणि सुशील व्यक्तींच्या अहर्निश सहवासामुळे महाराष्ट्रीय जीवनाशी ते मोठ्या आदर-भावनेने समरस झाले. महाराष्ट्राविषयी इतका जिव्हाळा वाटण्याचे कारण त्यांच्या उच्चतम गायन कलेचा मार्मिकतेने आस्वाद घेण्याची कुवत असलेली रसिक अशी जनता, त्यांना महाराष्ट्राइतकी इतरत्र आढळली नाही, हे होय. पुढे पुढे तर, 'जयपूरवाले अल्लादियाखां' च्या ऐवजी 'कोल्हापूरवाले अल्लादियाखां' असा त्यांचा नामनिर्देश होऊ लागला! ते, त्यांचे बंधू हैदरखां, पुत्र मंजीखां भूर्जीखां यांच्या सुदीर्घ वास्तव्यामुळे कोल्हापूर हे त्यांच्या गायनकलाविशेषाचा जणू काय बालेकिल्ला ठरले आणि अद्यापि तो किल्ला कोणाही कलावानाला सर करता आलेला नाही. इतर कोणाच्याही गायकीचे तात्पुरते कौतुक झाले तरी ती गायकी कोल्हापुरच्या भूमीत तग धरू शकली नाही! यात चिरकालीन सहवासापेक्षा खांसाहेबांच्या गायकीतील

प्रभावी गुणांचाच अधिक अंश आहे ; कारण चिरपरिचयाच्या पोटी अवज्ञाउपजली असती, परंतु खांसाहेबांच्या गायकीत तसेच काही अवीट आकर्षण होते म्हणून ती कोल्हापुरात रुजली.

## भास्कररावांचा अंतकाल

८-४-१९२२ रोजी महाराष्ट्राचे अतुलनीय तेजस्वी गायनभास्कर गु. भास्करराव बखले यांचा दुर्दैवाने अंतकाल झाला. भास्कररावांची अल्लादियाखांविषयी अलोट आदर-भावना म्हणजे भक्तिरसाचे एक काव्यच म्हणायला हरकत नाही. भास्कररावांच्या मृत्यू-मुळे खांसाहेबांना किती दुःख झाले याची कल्पना करणे अशक्य. जणू काय मधले पुत्र मंजीखां यांच्या भावी अकाली मृत्यूचे अलोट दुःख सोसण्यासाठी खांसाहेबांच्या मनाची तयारी करण्याच्या हेतूने भास्कररावांनी आपली जीवितयात्रा मंजीखांच्या आधीच संपविली असावी !

भास्कररावांच्या निधनानंतर लगेच दि. ६-५-२२ ला शाहूमहाराजांचा अंतकाल झाला. त्यांच्यानंतर गादीवर आलेल्या राजाराम महाराजांना गाण्याची किंवा कलांची विशेष कदर नसल्यामुळे खांसाहेबांनी कोल्हापुरच्या गादीला अखेरचा मुजरा करून थोड्याच दिवसांनी मुंबईस वास्तव्य करण्याचे निश्चित केले आणि अंतकालापर्यंत ते मुंबईसच राहिले.

# ७. काही गुण; काही आक्षेप

खांसाहेबांच्या मुंबईतील कायमच्या वास्तव्याबद्दल लिहिण्यापूर्वी त्यांच्या काही गुणांबद्दल व त्यांच्यावरील काही आक्षेपांबद्दल चर्चा करणे हे प्रस्तुत ठरेल.

## मराठीचा अभ्यास

कोल्हापुरात असताना खांसाहेबांनी मराठी भाषेचा व वाङ्मयाचा परिचय करून घेतला. त्याची हकीकत मोठी मजेदार आहे.

खांसाहेबांची व कोल्हापुरच्या मंडळींची जानपछान जसजशी अधिक होऊ लागली तसतशी उभयपक्षी भाषेची अडचण अधिक तीव्रतेने भासू लागली. पुण्यापासून खालच्या महाराष्ट्राला त्या काळात हिंदुस्थानी भाषेचा फारसा संपर्क झालेला नव्हता आणि त्याची जरुरीही कोणाला वाटत नव्हती. कोल्हापुरच्या स्थानिक मुसल्मानांची 'बागवानी उर्दू' खांसाहेबांना मराठीइतकीच दुर्बोध होती! उलटपक्षी खांसाहेबांची अस्सल उर्दू-हिंदी भाषा कोल्हापुरात कोणालाच समजत नसे! तेव्हा आपणच मराठी शिकावे असे त्यांच्या मनाने घेतले. पण उर्दू व मराठी जाणणारा असा मास्तर कोठून आणायचा? एक दिवस त्यांच्या घरासमोर काही लहान मुले धडे पाठ करताना त्यांनी पाहिली; आणि त्यांना एक युक्ती सुचली. दुसरे दिवशी थोडी मिठाई आणि पेरू-केळी वगैरे फळे खरेदी केली आणि मुलांना घरात बोलावून त्यांना ती वाटून टाकली. खाऊच्या लालचीने मुले दररोज दोनप्रहरी त्यांच्याकडे येऊ लागली. मग त्यांना "हे अक्षर कोणते—ते अक्षर कोणते" असे विचारीत त्यांनी मराठी बाराखडीची मोडणी समजावून घेतली. नंतर एका मुलाकडून सचित्र अंकलिपी आणि पहिले पुस्तक आणवून घेतले. चित्रावरून बऱ्याच वस्तूंची नावे समजली आणि मुलांना धडा वाचायला लावून त्यांच्याबरोबर त्यातील वाक्ये घोकण्यास त्यांनी सुरुवात केली. काही महिन्यांनी त्यांना साधीसुधी पुस्तके वाचता येऊ लागली—अर्थही कळू लागला. शिवाय आपल्या मोडक्यातोडक्या रीतीने का असेना, सर्वांशी मराठीत बोलण्याचा त्यांनी परिपाठ ठेवला. एकदा असेच एक गृहस्थ खांसाहेबांना भेटायला आले होते; त्यांना खांसाहेबांनी एक-दोन उत्तरे मराठीतून दिली. ती ऐकून ते गृहस्थ आश्चर्याने उद्गारले "खांसाहेब, आपल्याला इतक्या लौकर कसं मराठी बोलता येऊ लागलं?"

खांसाहेब म्हणाले, "मास्तर ठेवला होता! दाखवू तुम्हांला मास्तर?" आणि गल्लीत गोट्या खेळणाऱ्या मुलांकडे बोट दाखवून म्हणाले "हे सारे मास्तर आहेत माझे!"

मराठी क्रमिक पुस्तके वाचताना हळुहळू त्यातील कवितांकडे खांसाहेबांचे लक्ष वेधु लागले. कोणाकडून तरी प्रथम अन्वय-अर्थ समजावून घेता घेता 'मनाचे श्लोक' 'दासबोध', 'तुकारामाचे अभंग', इत्यादींवरून मोरोपंतांपर्यंत त्यांनी मजल गाठली! महाराष्ट्राविषयी खांसाहेबांना आपल्या जन्मभूमीपेक्षाही अधिक आपलेपणाची भवना वाटण्याचे एक प्रमुख कारण म्हणजे त्यांचा मराठी भाषेचा अभ्यास व त्या योगाने रामायण, महाभारत इत्यादी ग्रंथांचा परिचय हे होय. शिवाय महाराष्ट्रीय श्रोते रसिक व मर्मज्ञ असल्यामुळे त्यांच्या गायनातील बुद्धिग्राही कलाविलासाची पारख महाराष्ट्राइतकी इतर प्रांतात होणे शक्य नाही अशी त्यांची खात्री झाली होती. "उत्तर **पैदा** करती है, लेकिन दक्खन **दाद** देती है!" असे त्यांचे उद्गार असत!

## वाग्गेयकार

कोल्हापुरास असताना फावल्या वेळी चिजा बांधण्याचाही त्यांना नाद लागला होता. तरुण वयातही तो लागला होता, पण तो त्यांनी सोडून दिला होता. कारण त्यामुळे गाण्याच्या मेहनतीमध्ये व्यत्यय येत असे. कोल्हापुरास शाहूमहाराजांचे अभीष्टचिंतन करण्याचे प्रसंग येत; त्या निमित्ताने अल्लादियाखांसाहेबांनी काही चिजा रचल्या आहेत. तसेच ज्या वर्गामध्ये विशिष्ट बडणीच्या चिजांची कमतरता दिसली त्यात त्यांनी भर घातली.

खांसाहेबांनी रचलेल्या चिजांमध्ये शृंगारापेक्षा निर्गुणाचे वर्णनच सामान्यतः आढळून येते. आपल्या संगीताला उर्दू किंवा हिंदीपेक्षादेखील व्रिजभाषा अधिक शोभिवंत आहे असे त्यांना वाटे आणि त्यामुळे त्यांच्या चिजा परंपरेच्या जुन्या ध्रुपदधमारामध्ये खपून जाण्यासारख्या योग्यतेच्या वाटतात.

अल्लादियाखांसाहेबांनी आपल्या सर्व चिजा वडिलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ 'एहमद' हे टोपणनाव धारण करून रचल्या आहेत. हिंदूंच्या आध्यात्मिक तत्त्वज्ञानाविषयी खांसाहेबांना किती आदर होता याची कल्पना त्यांनी रचलेल्या चिजांवरून सहज होण्यासारखी आहे. नमुन्यादाखल पुढील चीज पाहावी :

"निराकार करतार दुखियनको दुखहार निरासन को आधार, नांमें निरंजन ॥ स्थाई ॥ तुहि धर्म तुहि कर्म तूही माया तेरी सुमरन करत नित रहत संसार ॥ अंत्रा ॥ तूही तरन तूही तारन, दुखदरिद्र टारन अपने एहमदकी सुनले हो करतार ॥ आभोग ॥ बाँह गहेकी लाज तुम्हीको भवसागर तें पार उतार ॥ संचारी ॥"

अशा प्रकारच्या अनेक भारदस्त, प्रसादपूर्ण व कलात्मक बांधणीच्या चिजा त्यांनी रचल्या आहेत.[1] चीजेच्या बांधणीतून खांसाहेबांच्या गायकीचा झोक, अभिजात लालित्य

१. त्यापैकी कांही परिशिष्ट क्र. २ मध्ये नमुन्यादाखल दिल्या आहेत.

व वृत्तीचे गांभीर्य हे तिन्ही गुणविशेष प्रकट होतात.

सारांश, खांसाहेबांची एकंदरीत वृत्ती गंभीर तत्त्वज्ञान्याची होती असे त्यांच्या बहुतेक चिजांवरून अनुमान काढता येते. त्यांनी चारदोन शृंगारिक चिजा फार तर रचल्या असतील; त्यादेखील कारणपरत्वे. बंधू हैदरखां यांनाही चिजा बांधण्याचा षोक लागला होता. त्यांनी ललतागौरी रागात एक होरी (होळीच्या सणात गाण्याची चीज) बांधली. अस्ताईचे शब्द फारच सुंदर साधले–"खेलन आये राधा माधो प्रेमबूंद रंग घोरी" परंतु अंत्र्याच्या बोलामध्ये हा प्रेमतुषारांनी घोळलेला रंग नीटसा जमेना! त्यांनी पुष्कळ खटपट केली. शेवटी खांसाहेबांना आपली अडचण त्यांनी सांगितली. इतकी सुंदर अस्ताई पण ती अंत्र्यावाचून व्यर्थ होणार; तेव्हा खांसाहेबांनी अंत्रा बांधला :–"नेह गुलाल सेन पिचकारी मनमथ बेको हो होरी." प्रेमाचे तुषार एकवटून त्यांचा रंग केला व स्नेहाचा गुलाल आणि जिवाची पिचकारी करून मदन–महोत्सवात खेळण्याकरिता राधा व माधव आले आहेत–असा या चिजेचा भावार्थ आहे.

शाहू महाराजांना कधी कधी उर्दू काव्याचे जलसे (मुशायरा) ऐकण्याची लहर येई. मिरजेच्या उरुसाला आलेल्या शायरांना ते बोलावून घेत. त्या प्रसंगी कवितेची समस्या पूर्ण करण्याची प्रतिभा खांसाहेबांच्या अंगी भरपूर होती याची तज्ञांना प्रचीती येई. सारांश, अल्लादियाखांनी मनात आणले असते तर ते हिंदी व उर्दू या दोन्ही भाषांतील एक श्रेष्ठ कवी व शाहीर गणले गेले असते. नेपोलियन हा जगविख्यात एकमेव सेनापती झाला नसता तर तो जगविख्यात गणिती झाला असता असे म्हणतात. तसे काहीसे खाँसाहेबांविषयी म्हणता येईल. ते गायनमहर्षी झाले नसते तर कविश्रेष्ठ ठरले असते.

## नवी रागनिर्मिती

हैदरबक्ष सारंगिये हे अतिशय विद्वान कलाकार होते त्यांचेही वास्तव्य कोल्हापुरात असे. साहजिकच ते अल्लादियाखाखांकडे नेहमी जात. एक दिवस हैदरबक्षजी खांसाहेबांना बोलले, "खांसाहेब, हिंदुस्थानात गेल्या दीड-दोनशे वर्षांत किती तरी मोठमोठे गवयी होऊन गेले. परंतु पूर्वीच्या गायकांप्रमाणे नव्या रागरागिणी निर्माण करणारे असे प्रतिभावान नायक त्यापैकी कोणीच पैदा झाले नाहीत हे कसे?"

**खांसाहेब :** भाई आपल्या पुराणपुरुषांनी रागिण्यांचा एवढा प्रचंड खजिना मागे ठेवला आहे की, आपण सगळ्या गायकांनी मिळून तो उपसायचे मनात आणले तरीदेखील त्याचा तळ सापडणार नाही! जे बडेबडे गायक होऊन गेले त्यांच्या अंगी नवे राग निर्माण करण्याची पात्रता नव्हती असे नाही; परंतु हा व्याप करण्यात त्यांना कलेच्या दृष्टीने फारसा फायदा दिसला नसावा. केवळ वर्ज्यावर्ज्य व वादीसंवादीच्या गफलतीने किंवा आहेत त्या रागांची सरमिसळ करून कोणालाही अनेक हिशेबी राग निर्माण करता येईल. परंतु अशा रागांना विशिष्ट व आकलन होण्यासारखे एकजिनसी स्वरूप प्राप्त होणे किंवा त्यांच्या विस्तारात रंजकता निर्माण होणे अत्यंत कठीण आहे.

या दृष्टीने शक्य होती तेवढी बहुतेक रागस्वरूपे पूर्वजांनी सिद्ध केलेली आहेत. चुकून एखादे नवीन असे स्वरूप सिद्ध झाले तर होईल.

**हैदरबक्ष :** तुम्ही काही म्हणा. पण मला वाटते अलीकडील गायकांमध्ये तितकी कुवतच नव्हती.

**अल्लादियाखां :** हे साफ खोटं. मागील पिढ्यातील गायक फारच मोठ्या योग्यतेचे होऊन गेले म्हणा; पण आजमितीलादेखील असे कितीएक गायक आपल्यामध्ये आहेत की, ते नवे राग बनवू शकतील. शिवाय पूर्वीचा जमाना अगदी निराळा होता. असं पहा की, सूरदास, रामदास, मिराबाई, धोंडूबाबा इत्यादिकांनी आपापले मल्हार बनविले; विलासखां, हुसेनखां, बहादुरखां इत्यादिकांनी आपापले तोडीचे व कानड्याचे प्रकार केले; आणि सर्व गायकांनी मोठ्या रसिकतेने व आदराने त्यांचा स्वीकार करून ते दुनियेत फैलावले. परंतु अलीकडील घराण्याच्या वृथाभिमानामुळे एखाद्याला खरोखरच स्वतंत्र, मोहक व नवीन असे एखादे स्वरूप घडविता आले तरी सर्व घराण्यांच्या गायकांकडून त्याचा गौरव किंवा फैलाव होणं दुरापास्त आहे. ते म्हणतील की या नव्या रागाला परंपरागत आधार दाखवा! अशा लोकांपुढे काय करायचं? नव्या रागाला जुना आधार कोठून मिळणार?

**हैदरखां :** हे तुमचं म्हणणं मला पटत नाही. तुम्हांला स्वतः काही करायला नको आहे. एवढंच मला दिसतं.

**अल्लादियाखां :** बरं तर, तुमच्या समजुतीखातर मी प्रयत्न करतो. उद्या तुम्ही या.

वरील भाषेनंतर हैदरबक्ष दुसऱ्या दिवशी हजर झाले. खांसाहेबांनी एका नव्या रागस्वरुपाची जुळणी करून त्याप्रमाणे चीजही बांधून तयार ठेविली होती. ती त्यांनी हैदरबक्षजींना म्हणून दाखविली. ती चीज अशी—

**एरी बीर मोहन मेरो मन हरलीनो ॥ स्था० ॥**
**मोर मुकुट मुरलीधर मोहन एहमद मंत्र**
**पढ दीनो। एरी बीर मोहन० ॥ अंत्रा. ॥**

चीज ऐकून हैदरबक्ष मोठ्या विस्मयात पडले. चीजेचा विस्तार व तानक्रिया ऐकून मग त्यांना या रागिणीच्या नवीन, रंजक व स्वतंत्र स्वरूपाची प्रचीती पटली. हैदरबक्ष कोणी मामुली सारंगिये नव्हते. 'म्हैसूरवाली गुलाब' या नावाने सुप्रसिद्ध असलेल्या गायिकेला त्यांनी तालीम देऊन तयार केली होती. आपले भाचे वैहिदखां यांना त्यांनीच तयार केले होते. अनेक रागरागिण्यांतील चिजा त्यांच्या संग्रही होत्या. अल्लादियाखांसाहेबांकडूनही त्यांनी पुष्कळ चिजा घेतल्या होत्या. असे ते कसबी व संग्राहक कलाकार होते. त्यांनी मान्य केले की, यापूर्वी हे स्वरूप आपण कधी ऐकले नव्हते. हे स्वरूप अगदी अपूर्व आहे तसेच रंजक आहे. त्यावर खांसाहेब म्हणाले, "माझ्यासारखा जर नवा राग निर्माण करू शकतो तर माझ्यापेक्षा शतपट योग्यतेचे मागच्या पिढीतले गायक-गुरुजन हे काम करू

शकले नसते असे थोडेच आहे." पण अशा नव्या रागिण्यांचा स्वीकार व गारव करायला आमचे गायक तयार होणार नाहीत अशी त्यांची खात्री, आणि म्हणून त्यांनी हा व्याप केला नाही. त्यानंतर हैदरबक्षनी त्या नव्या रागाचे नाव विचारले. खांसाहेब हसून बोलले, 'ते आता पुढच्या पिढीने ठेवावे.' आणि मौज अशी, की ही नव्या रागातील चीज खांसाहेबांच्या घराण्यातील बहुतेक मंडळींनी शिकून घेतली आहे, परंतु तीस वर्षांत या नव्या रागिणीचे नामकरण कोणी केले नाही. अद्यापि ती रागिणी **अनामिकाच** आहे. कदाचित हेच नाव तिला द्यावे लागेल!

## क्लेमंट व देवल

श्री शाहूमहाराजांनी एकदा काही राजकारणानिमित्त मिस्टर क्लेमंट, डिस्ट्रिक्ट जज्ज यांना कोल्हापुरास बोलावून घेतले होते. या जज्जसाहेबांना उत्तर हिंदुस्थानी संगीता-संबंधी पराकाष्ठेची जिज्ञासा वाटत होती. रावबहाद्दूर देवल—नाटककार देवल यांचे ज्येष्ठ बंधू—यांच्या सहाय्याने त्यांनी 'फिल्हार्मोनिक सोसायटी' नावाची संस्था स्थापन करून अनेक संस्थानिकांच्या मदतीने, संगीत, श्रुती, चिजा वगैरेची काही पुस्तके प्रसिद्ध केली होती व श्रुती दर्शविणारे चारदोन ऑर्गनस् मुद्दाम विलायतेहून तयार करून आणविले होते. निरनिराळ्या गायकांकडून-विशेषतः अब्दुलकरीमखांकडून ते रागांची, स्वरांची व श्रुतींची फोड करून घेत. अब्दुलकरीमखां हे एकच गायक श्रुतींची स्थाने आपल्या कंठातून स्पष्ट आणि स्थिर अशी ऐकवून दाखवीत असा साहेबमजकुरांचा दावा होता! असो. अल्लादियाखां यांचा लौकिक साहेबबहाद्दुरांच्या कानावर आलेला होता. तेव्हा त्यांना बोलावून घेतले आणि पाहिजे असलेल्या एकदोन रागांची सांगोपांग माहिती त्यांनी खांसाहेबांपाशी मागितली व खांसाहेबांनी ती पुरविली. पुढे क्लेमंट साहेबांच्या पत्नीने मिरजेच्या वॉन्लेस दवाखान्याच्या मदतीसाठी गवय्यांचा एका जलसा धारवाड येथे करण्याचे ठरविले; आणि अल्लादियाखांना पाठवून देण्याविषयी शाहूमहाराजांना तार दिली. खांसाहेबांना वाटले की, रागांची माहिती घेण्यासाठी क्लेमंटसाहेबांनी आपल्यास पुन्हा बोलावले असावे; म्हणून साथीकरिता हैदरखां किंवा मंजीखां यांना त्यांनी बरोबर नेले नाही आणि तंबोरेदेखील घेतले नाहीत. जलशाविषयी तारेमध्ये उल्लेख नसावा याचा खांसाहेबांना राग आला. सार्वजनिक जलसा आणि साथ-सरंजाम काहीच नाही! जलशात अब्दुकरीमखां प्रथम गायले. नंतर खांसाहेबांना गाण्याविषयी हुकुमवजा विनंती करण्यात आली. खांसाहेबांना पेच पडला. क्लेमंटसाहेब म्हणजे शाहूमहाराजांचे त्या वेळी तळहातावरील गळू; अर्थात ते दुखविणे त्यांना शक्य नव्हते.

गायचे, पण तंबोरे नव्हते! संन्याशाच्या लग्नाची शेंडीपासून तयारी! होय-नाही करता शेवटी मग श्री. पित्रे वकील यांच्या घरून तंबोरे आणविले. त्या तंबोऱ्यांना गोणपाटाच्या सुतळीची जवारी लावलेली होती आणि तारांवर गंज चढलेला होता! खांसाहेबांनी खापरीच्या तुकड्यांनी तारा घासून गंज काढून टाकला आणि धोतराची एक धांदोटी

फाडून तिच्या बारीक धाग्यांची जवारी लावली; तेव्हा कुठे तंबोरे गोल बोलू लागले. या सान्या प्रकारामुळे खांसाहेबांच्या रागाचा पारा खूपच चढला होता आणि तब्येत चांगलीच गरम झाली होती. पण त्यामुळे कंठातल्या कफाच्या रेषा वगैरे थोड्या कमी होऊन गाणे छान रंगले! ते परज राग गायले. खांसाहेब गातील तो प्रत्येक राग–मग तो मामुली असो की मुष्कील असो–जणु काय त्यांचा हाच हातखंडा राग आहे असे श्रोत्यांना वाटे. परज, सोहनी व बसंत हे राग सर्वसामान्य श्रोत्यांनी अनेक मैफलीमध्ये ऐकले असतील. परंतु चमत्कार असा की, सर्व गायकांनी व संगीत नटांनीदेखील हाताळून अवज्ञिलेल्या व उपेक्षिलेल्या रागांची सजावट खांसाहेबांच्या गायकीतून अगदी अभिनव आणि अत्यंत आकर्षक स्वरूपात प्रकट होई! गाणे ऐकून क्लेमंटसाहेब फार खूष झाले हे सांगायला नकोच. विशेषतः खांसाहेबांनी, आवाजाची तक्रार असूनही 'परज' राग इतक्या विलक्षण परिणामकारक रीतीने गावा याचे क्लेमंट साहेबांना फार आश्चर्य वाटले. त्यांनी खांसाहेबांना दुसऱ्या दिवशी आपल्या बंगल्यावर बोलावून घेतले आणि आपण खूष झाल्याचे जणू काय प्रसादचिन्ह म्हणून आपला श्रुतींचा ऑर्गन खुद्दांनी वाजवून दाखविला! शेवटी श्रुतींचे जादा स्वर ते वाजवू लागले आणि कोणत्या गणित-पद्धतीने या श्रुती सिद्ध केल्या गेल्या वगैरे शास्त्रीय ज्ञान सांगू लागले. खांसाहेबांनी ते सर्व ऐकून घेतले. क्लेमंटसाहेबांनी मोठ्या दिमाखाने त्या ऑर्गनमधील श्रुतींसंबंधी खांसाहेबांचे मत विचारले. तेव्हां खांसाहेब म्हणाले, "साहेब, दोन निकट स्वरांतील सूक्ष्म मध्यंतरात श्रुतींची स्थाने पूर्वीच्या ग्रंथातून सांगितली आहेत खरी; म्हणून काही स्वराप्रमाणे श्रुती या स्थिर नसतात. त्या नेहमी स्पर्शमात्र वापरल्या जातात. म्हणून कंठातून किंवा वाद्यातून त्यांचा जर स्वरासारखा स्थान–निदर्शक विलंबित उच्चार केला तर त्यांचे श्रुतित्वच नाहीसे होईल आणि कसल्यातरी बेसुऱ्या स्वरांची कर्णकटुता त्यांना प्राप्त होईल. श्रुतींची स्थाने गणिताच्या साहाय्याने सिद्ध केली तरी श्रुतींची किंमत व कसोटी, ज्या ज्या रागांमध्ये त्यांचा वापर होतो त्या त्या रागांच्या परिणामकारकतेवर ठरते. योग्य जागी तंतोतंत श्रुती ध्वनित झाली की अंगावर रोमांच उठले पाहिजेत; एका अननुभूत आल्हादाच्या ऊर्मी उमटल्या पाहिजेत. या दृष्टीने आपल्या या ऑर्गनमधल्या खड्या श्रुती म्हणजे स्वरसप्तकातील अपस्वर ठरतात. श्रुती या संज्ञेचा अर्थच मुळी कानाला केवळ ऐकू येणारी, ती; गाताना कंठात किंवा वाद्यात स्पष्ट व स्थिर करता न येणारी, असा आहे."

प्रस्तुत लेखकाने चोवीस श्रुतींची हार्मोनियम नुकतीच तयार करून आणली होती आणि खांसाहेबानी ती बरी येऊन पाहिली. साहजिक क्लेमंटसाहेबांच्या श्रुतीऑर्गन-विषयीची भाषा निघाली आणि त्या वेळी त्यांचे श्रुतीसंबंधी वरील विचार ऐकायला मिळाले.

खांसाहेबांच्या गायकी व शिक्षणपद्धती संबंधी आक्षेप घेतले जात, काही दोषारोपही होत, त्यांचा थोडक्यात परामर्ष घेणे जरूर वाटते.

## चिजा चोरून ठेवणे

खांसाहेब चिजा चोरून ठेवीत, लोकांना त्या स्पष्टपणे ऐकू देत नसत, कोणाला त्यांच्या रागाचे नाव सांगत नसत, चिजांचे अंत्रे गात नसत व शिष्यशाखेलादेखील हरप्रकाराने चीज व राग यांबाबत गुप्तता राखण्याची त्यांची सक्त ताकीद असे, इत्यादी प्रवाद व गैरसमज फैलावले गेले व अद्यापिही जात आहेत. त्यात किंचित सत्याचा, परंतु त्यापेक्षा, 'द्राक्षे आंबट आहेत' अशा हताश वृत्तीचाच भाग फार मोठ्या प्रमाणात आहे.

प्रथम एकगोष्ट तर निर्विवाद आहे, की खांसाहेबांच्या चिजांच्या बांधणीत व मांडणीत अननुभूत नाविन्य व आकर्षण असते; नाहीपेक्षा त्या चिजांविषयी व रागांविषयी कोणी कशाला इतके कुतूहल बाळगले असते? आणि ते वर्षोगणती टिकले तरी कशाला असते? गायनकलेशी ज्याने ज्याने म्हणून कमीअधिक लागाबांधा जोडलेला आहे, त्या प्रत्येकाला वाटते की खांसाहेबांची गायकी जरी आली नाही तरी अनेक नव्या नव्या रागातल्या, ते किंवा त्यांचे शागीर्द गातात त्या अपूर्व सुंदर चिजा तरी आपल्याला मिळाव्या; निदान त्यांचे शब्द तरी मुखोद्‌गत व्हावेत; आणि ते मात्र कोणापाशी न मागता, न याचना करता किंवा कोणाचे शिष्यत्व न स्वीकारता!! मैफलीत किंवा जमल्यास तालमीत चीज ऐकून ती पाठ करणारे असे कुशाग्र बुद्धीचे कित्येक गायक असतातच. उदाहरणार्थ, रजबअलीखां हे अशा अचाट बुद्धिमानांमध्ये अग्रगण्य! पण अशा रुळलेल्या गायकाकडूनदेखील अशा उडविलेल्या चिजांचे स्वरूप व त्यांची मांडणी किंवा गायकी व्यवस्थित होत नाही; उलट चिजेचा रंगच ते नाहीसा करतात—मग इतरांची कथा काय? एकदोन कत्थक—गायकांनी तर अशा चारदोन चिजा हस्तेपरहस्ते मिळवून त्यावर नृत्याभिनयाचे साज चढविले! तसेच काही गायक-वादकांनी त्यांच्याकडून चिजा घेतल्या आणि आपणच त्या चिजा खांसाहेबांना दिल्या, अशी शेखी मिरविण्यात धन्यता मानली! संगीत विद्याभांडार कितीही लुटले तरी ते कधी कमी होत नाही हे खांसाहेबांना कळत नव्हते असे नाही. परंतु रत्नजडित मुकुटाचा कटोरा करून भिक्षेचे अन्न त्यात कोणी साठविले तर प्रत्यक्ष कुबेरालासुद्धा ते खपणार नाही. खांसाहेबांची गायनपद्धती, राग-ताल-स्वरादींचे ज्ञान इत्यादी सर्वच गान-विद्या, ज्या सुंदर चिजांवर मुख्यत्वे आधारलेली होती आणि अत्यंत कष्टाने गुरुमुखातून ज्या चिजा त्यांनी आत्मसात केल्या, अशा दुर्मिळ चिजांची दुर्दशा झालेली त्यांना कशी पाहवेल? आणि या कारणाने उचल्या-उडाऊ लोकांपासून आपल्या चिजांचे कसोशीने संरक्षण करण्याची वृत्ती त्यांच्यामध्ये बळावू लागली तर ते दोषार्ह कसे? आपल्या शागीर्दांना किंवा पुत्रांना त्यांनी अस्ताई-अंत्रे सांगितले नाहीत, असे थोडेच आहे? परंतु मूळच्या सौंदर्याचा ज्यामुळे विध्वंस होईल अशी चिजांची बाजारपेठ करू नका, असे त्यांचे कटाक्षाने सांगणे असे. ग्रामोफोनची रेकार्डस् आपल्या शिष्यगणाने द्यावीत हे देखील त्यांना मनापासून आवडत नसे. रेडिओसंबंधीसुद्धा त्यांना अरुची वाटे, ती याच संरक्षक वृत्तीमुळे. एकदा एका नामवंत गायकाने एका अनोख्या रागातील चिजेचे ग्रामोफोन रेकार्ड दिले होते

आणि कोणी तरी ते खांसाहेबांना सहज ऐकविले. ते ऐकून त्यांना मनस्वी संताप आला. "ग्रामोफोन कंपनीनं हे रिकार्ड कायमचं रद्द केलं तर फार बरं!" असे ते चिडून उद्गारले. "हे प्रसिद्ध गायक! आणि त्यांनी या चिजेचा आणि फिरतीचा असा सत्यानाश करावा? होतकरू गाणाऱ्यांची या रागाविषयी आणि विस्ताराविषयी किती विपरीत कल्पना होईल? ज्या रागरागिणींची पूर्णपणे कल्पना आलेली नाही, अशा रागिण्यांची रिकार्ड द्यावीच कशाला?" असे खांसाहेबांनी जळजळीत उद्गार काढले!

रेकार्ड्सवरून व पुस्तकी चर्चेवरून रागांची सचाई ठरविणारे काही पंडित या जमान्यात निर्माण झाले आहेत; त्यांना रागांचे खरे रंजक स्वरूप बहुधा माहीतच नसते. कारण गायकांच्या प्रत्यक्ष मैफली ऐकण्याची ते क्वचितच तसदी घेतात. त्यांची सर्व मदार पुस्तकांवर व रेकार्ड्सवर! अशा या टीका-पंडितांच्या उपद्व्यापामुळे नवीन पिढीच्या विद्यार्थ्यांचा व जिज्ञासूंचा बुद्धिभेद व दिशाभूल मात्र होत आहे. आणि अशाच लोकांनी खांसाहेबांवर व त्यांच्या शिष्यशाखेवर चिजा छपविण्याचा व अशुद्ध गायकीचा आरोप करून अनभिज्ञांमध्ये प्रतिष्ठा मिरवावी यापेक्षा घृणास्पद व हास्यास्पद ते काय असेल!

## पांडित्य

प्रत्यक्ष कंठगत शिक्षण घेताना व देताना जी काही संगीताची शाब्दिक चर्चा करावी लागेल, तेवढीच काय ती खरी उपयोगी पडते; केवळ शाब्दिक किंवा पुस्तकी चर्चा कंठगत कलासाधनेला मारक होते, अशा मताचे खांसाहेब असत. सर्व ख्यातनाम कलावानांचेदेखील असेच मत आहे. खांसाहेब म्हणत "क्लेमंटसाहेबांना मी चारदोन रागांची फोड करून सांगितली; त्यांनी ती लिहून घेतली. पण त्याचा कोणाला काय उपयोग झाला? पंडित भातखंडेरावसाहेबांचे आणि माझे फारसे कधी सूत जमले नाही, याचे कारण तरी हेच की शास्त्रावर कलेने अवलंबून राहावे असा त्यांचा बाणा आणि **कला हीच प्रथम-साधना आणि शास्त्र तिला अनुसरून** असे माझे म्हणणे." असा मतभेद होणे साहजिकच होते; कारण एक नुसतेच महान पंडित व दुसरे महान कलावान पंडित! '**गावो, बजावो, रिझावो**' या तीन गोष्टींवर संगीतकलेची प्रतिष्ठा व गौरव ही आधारलेली आहेत, असे खांसाहेब नेहमी म्हणत. ते एक गोष्ट सांगत– पूर्वीच्या काळातील एक महापंडित संगीत शास्त्रासंबंधी खूप वादविवाद करीत असे. त्यांनी ठिकठिकाणच्या गायकवादकांना पराजित करून त्यांच्याकडून शरणचिट्ठ्या मिळविल्या होत्या. उंटाचे कंबरडे मोडेल इतका मोठा संगीत ग्रंथांचा संभार ते बरोबर बाळगीत. तो उंट आणि तो ग्रंथांचा डोंगर पाहूनच इतर गायक गर्भगळित होत! इकडे एका छोटेखानी गावात एक गायक कसातरी निर्वाह करून संगीतव्यासंग व विद्यादान करण्यात निमग्न असे. त्याची कीर्ती या महापंडिताच्या कानावर येताच त्यांनी त्या गायकाच्या गावाकडे मोर्चा फिरविला आणि आपल्या उंटासह एक दिवस त्या बिचाऱ्या गायकासमोर ते उभे राहिले. "वादविवाद करा नाहीतर शरणचिट्ठी द्या; या उंटाच्या पाठीवर लादलेले हे सर्व गाण्याचे

ग्रंथ आहेत आणि ते मला मुखोद्गत आहेत; राग-विद्या, स्वरविद्या, ताल-विद्या, श्रुतिमीमांसा वगैरेमध्ये मी अजिंक्य आहे!" उंट तर मटकन खाली बसला. तो गायक मिस्किलपणे उद्गारला, "हे इतके सारे गाण्याचे ग्रंथ आहेत! काय हे भांडार! पण पंडितजी! यातले **रिझविणारे** ग्रंथ कितीसे आहेत ते दाखवा पाहू".

**पंडितजी** : "शास्त्रग्रंथाचा आणि रिझविण्याचा संबंध काय?"

**गायक** : "मग तुमचा आणि संगीताचा तरी संबंध काय?"

**पंडितजी** : "साऱ्या गायकानी मला शरणचिट्ठी दिली आहे."

**गायक** : "पंडितजी, ती शरणचिट्ठी तुम्हाला नव्हे. तुमच्या उंटाला दिली असेल! इतक्या रुक्ष ग्रंथाचे प्रचंड ओझे पाठीवर वाहून तुमच्या बरोबर फिरायचे, उंटाखेरीज कोणाला जमणार? जा. आता माझ्या व्यासंगात व्यत्यय आणलात तेवढा पुरे झाला. त्या उंटाची कीव करून मी इतका वेळ तुमच्याशी बोलत राहिलो; त्याला तेवढीच विश्रांती मिळाली." ही गोष्ट खांसाहेब फार मजेने सांगत.

## ग्रामोफोन रेकर्ड्स

ग्रामोफोन रेकर्ड्स देण्याबाबतही खांसाहेबांची याच प्रकारची विचारसरणी होती. परंतु कारण मात्र निराळे होते. वयाच्या पासष्टीनंतर खांसाहेब मुंबईचे कायम रहिवासी झाले. त्यापुढे दहाबारा वर्षांनी मुंबईकरांना त्यांच्या गायनकलेच्या विराट स्वरूपाची कल्पना येऊ लागली आणि मग कुठे त्यांच्या गायनाची रेकर्ड्स घेण्याची बुद्धी त्यांच्या चाहात्यांना सुचू लागली. वार्धक्यामुळे गायनाची बैठक करण्याचेदेखील ते होता होई तो टाळू लागले होते. मग रेकर्ड्स देऊन आपल्या म्हातारपणाच्या गायनाची स्मृती मागे ठेवावी, हे त्यांच्या मानी स्वभावाला मुळीच मानवेना; आणि शेवटपर्यंत त्यांनी आपला हट्ट चालविला. "माझ्या गाण्यानं माझा स्वतःचा जीव भरेनासा झाला आहे. लोकांना ते अजूनही अपूर्व वाटते ही त्यांची व माझ्या गुरुजनांची कृपा; पण रेकर्ड्स ऐकून पुढच्या अनेक पिढ्यांनी हेच म्हणायचे ना, की एवढे हे अल्लादिया—हे इतकंच गात होते कां? हा डाग कशासाठी लावून घ्यायचा?" प्रस्तुत लेखकाने खांसाहेबांचे मन वळविण्याचा एकदा प्रयत्न करून पाहिला होता; त्या वेळी त्यांनी अखेर एक प्रश्न केला—"गोविंदरावजी, स्वतःचं रेकर्ड ऐकून स्वतःचं पूर्ण समाधान कोणत्याही सच्च्या गवयाला कधी मिळालं आहे का?" मी म्हटले, "हुजूर, हे आपल्या समाधानासाठी करायचं नाही. दुनियेच्या समाधानासाठी." त्यावर त्यांनी मासलेवाईक उत्तर दिले—"गाण्याची रेकर्ड देणं म्हणजे काही पाणपोई घालणं नव्हे की धर्मशाळा बांधणं नव्हे. ज्या गाण्यानं स्वतःचं समाधान होत नाही त्यानं दुसऱ्याचं समाधान कितीसं होणार!" मी त्यांना पुन्हा किंचित छेडले —"आपल्या चिजा व आपली गायकी लोक चोरतील, उचलतील अशी शंका आपल्याला वाटत असेल." ते म्हणाले, "मुळीच नाही. ज्या वेळी मी ऐन जोषात होतो त्या वेळी फोनोग्राफवर पंतसाहेब बावडेकरांना व बाळासाहेब गाइकवाडांना मी रेकार्ड घेऊ दिली की

नाही?" यावर मला काहीच बोलता येईना; कारण माझ्या समोरच गगनबावड्यास पन्नास वर्षांपूर्वी श्री. माधवराव पंतअमात्य बावडेकर यांनी मेणाच्या बांगड्यावर खांसाहेबांच्या पाचसहा चिजा मुद्रित केल्या होत्या. प्रत्येक चिजेकरिता त्यानी तीनतीन बांगड्या (सिलेंडर्स) उपयोगात आणल्या होत्या. अडाणा, मालश्री, शुद्धकल्याण, पूर्वी आणि एक नवीन जातीचा 'मांड'—अशी ती रेकर्ड्स होती. या मेणाच्या बांगड्या जेव्हा गगन-बावड्यास गु. भास्करराव बखले यांनी ऐकल्या तेव्हा दोन दिवस ते बेचैन होऊन राहिले होते! अशी प्रभावी गायकी त्यात उतरलेली होती. या मेणाच्या बांगड्या पंधरावीस वर्षे जेमतेम टिकल्या होत्या.

· सारांश, खांसाहेबांनी आपल्या रेकर्ड्स न दिल्यामुळे अनेक रसिकांची निराशा झाली असली तरी त्याचा दोष खांसाहेबांना देणे किंवा विद्या चोरून ठेवण्याचा त्यांच्यावर बेजबाबदारीने आळ घेणे चुकीचे नाही का? त्यांच्या जोमदार अवस्थेत त्यांची रेकर्ड्स घेण्याचा ग्रामोफोन कंपनीने किंवा कोणी चहात्याने प्रयासच केला नाही.

## आणखी एक प्रवाद

त्यांच्यासंबंधी माजविलेल्या आणखी एका प्रवादाचा ओघाने विचार करणे अप्रस्तुत होणार नाही. तो प्रवाद असा की खांसाहेब विद्यादानाच्या बाबतीत अत्यंत कंजूष होते. याचा अर्थ इतकाच की चव्हाट्यावर बसून त्यांनी संगीताची चर्चा केली नाही! कारण आजकालचा जमाना संगीतकलेच्या व्यासंगाचा नसून संगीताची शाब्दिक चर्चा करण्याचा आहे. शाब्दिक चर्चा करणे हेच जणू काय विद्यादान! अशा लोकांना खांसाहेब कधी थारा देत नसत. तेव्हा अशा लोकांनीच हा प्रवाद फैलावला तर नवल नाही. अस्थानी विद्यादान करायचे नाही, हा खांसाहेबांचा बाणा. आस्थेने आणि चिकाटीने जे जे शागीर्द जोपर्यंत त्यांच्या सान्निध्यात राहिले, त्या सर्वांना त्यांनी विद्या दिली. ज्यांना गायकी शिकायची होती त्यांना गायकी शिकविली; ज्यांना नुसत्या चिजाच पाहिजे होत्या त्यांना चिजा शिकविल्या; ज्यांना ध्रुपद-धमारच शिकायचे होते त्यांना ते शिकविले. मात्र प्रत्येकाची निष्ठा व आस्था पारखून ते विद्यादान करीत. आणि हा त्यांचा निकष पुत्र, बंधू, नामवंत कलाकार किंवा इतर शागीर्द या सर्वांनाच लागू असे. स्वतःच्या तिन्ही मुलांकडून विद्या-व्यासंगाची निभावणी होत नाही अशी जेव्हा त्यांची खात्री झाली त्या वेळेपासून "आमच्या घराण्यातील गायनविद्या नष्ट होणार" असेच त्यांचे कळवळून उद्गार निघत.




# ८. अखेर मुंबईस स्थिर झाले

खांसाहेबांनी १९२२ मध्ये कोल्हापूर सोडले. त्यानंतर ते क्वचित कोल्हापूरला येत. पण त्यांचे अखेरपर्यंत कायमचे वास्तव्य मुंबईसच झाले.

खांसाहेब मुंबईत राहण्यास आले त्या वेळी अतुल कीर्तिमान महाराष्ट्रीय कलावान व संगीतमहर्षी अशी त्यांची ख्याती झालेलीच होती. या वेळी त्यांचे वय पासष्टीच्या पुढे होते. गाण्याचा जोम अर्थातच कमी झाला होता. या जाणिवेमुळे गायनाच्या मैफली करून वित्तार्जन करण्याची वृत्ती होता होईतो त्यांना नकोशी होऊ लागली. आपले कलाभांडार श्रोत्यांच्या पदरात भरपूर टाकण्याचे आपल्यामधील सामर्थ्य आता कमी झाले असताना गायनाच्या मैफली झोडण्याचे कर्म करणे त्यांच्या स्वाभिमानी वृत्तीला कमीपणाचे व अन्यायाचे वाटू लागले. तसा महत्त्वाचाच प्रसंग पडल्यास ते गात. वयाच्या आठ्याऐंशी-नव्वद वर्षापर्यंतदेखील ते गायले! आणि त्या वयातसुद्धा त्यांनी आपली अगाध गायनविद्या श्रोत्यांना पटविली; परंतु त्यांच्या स्वतःच्या मनाचे समाधान होत नसे. प्रस्तुत लेखकाला ते म्हणत, "गोविंदरावजी, कोल्हापुरास असतानाची माझी गाणी तुम्ही ऐकलीत तीच खरी. आता काय ऐकणार?" खट रागातील एका चिजेचा उल्लेख निघाला असताना ते आवेशाने उद्गारले, "आता ती चीज माझ्याच्याने गायली जाणं खरोखर अशक्य आहे." सारांश, स्वतःच्या गायनाबाबत ते साशंक व निरुत्साही होऊ लागले. वार्धक्यामुळे दमश्वास कमी होऊ लागला व आवाजात किंचित कंप येऊ लागताच सुरुवातीची स्वरालापाची गायकी कमी करून पेचदार तानांच्या विविध विलासावरच आपल्या यशाची मदार त्यांना ठेवावी लागली. शिवाय बोलतानांचे असंख्य मनोहर प्रकार, लयतालाशी ललितक्रीडा, नव्यानव्या रागरागिणींची अपूर्व शोभा इत्यादी गायनांगे त्यांच्या सेवेला सज्ज झाल्यामुळे त्यांच्या गायनातील रंजकता व नवीनता कधीही नष्ट झाली नाही. गायनकलेचा वरदहस्त कायम होता—परंतु खांसाहेब गायला उत्सुक नव्हते!

अशा स्थितीत मुंबईस योगक्षेम चालविण्यासाठी काही तरी करणे प्राप्तच होते; आणि ते काही तरी म्हणजे कोणा तरी शिष्य-शिष्यिणींना गायनाचे शिक्षण देणे. यावाचून दुसरे काय असणार? कोणाची नोकरी करायची नाही हा तर निर्धार! मुंबईच्या—नव्हे महा-

राष्ट्राच्या–नव्हे हिंदुस्थानच्या सुदैवाने, **श्रीमती केसरबाईंनी** त्यांचे शागीर्द व्हावे असा योगायोग लौकरच जमून आला आणि अखिल भारतीय कीर्तीची ही एकमेव गायिका मुंबईत त्यांच्या तालमीत तयार होऊ लागली.

## केसरबाई केरीकर

वरील योगायोग म्हणजे संगीतप्रेमी जनतेच्या भाग्याची व संगीताच्या इतिहासात एक अत्यंत महत्त्वाची घटना समजली पाहिजे. पूर्वीच्या काळातील गोखीबाई, चुन्ना, जोहराबाई गुलाबबाई, बाबलीबाई (आग्रेवाले नत्थनखांची शागीर्द) इत्यादी स्वतःच्या व गुरूंच्या परिश्रमामुळे ज्या आपापल्यापरी एकमेव गायिका ठरल्या होत्या त्यांच्या कष्टाशी व योग्यतेशी आजकालच्या केसरबाईंची तुलना करणे चुकीचे ठरणार नाही. केसरबाईंच्या गुणांची व वरील गायिकांच्या गुणांची तुलना करणे अर्थात आज शक्य नाही, तसा हेतू नाही किंवा ते प्रस्तुत नाही. त्या प्रत्येक जशा एकमेव ठरल्या आहेत तशा केसरबाईही एकमेव ठरल्या आहेत, हे मात्र खरे. आणि याचे श्रेय शिष्येच्या अहर्निश कष्टाइतकेच गुरूच्या निरलस शिक्षणाला द्यावे लागेल, यात संशय नाही.

अल्लादियाखांसाहेबांनी ज्या वेळी केसरबाईंना तालीम देण्यास सुरुवात केली त्या वेळी गायनकलेमध्ये त्या नवशिक्या होत्या असे नव्हे, वझेबुवा, भास्करबुवा यांची थोडीफार तालीम त्यांना मिळाली होती. त्यांच्यानंतर सुप्रसिद्ध सतारिये बर्कतुल्लाखां यांची तालीम घेण्याविषयी त्यांच्या काही हितचिंतकांनी आग्रह धरल्यामुळे त्यांनी बर्कतुल्लाखांची तालीम सुरू केली. बर्कतुल्लाखां उत्कृष्ट कसबी सतारिये खरे; त्यांच्यासारखा सतारीचा जोमदार व कसबी बाज क्वचितच ऐकायला मिळेल. हे जरी सारे खरे असले तरी ते नामवंत सतारिये व पखवाजी; वादनकला हस्तगत असली, तरी गायनाची तपश्चर्या त्यांनी कधी केली नव्हती. त्यामुळे झाले काय, की सतारीतील मिंढी व गमका त्या वाद्यात जशा पिळदार, सुरेल, परिणामकारक वाटत तशा त्या केसरबाईंच्या गळ्यातून तर निघत नसतच, उलट स्वरांपासून व रसापासून सुटलेल्या व कृत्रिम अशा त्या लागत! ही एक विकृतीच त्यांच्या गळ्यात निर्माण झाली होती. यात केसरबाईंचा काही दोष होता असे नाही. त्या वेळी दोष कोणता व गुण कोणता याची पारख करण्याइतकी त्यांची नजर नसणे साहजिकच होते. अर्थात हा दोष काढून टाकण्याचे कष्ट खांसाहेबांना प्रथम करावे लागले. गुरुजींच्या कष्टाकडे पाहून शिष्यिणीनेही निराश न होता गळ्याच्या अनन्वित यातना सोसून निष्ठेने मेहनत केल्यामुळे वरील दोष हळूहळू कमी होऊ लागला. शाईचे डाग काढण्याकरीता खर जास्त घासला गेला तर चिवट नसलेला कागदच फाटून जाण्याचा संभव असतो. पण तसे काही झाले नाही. केसरबाईंची चिकाटीच फार मोठी! शिवाय विद्यासाधनाची हौस व स्वतःला नावलौकिक मिळविण्याची महत्त्वाकांक्षा, या दोन शक्तींची प्रेरणा असल्यामुळे कलाविकास हाच त्यांचा जीवितहेतू झाला होता. त्यातून, जन्मभर विद्या शिकण्याची उमेद असली तरी देखील ती पुरवून उरणारे अल्लादियाखां-

सारखे गुरुवर्य! खेरीज, गुरूला व शिष्येला भरपूर आरामात ठेवणारे कळकळीचे हितचिंतक! अशा या त्रिवेणीसंगमाला संगीत प्रदेशातील सुरम्य क्षेत्राचे स्वरूप यावे हे क्रमप्राप्तच होते.

पुढे मोठमोठ्या रकमा खर्चून कित्येकांनी खांसाहेबांचे गंडे बांधले. परंतु 'दात आहेत तर चणे नाहीत' अशा म्हणीप्रमाणे, केसरबाईसारखी सतत १५-१७ वर्षे अव्याहत शिक्षण घेण्याची निष्ठा व चिकाटी इतर कोणी दाखविली नाही; किंवा या ना त्या कारणाने तसा योगायोग कायम टिकला नाही. म्हणून केसर-अल्लादियाखां ही गुरु-शिष्येची युती, गुरुचंद्राच्या युतीप्रमाणे रसिकांना अत्यंत आल्हादकारक व संगीताल उपकारक अशी एक विधिघटनाच वाटली तर त्यात नवल नाही. आणखी एक योगायोगाची गोष्ट म्हणजे केसरबाईंचा आवाज—श्री. ताराबाई शिरोडकर यांच्या आवाजासारखा पल्लेदार प्रवाही नव्हे, की मोगूबाई कुर्डीकरांच्यासारखा नोकदार चपलही नव्हे किंवा हिराबाई बडोदेकरांच्या सारखा लवलवीत गुळचिटही नव्हे. या तिन्ही नामवंत गायिकांच्या आवाजांना खांसाहेबांची गायकी जरी साध्य झाली असती तरी ती शोभून दिसण्यासारखी नव्हती. त्या गायकीला स्त्रियांमध्ये सहसा न आढळणाऱ्या रुंद व भरदार आवाजाचीच जोड पाहिजे होती, आणि केसरबाईंचा आवाज निसर्गाने जसा पाहिजे होता त्या जातीचा घडविला आहे. त्यांचा आवाज रुंद व किंचित दाला आहे; जातीचा कणखर परंतु मेहनतीने लवचिक बनला असल्यामुळे त्यांच्या तानक्रियेत व स्वरालापात बारीकपणा किंवा पुसटपणा चुकूनही दिसत नाही. गोडीपेक्षा त्यांच्या आवाजातील ओजस्वी रुंदीचा श्रोत्यांवर सकृत् परिणाम होतो. आवाजातील वरील प्रकाराच्या गुणामुळे, त्यांच्या तरल बुद्धीमुळे व कष्टाळू वृत्तीमुळे केसरबाईंना तालीम देताना खांसाहेबांना वाढता हुरूप वाटू लागला असावा. असो. आपल्या जोरकस, भरदार व पेचदार गायकीला (स्त्रियांच्या मानाने) पेलू शकणाऱ्या अशा आवाजाची कष्टाळू शिष्यीण खांसाहेबांना मिळाली; तालीम सुरू झाली; खांसाहेबांचा बराचसा वेळ केसर-बाईंच्या येथे जाऊ लागला. एक घंटाभर तालमीचे दरमहा इतके पैसे अशा ठरलेल्या हिशेबाने खांसाहेब कधीच वागले नाहीत. तालमीत रंगून गेले म्हणजे दोन तास आणि तीन तास काय, याचे त्यांना भान राहत नसे. पहिली काही वर्षे तर सकाळी-संध्याकाळी मिळून आठ तास तालीम चाले. धन्य गुरू! धन्य शिष्या!! अशा या तालमीमुळे केसरबाईंची गायनविद्या शुक्ल पक्षातील चंद्राप्रमाणे कलेकलेने वाढत चालली आणि बारा वर्षांच्या एका तपानंतर केसरबाईंच्या पूर्ण कलेची चांदरात आज पंचवीस वर्षे रसिकांना रंजवीत आहे. तिला कृष्णपक्षाची उतरती कळा कधीच लागली नाही.

खांसाहेबांच्या लौकिकाच्या दृष्टीनेदेखील ही घटना महत्त्वपूर्ण होती. स्वतः ते प्रसिद्धि-पराङ्मुख होते, त्यामुळे संगीतविद्यासाधन, अध्ययन व अध्यापन यांमध्ये ते मग्न असत. उरलासुरला वेळ ते प्रतिष्ठित स्नेही मंडळीत घालवीत. आता तर वृद्धावस्थेमध्ये गाय-नाच्या बैठकीमुळे मिळणाऱ्या प्रसिद्धीची नको होती ती कटकटदेखील आपोआपच कमी

होत चालली. खांसाहेब म्हणजे बडे प्रस्थ. मुंबईत राहतात आणि केसरबाईला तालीम देत असतात व नित्यनियमाने चौपाटीवर संध्याकाळी फिरतात– यापलीकडे त्यांच्याविषयी मुंबईच्या कलावानांमध्ये किंवा संगीतषोकी मंडळींमध्ये अधिक कुतूहल आढळून येत नसे. संगीताची महाविद्यालये, संगीताची सार्वजनिक ठिकाणी चर्चा, संगीतावरील ग्रंथनिर्मिती अशा नवोनव प्रकारेण प्रसिद्धी मिळविण्याचा तो जमाना ऐन जोषात होता. परंतु क्रिया-सिद्ध सांगीतिकांच्या जुन्या पिढीतले हे खांसाहेब! त्यांना हे उपक्रम केव्हाच मानवले नाहीत. अर्थात मुंबईकरांना हे खांसाहेब असून-नसून सारखेच वाटत होते. यात मुंबई-करांचाही दोष नव्हता व खांसाहेबांचाही नव्हता. सारांश, प्रसिद्धीचा उपसर्ग न बांधता शेवटपर्यंत विद्यामग्न राहण्याची खांसाहेबांना पाहिजे होती तशी परिस्थिती मुंबईत निर्माण झाली होती. ते मोठ्या सुखासमाधानाने आपला आखलेला संथ जीवनपथ आक्रमीत होते. परंतु अशा देदीप्यमान कलासंपन्न तपस्व्याचा प्रभाव कोणत्या ना कोणत्या तरी रूपाने प्रकट झाल्यावाचून कसा राहील? अग्नी झाकला तरी आचेमुळे त्याचे अस्तित्व जाहीर होतेच.

पुढे जेव्हा केसरबाईंच्या मैफली झडू लागल्या व मुंबइतील त्या वेळच्या प्रथम श्रेणीतील गायिकांच्या बरोबरीला त्या पोहोचल्या आणि अल्पकालाने जेव्हा त्यांनी सर्वच गायिकांना मागे टाकले, त्या वेळी कुठे मुंबईकरांना खांसाहेबांची योग्यता पटू लागली. पदमुद्रेचा अवाढव्य ठसा बघितल्यानंतर मग गजराजाच्या प्रचंड आकाराची कल्पना येऊ लागावी, तसा हा प्रकार झाला!

## दौलतखां ध्रुपदिये

याच सुमारास शेठ त्रिभुवनदास नावाचे एक गुर्जर सद्गृहस्थ अल्लादियाखांसाहेबांकडे ध्रुपदधमारची तालीम घेऊ लागले. या वेळी खांसाहेबांचे वडील चुलत बंधू दौलतखांसाहेब हे मुंबईमधील त्या वेळचे एक अत्यंत संगीतषोकी व रसिक भाटिये माधवदास ऊर्फ मम्मूशेट पारख यांच्याकडे राहिले होते. दौलतखां हे दक्षिणेत आलेले जुन्या जमान्यातील खास ध्रुपदिये असे म्हणता येईल. त्यांच्याजवळ अठरा-वीस हजार चिजांचा संग्रह होता! खुद्द अल्लादियाखां यांनादेखील त्यांच्याकडून काही चिजा पोहोचलेल्या होत्या. बसल्या-बसल्या सहज 'वसंतबहार' रागातील साठ-सत्तर ध्रुपदे, धमार, होरी, तराणे, प्रस्तुत लेखकाला तीन तास म्हणून दाखविल्याची हकीगत 'माझा संगीतव्यासंग' या पुस्तकात वर्णन केलेली आहे, ती याच नामवंत ध्रुपदिये—दौलतखांची. राहणी फकिराची आणि वृत्ती भोळ्या बालकाची. चिजा देण्याच्या बाबतीत कर्णाचे औदार्य; पैशाची किंवा कशाचीच हाव नाही की वासना नाही. भोजनाचे ताट आले की, मांजर, कुत्रे, कोंबडे कावळे यांना चार-दोन घास टाकून उरेल तेवढ्यात जेवण उरकायचे! मध्यभागी प्रमुख दौलतखां आणि मागे अल्लादियाखां व हैदरखां तंबोरा घेऊन बसल्याची दृश्ये त्या वेळी मुंबईतील रसिक धनिकांच्या दिवाणखान्यात ज्यांना प्रस्तुत लेखकाप्रमाणे पाहायला मिळाली ते खरे

भाग्यवान! इतक्या तासिरीचे ध्रुपद-धम्मार पुन्हा ऐकायला मिळणार नाहीत. ध्रुपद-धमाराच्या गायकीचा सोज्ज्वलपणा, गांभीर्य व उदात्तपणा इत्यादी गुणांपुढे ख्यालाची गायकी चंचल, फिकी आणि किंचित कमी दर्जाची असते याची प्रचिती त्या वेळी श्रोत्यांना पटली. पण त्या गायकीतदेखील अल्लादियाखां नवीनवी सौंदर्यस्थळे शोधून काढीत! ख्यालाच्या ललितचंचल गायकीवर मोहित झालेल्या रसिकांचे डोळे या दोघा बंधूंच्या ध्रुपद-धम्मार गायकीमुळे चांगलेच दिपून जात!

यानंतर दौलतखां धृपदियांचा मुंबईत चांगलाच बोलबाला होऊ लागला आणि मुद्दाम ध्रुपद-धमार ऐकण्यासाठी एके रात्री मम्भूशेट पास्ता यांच्या बंगल्यात दौलतखांचे गाणे ठरले. दौलतखांसारख्या ख्यातनाम ध्रुपदियाची क्वचितच होणारी गायनाची मैफल! अर्थात मुंबईतील सर्व प्रकारचे प्रमुख कलावंत, रसिक नागरिक जिज्ञासू व मुमुक्षू व्यासंगी इत्यादिकांनी पास्ता शेठजींचा दिवाणखाना गजबजून गेला होता. अल्लादियाखांसाहेब आले! आता इतक्यात दौलतखां येतील. सर्व जण आतुर होऊन राहिले. दहा वाजून गेले–साडेदहा झाले! पण दौलतखांचा पत्ता नाही. कोणी म्हणत, "दादरला राहतात ते, कदाचित गाडी चुकली असेल." कोणी म्हणत, "या गवयी लोकांना वेळेची किंमत नसते." कोणी म्हणत, "दौलतखां पिकलेलं पान झालं आहे. काही तरी झालं असेल ऐन वेळी." कोणी काही, कोणी काही. सारांश, सारी मैफल बेचैन झाली. दौलतखां-सारख्या सत्त्वशील सज्जनाकडून मैफलीची प्रतारणा कधी व्हायची नाही ही पास्ताशेठजींची खात्री. पण आज न होणारी गोष्ट झाली खरी. त्यांचा चेहरा चिंतेने म्लान झालेला पाहून अल्लादियाखांसाहेब म्हणाले, "शेठसाहाब, भाई दौलतखां नाही आले तरी त्यांच्या ऐवजी मी गायला बसतो." पास्ताशेठ उत्तरले, "ही मंडळी ध्रुपद–धमारचं गाणं ऐकण्यासाठी मुद्दाम जमली आहेत; आणि आपण तर ख्यालिये." खांसाहेब उद्गारले, "माझी आणि भैय्याची तालीम एकच आहे. आज मी ध्रुपदधमार गाऊनच मैफलीची सेवा करणार आणि भाईसाहेबांची बाजू राखणार." इतके सांगून ते साज मिळवू लागले. त्या रात्रीची ती ध्रुपद–धमारची गंभीर, बोजेदार गायकी ऐकून गदाधारी योद्ध्यांच्या धुमश्चक्रीची कल्पना श्रोत्यांच्या मनात उभी राहिली. कारण मक्खनभैय्या, पर्वतसिंग-सारख्या पखवाजी–वीरांशी लढत! तीनचार तास ही कलावंतांची झुंज चालली होती. खांसाहेब एवढे तानबहाद्दूर, पण आज त्यांच्या गळ्यातून ध्रुपद गायकीला न शोभणारा असा एकदेखील तानपलटा किंवा मुरकीसारखा क्षुद्रालंकार निघाला नाही–जणू काय या गायकाच्या गळ्याला तानफिरत माहीतच नाही अशी श्रोत्यांची भावना झाली! तात्पर्य, अल्लादियाखांसाहेब ख्याल गाऊन जशी मैफल रंगवीत तशीच ध्रुपद–धमारचा कायदा संभाळून त्यानी ती संस्मरणीय मैफल रंगविली. बर्कतुल्लासारख्या तेढ्यावाक्या पखवाजी-बरोबर ते मोठ्या हौसेने ध्रुपद–धमार गात. "आपण ख्यालिया ऐवजी ध्रुपदियाचा पेशा स्वीकाराल तर मी सतारियाचा पेशा सोडून पुन्हा पखवाजी बनेन.", असे बर्कतुल्लाखांनी अशाच एका मैफलीत उद्गार काढले होते!

## मुंबईतील दिनचर्या

केसरबाईंची दोन वेळची तालीम, पाच वेळचे नमाज, चौपाटीवर नित्य न चुकता रपेट, अशी नियमबद्ध दिनचर्या खांसाहेबांनी ठेविली होती. मितस्त आहार-विहार-निद्रा, मितभाषण. राग, लोभ शोकादी विकारांच्या आहारी न जाणे, समतोल समाधान-वृत्ती, अशा अनेक गुणांना अंगी जडवून घेतल्यामुळे खांसाहेबांची प्रकृती अखेरपर्यंत कार्यक्षम राहिली, यात संशय नाही.

केसरबाईंचा हळूहळू बोलबाला होऊ लागताच मुंबईतील इतर काही गायिकांनीही त्यांची तालीम मिळावी म्हणून प्रयत्न केले; परंतु खांसाहेब त्या जंजाळात पडले नाहीत. ते म्हणत, "केसरची तालीम पतकरल्यामुळे विनाकारण बर्कतुल्लाने माझ्याशी वैमनस्य धरले. मग आणखी दुसऱ्या तालमी पतकरून कोणाकोणाचे म्हणून शत्रुत्व मी या वयात जोडू ?"

## ताराबाई शिरोडकर

श्री. ताराबाई शिरोडकर या काळातील मुंबईत अग्रगण्य गायिका समजल्या जात. भास्कररावांच्या तालमीत त्या तयार झाल्या होत्या आणि गुरूचे नाव सार्थ करण्यासारखे मोहक व तयारीचे गायन त्या गात. तार-सप्तकातील टिपेला सहज पोहोचणारा त्यांचा आवाज कोकिळेच्या टिपेसारखा वाटे! त्या वेळी प्रथम ताराबाई आणि नंतर केसरबाई असा या दोघींचा गाण्याच्या बाबतीत अनुक्रम लागत असे. भास्कररावांच्या अकाल मृत्यूमुळे ताराबाईंच्या शिक्षणात खंड पडला. तेव्हा खांसाहेबांचे शिक्षण मिळावे म्हणून त्यांनी पुष्कळ कोशीस केली; पण तसा योग जमला नाही याचा विपर्यास मात्र असा झाला की इतर कोणालाही शिकवायचे नाही असे केसराबाईंनी खांसाहेबांकडून वचन घेतले होते! खांसाहेब विद्यादानाच्या बाबतीत अत्यंत कंजूष-इत्यादी प्रवाद फैलावू लागले. खरी गोष्ट म्हणजे केसराबाईंच्या 'घंटोंतक' तालमीनंतर तसेच कष्ट दुसऱ्या शिष्यिणीवर करण्यासारखी त्यांच्या अंगी वयमानामुळे शक्ती नव्हती. त्यांचे वय सत्तरीला टेकू लागले होते. तरीदेखील पुढे काही वर्षांनी श्री. मोगूबाई कुरडीकर यांना अधून-मधून शिकवीत असत.

एक गोष्ट मात्र दिसून येई ती ही, की कोल्हापुरात असताना लूटून विद्या मिळविण्याच्या रजबअलीखांच्या कारवाईमुळे आणि संगीतातील शास्त्री-पंडितांच्या केवळ नोटेशन लिहून चिजा घेण्याच्या हव्यासामुळे खांसाहेब आपल्या अनमोल अनोख्या चिजांबाबत विशेष सावधपणा बाळगू लागले. त्यामुळे केसराबाईंच्या तालमीला एक प्रकारचे 'जनांतिकम्'चे स्वरूप येऊ लागले-न जाणो कोणी तरी चिजा चोरील आणि प्रतिस्पर्धी गायिका त्या गाऊ लागतील! कुबेराने आपले अक्षय्य भांडार चोरांच्या भीतीने भूमीत दडवावे, अशापैकी हा प्रकार होता! कसेही असो; खांसाहेबांमध्येच काय पण त्यांच्या शिष्य-परंपरेमध्ये व संप्रदायिकांमध्ये ही जपणुकीची भावना बळावली खरी; आणि

गेल्या पंचवीस-तीस वर्षांत त्यांच्या अनुयायांमध्ये या चिजांच्या चोरट्या राखणदारीचे बरेच स्तोम माजले आहे.

## गंडयांची लाट

महाराष्ट्रीय नाटक मंडळ्यांच्या मालकांमध्ये नामवंत गवयांचे गंडे बांधून शागीर्द होण्याची मध्यंतरी थोडा वेळ लाट आली होती. त्यात विद्या शिकण्यापेक्षा जाहिरात-बाजीच जास्त होती. हजारो रुपये खर्चायचे आणि फार तर दहा-पाच चिजा शिकायच्या! केशवराव भोसले, त्यानंतर पेंढारकर, नंतर दिनानाथ हे वझेबुवांचे शागीर्द म्हणून मिरवू लागले; बालगंधर्व भास्करबुवांचे (मात्र गंडा न बांधता); सवाई गंधर्व पूर्वीपासूनच अब्दुलकरीमखांचे, व देवासकर हैदरखांचे शागीर्द! आणि शेवटी शंकरराव सरनाईक यांनी पाच हजार रुपये खर्चले आणि अल्लादियाखां साहेबांचा गंडा बांधून सर्वांवर मात केली! परंतु त्या मानाने त्यांनी शिक्षण मात्र काहीच घेतले नाही. कंपनीच्या दौऱ्यातील चारदोन मुक्कामी येऊन राहण्याचीदेखील खांसाहेबांनी तकलीफ घेतली. परंतु नाटकांमुळे होणारी जाग्रणे व धंद्याच्या भानगडी वगैरेमुळे शंकरराव सरनाईकांना शिक्षण घेण्यास फुरसतच मिळत नसे. खांसाहेब आले, राहिले आणि परत गेले! खांसाहेबांना या गोष्टीचे राहून राहून दुःख होत असे. "शंकर गाण्याला बसतच नाही-काय करावं? मला फार लाचारी वाटते." आणखी एकदोन गायिकांचा असाच प्रकार झाला. सारांश, स्वतःच्या पुत्रांनी विद्येकडे पाठ फिरविली आणि ज्यांनी गंडे बांधले त्याना विद्येपेक्षा केवळ प्रसिद्धीची प्रतिष्ठा पाहिजे झाली. या कारणाने "बाबा, आमच्या घराण्यातून सरस्वतीने आपले पाऊल बाहेर काढले" असे खांसाहेबांचे वरचेवर उद्‌गार असत.

# ९. अखेरचे दशक

## मंजीखा यांचा मृत्यू

गायन विद्येने आपले पाऊल बाहेर काढले आहे अशी खंत खांसाहेबांच्या तोंडून नेहमी निघे. त्याची काही कारणे पूर्वी आलीच आहेत. सन १९३७ मध्ये कर्ता पुत्र मंजीखां यांच्या अकस्मिक मृत्यूने तर कडेलोट केला. मंजीखां किंवा मञ्झलेमैय्या (मध्यम पुत्र) म्हणजे खरोखरच मध्यम पांडव पार्थाप्रमाणे सव्यसाची गायनवीर होता. खांसाहेब जेव्हा मुंबईस येऊन राहिले, त्यानंतर एकदोन वर्षांनी बंधू हैदरखां व शेवटी पुत्र मंजीखां यांनीही आपापली बिऱ्हाडे मुंबईस कायमची थाटली. जागेच्या टंचाईमुळे अर्थातच त्यांना एकत्र राहणे शक्य नव्हते. मंजीखां काही गृहस्थांना तालमी देऊन आपला योगक्षेम चालवू लागले. बंधू हैदरखां काही गायिकांना तालमी देत होते. धाकटे पुत्र भूर्जीखां कोल्हापुरास आपली दरबारची नोकरी व घर-जमीन सांभाळून राहिले होते. ज्येष्ठ पुत्र बडेजी हे उत्तरेस आपली वतनवाडी सांभाळून तेथील संस्थानिकांची शिरस्तेदारी करू लागले. त्यांचा एक मुलगा शिक्षणाकरिता अल्लादियाखांसाहेबांनी आपल्या जवळ मुंबईस ठेवून घेतला होता. सर्वांचे सर्व काही प्रतिष्ठितपणे यथास्थित चालले होते. परंतु दैवाला हे पाहवले नाही.

मंजीखांचे एका वाक्यात वर्णन करायचे तर किंचित अतिशयोक्तीचा धोका पतकरून 'ते गायनक्षेत्रातील विवेकानंद होते' असे करता येईल. स्वामी विवेकानंद वेदान्ताचा जणू काय गाभाच होते. त्यांची भाषणे वेदांतपरच असत. परंतु अज्ञ, सुज्ञ, स्त्री, पुरुष, तरुण, वृद्ध सर्वांच्या हृदयाचा ती सारखाच ठाव घेत. पौराणिकांइतकीच आधुनिकांवरही त्यांच्या दिव्यवाणीची मोहिनी पडे. वेदान्ततत्त्वज्ञानासारखा गहन विषय त्यांच्या सुंदर मांडणीमुळे, तल्लीनतेमुळे आणि प्रभावी व्यक्तिमत्त्वामुळे सर्व प्रकारच्या श्रोत्यांना आकर्षक वाटे. अशाच प्रकारची मंजीखांची गायन क्षेत्रातील योग्यता होती. वडिलांची पेचदार अवघड गायकी, अनोख्या रागांचा अगम्य विस्तार इत्यादींची कल्पना सामान्य श्रोत्यांना-देखील आकर्षक वाटेल अशा डौलाने व सहजतेने ते पुढे मांडीत. याची मुख्य कारणे त्यांचा निकोप सुंदर आवाज, आणि रोमरोमात बाणलेली रसिकता ही होती; त्यात त्यांच्या रुबाबदार व्यक्तिमत्त्वाची भर. अल्लादियाखांच्या गायकीत यमनकल्याणसारखे नित्यपरिचित

रागसुद्धा, जशी जगदंबेची नेहमीची मूर्ती नवरात्रातील नव्यानव्या साजशृंगाराच्या पूजेमुळे अपरिचित भासते, त्याप्रमाणे नवेनवेसे वाटत. याच्या उलट पुत्र मंजीखां हे एखादी अनोखी बिकट रागिणी गातानादेखील आपल्या सुंदर व लवचिक कंठामुळे श्रोत्यांना परिचित राग ऐकल्याचे समाधान देत. खांसाहेबांच्या रागदेवतेला अदबीने दुरून पाहण्यातच जनतेचे समाधान होत असे; उलट मंजीखां त्या देवतेला पालखीतून मिरवीत आणि सर्वसामान्य लोकांना तिचे जवळून दर्शन घडवीत. रागदेवता मातेप्रमाणे त्यांना कुरवाळीत आहे, असे वाटे. या कारणाने बिकटपणा, निर्मळपणा आणि सुंदरपणा ही या घराण्याच्या गायकीची अंगे असाध्य म्हणून निराशेने जे लोक तिच्यापासून दूर राहात, त्यांना मंजीखां आपल्या घराण्याच्या पद्धतीकडे नकळत खेचून घेत. प्रस्तुत लेखकाने अल्लादियाखांसाहेबांचे मुखातून आत्मगौरवाचे असे शब्द एकदाच ऐकले ते, "गोविंद-रावजी, आम्ही दक्खनमध्ये आलो तेव्हापासून इकडचे गायक लोक आमच्याकडे असो, पण आमच्या गायकीकडे विरोधी दृष्टीने पहात आले. पण आज दक्षिणेत असा कोणत्याही घराण्याचा होतकरू कोणीही गायक नाही की जो आमची पेचदार व तऱ्हेवार फिरत आपल्या गायकीत आणण्याचा प्रयास करून राहिलेला नाही." खांसाहेबांचे हे बोल वस्तुस्थितीचे पूर्ण निदर्शक होते; आणि याचे श्रेय बऱ्याच अंशाने मंजीखांकडेही जाते. उच्च दर्जाच्या सांगीतिक क्षेत्रामध्ये खांसाहेब एका विशिष्ट अभिजात गायनप्रकाराचे प्रणेते होते; तसेच मंजीखां हे सर्वसामान्य रसिकांमध्ये, त्या विशिष्ट पद्धतीचे सौंदर्य फैलावणारे प्रचारक होते. आणि असा प्रतापी, धट्टाकट्टा, निर्व्यसनी आणि आदर्श रसिक पुत्र निर्घृण काळाने ऐन जवानीत एकाएकी ओढून न्यावा! खांसाहेबांचे वय त्या वेळी निदान ऐंशीच्या सुमाराचे! सर्वांना वाटले की एवढा भयंकर आघात आता खांसाहेब सोसू शकणार नाहीत. पण ते जातीचेच धीरगंभीर; यापूर्वी देखील आणखी दोन अत्यंत शोकास्पद घटना त्यांच्या डोळ्यासमोर घडून आल्या होत्या; त्या वेळीसुद्धा ते धीराने निश्चल राहिले.

## धीरगंभीर वृत्ती

त्यांचा नातू (ज्येष्ठ पुत्राचा मुलगा) मॅट्रिकच्या वर्गात होता. त्या नातवावर त्यांची भारीच माया होती म्हणून त्यांनी त्याला मुंबईस आपल्या जवळ ठेविले होते. आणि तो लाडका नातू १९३३ मध्ये दिवाळीच्या दारूसामानाशी खेळताना अकस्मात भाजून मेला! वीस वर्षांचा नातू– आत्ता होता आणि आत्ता नाही!

दुसरा धक्का म्हणजे जन्मभर साथ देणारे बंधू हैदरखां १९३६ साली दिवंगत झाले. वरील दोन्ही शोकमय घटना कोणालाही बिछान्याशी कायमचे खिळून टाकण्यास पुरेशा होत्या. आणि १९३७ मध्ये मंजीखांचे अपघाती निधन म्हणजे खुद्द खांसाहेबांचा अप-मृत्यूच. "माझी म्हातान्याची काठी, घराण्याची तलवार दैवानं हिसकावून घेतली"– हे त्यांचे उद्‌गार स्वतःविषयी तर होतेच; परंतु घराण्याची विद्या मंजीखांबरोबर अंतर्धान पावली याचा अंतःकरणाला पीळ पडून ते निघाले होते.

## स्थितप्रज्ञ

एकामागून एक दुर्धर असे वरील आघात सोसून देखील आयुष्याचे ब्याण्णवावे वर्ष त्यांनी गाठावे आणि कार्यक्षम राहावे, यावरून खांसाहेब जसे गायनमहर्षी होते तसे ते संसारात स्थितप्रज्ञ होते, असे त्यांचे वर्णन करणे योग्य होईल. खांसाहेबांचे समानवयस्क, सुप्रसिद्ध हौशी बीनकार व संगीत विद्वान श्री. मंगेशराव तेलंग लिहितात, "पुत्र-निधनाचे हे दुःख वयोवृद्ध खांसाहेबांनी, ईश्वरावरील श्रद्धा व आध्यात्मिक विवेकशक्ती यांच्या सामर्थ्याने शांतपणे सहन केले. त्या वेळी मी मुंबईत नव्हतो; परंतु थोड्याच दिवसांनी जेव्हा मी कारवारहून मुंबईस जाऊन खांसाहेबांस भेटलो त्या वेळी माझ्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले–त्यांनाही गहिवर आला, परंतु खांसाहेबांनी एक वेदान्तपर चीज म्हणून दाखविली आणि माझे समाधान केले!"

वास्तविक, संगीतासारख्या भावनोत्तेजक कलेच्या आराधनेत ज्यांचे आयुष्य व्यतीत होते त्या व्यक्तींचा स्वभावदेखील साहजिक भावनासुलभ बनतो. हे बहुतेक सांगीतिक फार हळव्या अंतःकरणाचे असतात. परंतु दैवाचे प्रचंड आघात सोसण्याची, या 'मृदूनि कुसुमादपि' अंतःकरणामध्ये 'वज्रादपि कठोर' अशी सहनशक्ती कोठून पैदा होते? अर्थात जे सांगीतिक संगीतकलेच्या अंतःपुरात जाऊन पोहोचले व कलेचे चिंतन, मनन आणि आवाहन हेच ज्यांचे जीवन, अशा उच्च दर्जाच्या साधकांच्या ठिकाणीच हा विरोधी गुणांचा अद्‌भुत मिलाफ आढळून येतो. अशा प्रकारची योगसिद्धी प्राप्त करून घेण्याचे, तन्मयकलोपासना हे सर्वात प्रभावी व मनोरंजक साधन आहे असे म्हणता येईल. अनन्य-कलाभक्त जीवाने, कधी कोणत्याही हानीमुळे हाय खाल्ल्याचे किंवा कोणत्याही लाभामुळे त्याला हर्षवायू झाल्याचे उदाहरण आढळत नाही. लौकिकी पोकळ प्रतिष्ठेला, वित्तार्जनाच्या विवंचनेला व मामकांच्या मोहाला जो बळी पडतो तो अर्धवट कलावंत; त्याची स्वरसमाधी कधी लागलीच नाही असे म्हणता येईल.

अल्लादियाखांसाहेबांपाशी जी काय दहापाच हजारांची पुंजी दैववशात् जमली होती, ती त्यांच्या एका प्रतिष्ठित धंदेवाईक मित्राने संरक्षणाच्या निमित्ताने आपल्याजवळ ठेवून घेतली; आणि पुढे एकदोन वर्षांनी ती सर्व रक्कम त्याने सट्ट्यात की धंद्यात गमावली, आणि वगल झाडली! खांसाहेबांनी त्याबाबत कोणापाशी एक अवाक्षरही कधी काढले नाही! ज्यांना ही गोष्ट माहीत होती त्यांनी हा विषय कधी काळी त्यांच्यापुढे काढला तर ते म्हणत, "जे पैसे माझ्याजवळ मी बाळगलेच नाहीत ते गेलेलेच होते. आज तुम्हाला बातमी कळली इतकंच–पैसे नवीन गेले असं थोडंच." मात्र स्वरांची, चिजांची किंवा रागांची वाटमारी अथवा कोणी वाताहत केलेली खांसाहेबाना बिलकुल खपत नसे; कला–भांडाराला ते कृपणा-सारखे जपत. परंतु पैशाची कशीही वाताहत झाली तरी त्याचे त्यांना थोडेच सुखदुःख वाटे

## अंतर्बाह्य शुचिर्भूत

आपल्या कलेबाबत त्यानी आपले अंतरंग जसे निर्मल, सोज्ज्वल व प्रतिष्ठित ठेवले

तितकेच आपले बहिरंगही त्यांनी निर्मल व भारदस्त ठेवले होते. किंबहुना शारीरिक निर्मलतेचे त्यांना व्यसन जडले होते. कसल्याही शुचिर्भूत ब्राह्मणापेक्षा खांसाहेब अधिक शुचिर्भूत असत व दिसत देखील! त्यांच्या वेळच्या गायक-वादकांमध्ये जो राहणीचा गलिच्छपणा व वागणुकीचा विक्षिप्तपणा सामान्यतः बोकाळला होता, त्याचा त्यांनी स्पर्श-मात्रही स्वतःला होऊ दिला नाही. त्यामुळे कोणत्याही धर्माच्या किंवा जातीच्या कसल्याही कर्मठ कुटुंबातील मंडळींना, खांसाहेबांच्या सन्निध बसण्या-उठण्यात कधी भ्रष्टाकार झालासे वाटत नसे.

## पोषाख

त्याचप्रमाणे त्यांचा पोषाख–स्वच्छ, साधा, ठराविक व अत्यंत प्रतिष्ठित. पांढरा खमीज, एक सफेद कॉलर, उघड्या कॉलरचा काळा पारशी फॅशनचा लांब कोट आणि मारवाडी पद्धतीने नेसलेले, पण मराठेशाही दिसणारे, नित्य धुतलेले बळिबंकासारखे शुभ्र धोतर आणि डोकीला फिका गुलाबी किंवा बदामी रंगाचा, स्वतः रंगविलेला शरबती मलमलीचा फुलासारखा फेटा. पायात पंपशू व हातात चांदीच्या मुठीची काठी. दक्षिणेत आल्यापासून जो हा पोषाख एकदा निवडून त्यांनी कायम केला, त्यात कधी यत्किंचितही बदल झाला नाही. मुसल्मानांच्या मैफलीत जायचे म्हणून त्यांनी कधी धोतराऐवजी सुरवार पेहनली नाही, की राजदरबारात जायचे म्हणून काळ्या लांब कोटाऐवजी किनखाबी अंगरखा, बादली फेटा आणि जरतारी दुपेटाही त्यांनी कधी वापरला नाही. पाश्चात्त्यांच्या बूट–सूट नेकटायचा तर कधी संपर्कसुद्धा नव्हता. ती हौस चिरंजीव मंजीखांनी मनमुराद भागवून घेतली होती!

आहारविहाराच्या बाबतीतदेखील मितस्तपणा आणि सात्त्विक वृत्ती; घरी पकविलेले रुचकर व अंगी लागणारे असे भोजन व ते वक्तशीर; चहा-कॉफीची तर सर्व कुटुंबाला सक्त मनाई! खांसाहेबांनी कधी हॉटेलात जाऊन आपली क्षुधा शांत केली नाही. सुग्रास भोजनावर हुक्क्याचे चार झुरके आणि पक्क्या पानांचा विडा, तंबाखूची लहानशी चिमूट– हे काय ते व्यसन.

## व्यसनातीत

जोधपूर, जयपुरादी राजस्थानी खास दरबारात त्यांच्या तरुणपणी मदिरा, अफू, भांग इत्यादी मादक वस्तूंचा सर्रास वर्षाव होत असताना त्या जवानीच्या जमान्यातसुद्धा खांसाहेब कोणत्याही व्यसनाला बळी पडले नाहीत. बरोबरीच्या दोस्तांनी जबरदस्ती करूनदेखील काही उपयोग झाला नाही. वडील माणसांचा मनस्वी धाक असूनदेखील व्यसनाधीन झालेल्या दुर्दैवी तरुणांची उदाहरणे असंख्य आढळतात. कारण केवळ धाकाला कोणतेही व्यसन जुमानीत नसते. ध्येयाला धक्का पोहोचू न देण्याचे ब्रीदच व्यसनाला दूर ठेवू शकते. आपल्या गायनकलेतील प्रगतीच्या व तिच्या मंदिराचे शिखर गाठण्याच्या मार्गा-

मधील व्यसनांच्या धोंडी, लाथेने ठोकरण्याचा त्यांचा कृतनिश्चयच खांसाहेबांना व्यसनापासून दूर ठेवण्यास समर्थ झाला. त्यांना जवानी भोगायची नव्हती. त्यांना गायनमहर्षी आणि संगीतसम्राट व्हायचे होते! अर्थात मदिरा, मोहिनी, संपदा इत्यादी संगीतसाधनेला बाधक अशा मोहांमध्ये त्यांनी स्वतःला गुरफटून न घेणे हे त्यांच्या जीवनहेतूला अनुसरूनच होते. साहजिकच त्यांचा हा बाणा त्यांच्या पुत्रपौत्रांतदेखील बाणला असल्यास नवल नाही. खांसाहेब म्हणत, "खऱ्या गवैयानं आणि कर्तबगार पुरुषानं मोहापासून अलिप्त राहिल पाहिजे. व्यसनामुळं गवयाची कलादृष्टी खराब होते आणि व्यसन करणाऱ्या पुरुषाचा स्वाभिमान धुळीला मिळतो." सारांश, उच्चतम असून सौंदर्यलक्षी, कलापूर्ण असून शास्त्रविहित आणि प्रतिष्ठित असून आकर्षक अशा संगीतविद्येचा खांसाहेबांवर वरदहस्त होता; त्यामुळे वरील गुणविशेष त्यांच्या नित्याच्या व्यवहारात व बाह्य दर्शनातदेखील प्रकर्षाने झळकत असत. प्रतिष्ठेसाठी किंवा प्रसिद्धीसाठी त्यानी कधी कसलेच अवडंबर गाजविले नाही–ती त्यांची वृत्तीच नव्हती. अगाध विद्येच्या, प्रज्ञेच्या आणि कलेच्या बळावर ते जसे आपोआपच संगीतसम्राट ठरले तसे आपल्या निर्मळ आणि समतोल वागणुकीमुळे व कलामेव वृत्तीमुळे ते स्थितप्रज्ञ संसारी ठरले.

न मागता-सवरता असामान्य प्रतिष्ठा व प्रसिद्धी या दोन्हीही सिद्धी खांसाहेबांच्या मागे लागून त्यांनी खांसाहेबांची अखेरची आठ-दहा वर्षे किती उज्ज्वल केली हे सर्वांना माहीत आहेच. वास्तविक या कालखंडात खांसाहेब गायनक्षम राहिलेले नव्हते; शरीरामध्ये फारसा त्राणही राहिलेला नव्हता. परंतु अहमदाबादच्या रसिक जनतेने एकमेव गायन-विभूती म्हणून त्याना केवळ सन्मानार्थ पाचारण केले आणि मानपत्र देऊन त्यांचा सार्वजनिक गौरव केला.

यानंतर १९३९ मध्ये कलकत्त्याच्या अखिल भारतीय संगीत परिषदेने अत्यंत आग्रहाने, जणू काय उचलून, फर्स्ट क्लासच्या थंडगार (air-conditioned) डब्यातून त्यांना कलकत्त्यास नेले. परंतु हे अतिकृपाळू आधुनिक शीतोपचार त्यांना मानवले नाहीत; मग गायन कसले! तथापि बाबू दुलीचंदचे पाहुणे म्हणून खांसाहेब पूर्वी ज्या वेळी सहा महिने कलकत्त्यास राहिले होते त्या वेळेच्या त्यांच्या भरजोष गायनाची स्मृती लोक विसरले नव्हते. तेव्हा ही विभूती काय आहे हे एकदा चालू पिढीला दाखवून तिचा गुणिजनांनी खचलेल्या परिषदेत बंगाली रसिकांनी सत्कार केला.

नंतर १९४२ साली जागतिक युद्धाचा वणवा ब्रह्मदेश, ओलांडून हिंदुस्थानच्या सरहद्दीला येऊन भिडला आणि मुंबई शहराला बॉंब हल्ल्याची दहशत वाटू लागली. ज्यांना शक्य होते त्यांनी मुंबई शहरातून पाय काढला. अशा स्थितीत खांसाहेबांना त्यांच्या स्नेही मंडळीनी कोल्हापुरास आणून सोडले आणि सुमारे दीड वर्ष खांसाहेब कोल्हापुर मुक्कामी राहिले. १९४४ साली सहस्राब्दी विक्रमादित्य संगीत परिषदेसाठी त्यांना मुद्दाम परत मुंबईस नेण्यात आले.

१९३७ सालापासून खांसाहेबांचे मुंबईतील वास्तव्य योगक्षेमाच्या दृष्टीने बरेच कष्टाचे

होऊ लागले होते. एक तर ऐशी वर्षांवर वय झालेले; केसरबाईंचा नावलौकिक हिंदुस्थान-भर पसरल्यामुळे त्या दौऱ्यावर जात व त्यांच्या मुंबईत राहण्यात वरचेवर खंड पडू लागला. अर्थात खांसाहेबांची तालीम आता त्यांनी बंद केली होती. या वृद्धावस्थेत गायनाच्या मैफली निभावणे किंवा नव्या तालमी पतकरणे हेदेखील त्याना शक्य नव्हते. मुंबईस राहणारा पुत्र मंजीखां व बंधू हैदरखां दिवंगत झालेले. शिवाय मुंबई शहराची राहणी! खर्च निभावावयाचा कसा? कोल्हापूर दरबारचे तहहयात भर पगारी पेन्शन राजाराम महाराजांनी बंद केले होते. महाराजांना समक्ष भेटून आपली न्याय्य हक्काची कैफियत पुढे मांडणे खांसाहेबांच्या स्वाभिमानाला पटण्यासारखे नव्हते. कारण राजापुढे हक्काची मागणी करणे म्हणजे देखील याचना, असे त्यांना वाटे शिवाय त्यांना दिसत होते की, गुणसंपन्न मानवापेक्षा चतुष्पादांच्या जमावाची राजाला अधिक कदर होती! सारांश, येतील ते दिवस कष्टाने काढण्याची या वृद्धावस्थेत त्यांच्यावर पाळी आली होती. ज्या त्यांच्या स्नेह्याने त्यांची सुमारे दहा हजाराची पुंजी डुबविली त्यांनासुद्धा अशा या अडचणीच्या प्रसंगी अल्पांशाने तरी ऋणमुक्त होण्याची वासना झाली नाही! खांसाहेबांनी तर पैशाची मागणीच काय पण एक शब्दाचा निरोपदेखील कोणामार्फत पाठविला नाही. ईश्वरावरील श्रद्धा आणि संगीताचे भजन या दोहोंच्या आधारावर येतील तसे दिवस चित्ताची चलबिचल न होऊ देता खांसाहेब समाधानाने कंठीत होते.

पण अशा लोकोत्तर गुणवान व्यक्तीला दीर्घ काल विवंचनेत ठेवणे ईश्वराच्या घरी अन्यायाचे ठरले असते. लौकरच असे काही योगायोग घडून आले की, तूर्तच्या अडचणींचा परिहार होऊन त्यांच्या अंतकालापर्यंत त्यांना कसलीही विवंचना करण्याचे कारण पडले नाही; इतकेच नव्हे तर जिवंत असताना ते जसे प्रतिष्ठितांच्याच संगतीत राहिले तसेच त्यांच्या मृत शरीराला देखील प्रतिष्ठितांच्या विशेषतः त्यांचे स्नेही अबदुल वाहाब हकीमसाहेब यांच्या-कबरीशेजारी जागा मिळाली. अलीकडे खांसाहेबांच्या मनाला एकच चिंता लागून राहिली होती ती ही, की "आपल्या देहाला प्रतिष्ठित अशी जमीन मिळावी." त्यांच्या इच्छेप्रमाणे सुंदर जागा मिळाली. आणि यामुळे त्यांचे अखेरचे दिवस मनाच्या पूर्ण समाधानात गेले. आणि याचे श्रेय मुंबईचे श्रीयुत अनंतराव शिरगावकर यांना दिले पाहिजे.

सन १९३८ च्या सुमारास अल्लादियाखांसाहेबांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता पार पडली होती. एकमेव गायनमहर्षी व संगीतसम्राट अशी अखिल हिंदुस्थानात त्यांची कीर्ती पसरली होती. ज्या शिष्यिणीला त्यांनी जीव तोडून विद्यादान केले त्या श्री. केसरबाई, गुरुदेव महाकवी रवींद्रनाथ टागोरांपासून सर्व संप्रदायामधील गायक-गायिकांचे तसेच कर्णलोलुपांचे व सर्व रसिक कलावानांचे प्रशंसास्थान ठरल्या. आपल्या विशिष्ट गायन-पद्धतीचे अनुपमेय सौंदर्य व अगाध विद्वत्ता खांसाहेबांनी सर्वांना पटविली. डॉ. सर भांडारकरांनी प्राच्य विद्यासाहित्यामध्ये जे एकमेव अढळस्थान मिळविले त्याच तोडीचे स्थान खांसाहेबांनी संगीतविद्येमध्ये मिळविले होते. परकीय ब्रिटिश सरकारला आमच्या

संगीतकलेबद्दल थोडीशी जरी जिज्ञासा व सहानुभूती असती किंवा आमच्या विश्वविद्यालयांना संगीताची व कलोन्नतीची थोडी तरी चाड असती तर खांसाहेबांना 'डॉक्टर ऑफ म्यूझिक' व 'सर' या पदव्या केव्हाच मिळाल्या असत्या, असो.

सुखाबरोबर दारुण दुःखाचे, कौटुंबिक हानीचे प्रसंगही त्यानी अनुभविले; मोठेपणामुळे मिळणाऱ्या विभूतिपूजेबरोबर मोठेपणामुळे निर्माण होणाऱ्या अनेकांच्या हेवादाव्याची व मत्सराचीही त्यांना प्रचीती आली होती; कौटुंबिक क्षुद्र कलहांचीही थोडीशी आच त्यांना भोगावी लागली होती. तथापि, या सर्वांची क्षणिक मूल्ये पारखून, त्यापासून ते आता अलिप्त राहिले होते. वास्तविक ही त्यांची शेवटची आठ-दहा वर्षे निष्क्रिय राहून आरामाने घालविण्याची होती. पण प्रापंचिकाला द्रव्यार्जनावाचून आराम कोठून मिळणार? केलेला संग्रह अकस्मात नाहीसा झालेला आणि याचना करून किंवा हलाखी दाखवून आयुष्य कंठायचे नाही, हा तर खांसाहेबांचा बाणा. अर्थात त्यांची कुचंबणा होऊ लागली होती. पण—

## कुमारी लीलावती शिरगावकर

मुंबई म्युनिसिपल कार्पोरेशनमध्ये श्री अनंतराव शिरगावकर हे एक इंजिनिअर होते ते आता पेन्शनर आहेत. त्यांना कलाविषयांचा मनस्वी नाद असे. त्यातूनही संगीतकलेचा त्यांना विशेष षोक. उद्योगधंद्यामुळे तो षोक व्यवस्थितपणे स्वतः पुरविता येणे शक्य नव्हते. तेव्हा त्यांनी आपल्या पत्नीला गायनाची तालीम गवैय्याकडून सुरू केली. प्रतिष्ठित व लौकिकवान घरण्यातील एका गृहणीने गायनाचा षोक करावा आणि त्यातून गवयाची तालीम घ्यावी, हा त्या काळी भ्रष्टाकार समजला जात असे!

श्री. अनंतराव शिरगावकरांनी प्रसंगवशात एकदोन वेळ अल्लादियाखांसाहेबांचे गाणे पूर्वी ऐकले होते. परंतु त्या गाण्याचे सौंदर्य व वैशिष्टय त्यांना त्या वेळी उमगले नव्हते. तथापि त्यांच्या पत्नी सौ. इंदिराबाई यांनी गायनाचा थोडाफार व्यासंग केला होता. श्री. केसरबाईची त्यांनी बरीच गाणी ऐकली होती व त्या दोघींचा दाट परिचयही होत गेला. तेव्हा स्वतःला नाही तरी आपल्या कन्येला श्री. केसरबाईच्या पद्धतीचे गाणे शिकवावे अशी त्यांना इच्छा होणे साहजिक होते. पत्नीचा आग्रह पाहून श्री. अनंतरावांनी अल्लादियाखांपाशी कन्या कु. लीलावतीला तालीम देण्याविषयी गोष्ट काढली. त्यापूर्वी कु. लीलावतीला विलायतहुसेनखां यांची बरेच दिवस तालीम होती. परंतु म्हैसूर महाराजांनी त्यांना वडिलोपार्जित नोकरी देऊ केली होती. विलायतहुसेनखां म्हैसूरास कायमचे नोकर झाले अशाविषयी खांसाहेबांनी प्रथम आपली पूर्ण खात्री करून घेतली आणि नंतर त्यांनी शिरगांवकरांना होकार दिला.

कु. लीलाबाईची तालीम सुरू झाली. खांसाहेबांच्या गळयातील वार्धक्याचा कंप पाहून 'ही तालीम उभय पक्षी निभावणार कशी?' ही धास्ती सुरवातीस सर्वांनाच वाटू लागली. परंतु खांसाहेबांच्या शिक्षण देण्याच्या विशिष्ट पद्धतीमुळे थोड्याच दिवसांनी तालमीची

चडी नीट बसली. १९३७ साली गंडा बांधल्यापासून तो खांसाहेबांच्या अंतकाळा-पूर्वीपर्यंत सुमारे ९ वर्षे ही तालीम चालू राहिली. दिवसाचे बरेचसे तास खांसाहेब शिरगावकर मंडळींच्या घरीच काढीत. मध्यंतरी बॉब हल्ल्याच्या दहशतीमुळे कोल्हापुरातील दीड वर्षाचे वास्तव्य व इंदोरचा सहा महिन्यांचा मुक्काम आणि प्रकृतीच्या कारणांनी झालेले विक्षेप वजा जाता अविच्छिन्न अशी निदान सहा वर्षे कु. लिलूबाईला तालीम मिळाली. आणि त्या मानाने लीलाताईची जी गायनकलेत प्रगती झाली तिचे कोणीही कौतुक करील.

खांसाहेबांची शिक्षण-पद्धतीदेखील त्यांच्या गायनकलेप्रमाणे अभिनव व आकर्षक असे. राग कसाही वक्र किंवा मुष्किल असो. शिकणाराला त्याचा बाऊ करून दाखविणे किंवा त्याचे अवडंबर माजविणे ही त्यांच्या परंपरागत शिक्षणाची पद्धतीच नव्हती. स्वरांची बंदीष, लयीचे आंदोलन आणि तालाचे आघात या तीन अंगांनी प्रत्येक चीज शिकणाऱ्याच्या गळयात चुस्त बसली आणि दहापाच तानपलटे कंठगत झाले म्हणजे तिच्या विस्ताराचा मार्ग त्याला आपोआपच दिसू लागे. गु. भास्करराव मजेने म्हणायचे, "नुसत्या अंगुलीच्या इशाऱ्याने खांसाहेब कोणालाही गायक बनवतील! मात्र चिजेचा घाट ते सांगतील तसा गळयात बसला पाहिजे; मग पुढे रागस्वरूप, लयताल, स्वरविस्तार, तानक्रिया सर्व काही, चाकोरीतून गाडी नेण्यासारखे सुलभ होते." आवाजासंबंधी खांसाहेब एक अगदी साधा कायदा सांगत. बोलताना जसा आपण अकृत्रिम साफ आवाज लावतो, तसाच तो गातानाही लागावा. ते म्हणत, "जर आपण गळा आवळून व नाकातून बोलत नाही तर गाताना तसे का करावे!" हळूहळू खांसाहेबांची तालीम मानवू लागली व त्यांचा नित्य सहवास घडू लागला तेव्हा मग हरतऱ्हेने त्याना आरामात ठेवणे, त्यांची बडदास्त राखणे, त्यांना दवापाणी—हवापालट करणे इत्यादी अनेक बाबतीत शिरगावकर कुटुंब सदैव दक्ष राहू लागले. ऐंशी उलटलेल्या खांसाहेबांना आता बरेच परावलंबित्व आले होते. परंतु त्याची जाणीव शिरगावकर कुटुंबाने त्याना होऊ दिली नाही.

## शेठ गुलुभाई जसदनवाला

थोड्याच दिवसांनी मुंबईचा प्रपंच चालविण्याची जी थोडी काळजी होती तीही गुलुभाई जसदनवाला यांच्या तालमीमुळे नाहीशी झाली. हे गुलुभाई शेठ शिया (बोहरी) मुसल्मान आहेत. संबंध मुंबई शहरात जे काही चारदोन धनिक व्यापारी थोडाफार संगीताचा षोक बाळगणारे असतील त्यात उच्च अभिरुची आणि अभिजात संगीताची मनःपूर्वक उपासना करणारांमध्ये श्री. गुलुभाई हे अग्रगण्य आहेत. हे प्रथम खांसाहेबांचे मध्यम पुत्र मंजीखांकडे शिकत होते.

वास्तविक, भारतीय संगीतामध्ये विविधता व डौल आणण्यास गेल्या दीड दोनशे वर्षांतील मुसलमान गायकच मुख्यत्वे कारणीभूत झाले आहेत. असे असून मुसलमान

समाजामध्ये उच्च व अभिजात गायनाची आवड यत्किंचितही नसावी हे आश्चर्य आहे. दर्जेदार मुसलमानांमध्येदेखील संगीताची आवड बहुतेक कलावंतिणीच्या ठुंबरी-गजलात आणि तिच्या उन्मादक हावभावात केंद्रित झालेली! परंतु गुलभाई हे मुंबईपुरते तरी एकच अपवाद आहेत. अशा उच्च अभिरुचीचा उमदा तरुण, खांसाहेबांच्या अतुलनीय गायकीने मोहित होऊन त्यांचा भक्त कसा बनणार नाही? मंजीखां वारल्यामुळे पुढे गुलभाईंनीही खांसाहेबांची तालीम सुरू केली आणि लखपती असून देखील, खांसाहेबांना कष्ट पडू नयेत म्हणून शिरगावकरांच्या घरीच ते स्वतः तालीम घेण्यास येऊ लागले. खांसाहेबांच्या अंतकालापर्यंत त्यांनी आपले हे संगीताचे शिक्षण अखंडित ठेवले.

सारांश, खांसाहेबांना आता प्रापंचिक विवंचना करण्याचे फारसे कारण उरले नाही. एका ठिकाणी आरामात बसून विद्यादान करणे, लहर लागल्यास मोटरमधून सहल करणे, गाण्याच्या मैफलीला आग्रहाने कोणी नेले तर जाणे, सवड मिळाली तर शिक्षणाकरिता आतुर होऊन राहिलेल्या श्रीमती मोगूबाई कुर्डीकर यांना अधूनमधून जमेल तशी तालीम देणे इत्यादी प्रकारात खांसाहेबांचा कालक्षेप आरामाने होत असे.

## इंदोरची सफर

परंतु या संथ आयुष्यक्रमामध्ये एक अकस्मात विक्षेप आला. राज्यपदनिवृत्त श्री. तुकोजीराव होळकरांची अमेरिकन पत्नी शर्मिष्ठादेवी यांच्या कन्येला गायन शिकविण्यासाठी खांसाहेबांनी इंदोरास यावे, असा महाराजांनी आग्रह धरला; आणि इकडे आपल्या डोळ्यादेखत कुटुंबातील अविवाहितांची विशेषतः नातू व कन्या यांची लग्ने उरकून टाकावीत असे त्या वेळी खांसाहेबांच्या मनाने घेतले होते. शिवाय श्री. तुकोजीराव म्हणजे कर्णासारखा दाता, अशी कल्पना. गाण्याची गंधवार्ता नसलेल्या अज्ञ मुलीला शिकविण्या-करिता अल्लादियाखांसाहेबांची योजना म्हणजे अंकलिपी शिकविण्यासाठी रँग्लरची योजना करण्यासारखेच हास्यास्पद होते. अर्थात संस्थानिकांच्या बिनहिशेबी वृत्तीला ते धरूनच होते! शिवाय राज्यसंन्यास घेतला असला तरी राजा विष्णूचा अवतार ही भावना खांसाहेबांच्या मनात दृढमूल झालेली होतीच! तात्पर्य, खांसाहेब इंदोरास आशा धरून गेले आणि दोनतीन महिन्यांनी तेथील तऱ्हा पाहून परत आले!

या वेळी एक गोष्ट मात्र दिसून आली की, त्यांच्या या शेवटच्या दहाबारा वर्षांत खांसाहेबांच्या अतुल योग्यतेची जाणीव संगीतप्रेमी जनतेमध्ये विशेष जोराने पसरू लागली होती आणि अशा या गायनक्षेत्रातील युगप्रवर्तक महर्षींचा सन्मान करण्याचे महाराष्ट्र रसिक जनतेला कर्तव्य वाटू लागले होते.

## पुनश्च कोल्हापूर

बॉंबहल्ल्याच्या दहशतीमुळे खांसाहेब अकस्मात जेव्हा कोल्हापुरास सन १९४२ मध्ये आले तेव्हा ती संधी साधून थोड्याच दिवसांनी करवीर जनतेने त्यांचा मोठ्या राजकीय

थाटाने सत्कार केला आणि त्यांना मानपत्र[1] व एक हजार रुपयांची थैली श्री. छत्रपती ताराबाई राणीसाहेब रीजंट यांच्या हस्ते अर्पण करण्यात आली. श्रीमंत बावडेकर पंत-अमात्यांच्या वाड्याचा विस्तीर्ण चौक सरदार, मानकरी, अधिकारी व प्रतिष्ठित नागरिकांनी फुलून गेला होता. पहिल्या रांकेच्या मध्यभागी श्री. छत्रपती ताराराणीसाहेब परिवारासह बसलेल्या आणि समोर व्यासपीठावर आपल्या पुत्र-परिवारासह विराजमान झालेले धवलकेश ८८ वर्षांचे संगीततपस्वी अल्लादियाखां! एका संगीत कलावानाचा राज्यस्वामिनीच्या हस्ते असा सत्कार झाल्याचे हे अलीकडील काळात पहिलेच उदाहरण असेल.

## विक्रमादित्य सहस्राब्दी महोत्सव

त्यानंतर मुंबईस विक्रमादित्य-सहस्राब्दी समारंभ नामदार डॉ. जयकर यांच्या अध्यक्षते-खाली अपूर्व अशा प्रचंड जल्लोषाने साजरा झाला. उत्तर हिंदुस्थानातील सर्व नामवंत संगीत कलाकारांनी तो समारंभ सुशोभित केला होता. हिंदुस्थानी संगीताची आजकाल जी काही घराणी महशूर आहेत त्या प्रत्येकातील ख्यातनाम गायकवादक आपल्या कला-विशेषाचा प्रभाव दर्शविण्यासाठी मोठ्या उल्लासाने आणि अहमहमिकेने व्यासपीठावर विराजमान झाले होते. त्यात ग्वाल्हेर घराणे, आग्रे घराणे, किराणेवाले, जयपूर घराणे इत्यादी प्रत्येक घराण्याचे प्रतिनिधी कलावान उपस्थित होते.

तेथील श्रोतृसमाजाचे यथायोग्य वर्णन करणे कठीण आहे. एकतर मुंबईचे संगीतप्रिय सामान्य श्रोतेदेखील उत्सवप्रिय, उदारवृत्त व सभ्याचारसंपन्न असतात. त्यातून हा विक्रमादित्य-सहस्र-सांवत्सरिक महोत्सव आणि मुंबई विश्वविद्यालयाच्या विस्तीर्ण व भव्य अशा कॉन्व्होकेशन हॉलमध्ये साजरा करण्यात आलेला! संगीत कलाव्यासंगी असे नामदार न्यायमूर्ती डॉ. मुकुंदराव जयकर या महोत्सवाचे अध्यक्ष; अर्थात निवडक उच्च-वर्णीय संपन्न स्त्रीपुरुषांनी वसंत ऋतूत फुललेल्या बगीचाप्रमाणे त्या विस्तीर्ण हॉलला भरघोस शोभा आणली होती. प्रत्येक कलाकार आपल्या कौशल्याची पराकाष्ठा करीत होता. अहाहा, वाहवा यांनी ते आवार वरचेवर निनादित होऊ लागे.

अखेरच्या रात्रीच्या शेवटी, पहाटे पाच वाजता संगीतसम्राट अल्लादियाखांसाहेबांना मोटर पाठविण्यात आली. थोड्याच वेळाने हे नव्वद वर्षांचे गायनमहर्षी मैफलीत येऊन स्थानापन्न झाले. त्यांच्या असामान्य योग्यतेविषयी सर्व श्रोत्यांच्या मनात पराकाष्ठेची आदरभावना होती खरी; परंतु त्यांची कमजोरी व परावलंबी अवस्था प्रत्यक्ष पाहून हे खांसाहेब 'आ' तरी कसे करणार अशी श्रोत्यांना भ्रांती पडली. बरे, साथ देणारे त्यांचे पुत्र भूर्जीखां यांचीही प्रकृती बिघडलेली आणि आवाज बसलेला–कर्तव्य. म्हणून बाजूला बसून कशी तरी साथ करणे प्राप्तच–अशी ही अडचण पाहून चारदोन रसिक श्रोत्यांनी शक्कल काढली की, श्रीमती केसरबाईंनी खांसाहेबांच्या साथीला बसावे. ही

१. हे मानपत्र अखेर परिशिष्टात दिले आहे.

सूचना करणारांच्या रसिकतेची व कल्पकतेची तारीफ करावी तेवढी थोडीच, असे त्यावेळी सर्वांना वाटल्यास नवल नाही. कारण या दीप्तिमान दोन नक्षत्रांचा असा योग सार्वजनिक रीत्या पूर्वी कधी आला नव्हता व पुन्हा कधी येण्याचा संभव नव्हता. खांसाहेबांच्या साथीला बसण्यास केसरबाई केव्हाही तयार होतील ही सर्वांना खात्री होतीच. पण मुख्य प्रश्न होता, खांसाहेबांच्या मान्यतेचा. शेवटी महोत्सवाचे अध्यक्ष नामदार जयकरांनी स्वतः ही सूचना खांसाहेबांपुढे मांडली व खासाहेबांनी मान्य केली. प्रसंगाचे महत्त्व जाणून श्री. केसरबाई तंबोरा घेऊन खांसाहेबांच्या बाजूला बसल्या; तंबोरे वाजू लागले; तबल्यावर थाप पडली. श्रोत्यांना तो सर्व देखावा अपूर्व वाटला आणि खांसाहेब कोणता राग आता सुरू करणार इकडे सर्वांचे कान लागून राहिले. सकाळी सहा साडेसहा वाजण्याचा सुमार झालेला, रात्रभर जागल्यामुळे सर्वांचे डोळे आळसावलेले, विद्युत्-दीपपंक्ती मंदावू लागलेल्या आणि खांसाहेबांनी 'रामकली' रागातील "आज राधे तेरे बदन पर श्याम मिलेकी चोरी" ही सुंदर चीज सुरू केली. कंप आलेल्या आवाजाने देखील ज्या सहजपणाने आणि झोकाने ते समेवर आले त्याच वेळी श्रोत्यांची खात्री पटली, की ही गायकी काही और आहे! दोन मिनिटांनी आवाज किंचित काबूत येऊ लागताच रागाचे विशिष्ट अंग दाखविणारे तीव्र मध्यम व कोमल निषाद हे स्वर ज्या दर्जाने व शोभेने मांडले गेले त्या वेळी एखाद्या पुष्करणीतील रात्री मिटलेल्या कमळांपैकी ही दोन स्वर-कमळे सूर्योदय होण्यापूर्वीच उमलल्यासारखी वाटू लागली. केसरबाईंच्या साथीची लोकांना आतुरता लागून राहिली होती. परंतु त्यादेखील मंत्रमुग्ध होऊन स्तब्ध बसल्या! गुरूच्या गायकीतील अजब सौंदर्याची श्री. केसरबाईंना पूर्णपणे जाणीव होती. वास्तविक 'रामकली' हा राग काही त्यांना अपरिचित नव्हता. पण खांसाहेबांच्या साथीला बसणाऱ्या सर्वांचीच अशी अवस्था होत असे, मग ते हैदरखां, भास्करबुवा, मंजीखां, भूर्जीखां कोणीही असोत. तेव्हा श्री. केसरबाई मूक बसल्या तर आश्चर्य काय!

मागे एका ठिकाणी म्हटले आहे की, खांसाहेबांच्या विशिष्ट मांडणीमुळे परिचित रागदेखील अपरिचित अशा नवोनव सौंदर्याने नटलासा वाटतो; त्याचे या वेळी प्रत्यंतर आले. ग्वाल्हेरच्या एका ख्यातनाम तंतकाराने नंतर खांसाहेबांना विचारले, पहिली चीज आपण कोणत्या रागात गायली, खांसाहेब? खांसाहेब आश्चर्याने उद्गारले, "रामकलीत." ते तंतकार म्हणाले, "खांसाहेब, चीज रामकलीची, स्वर रामकलीचे, पण आपल्या या रामकलीची अशी शोभा यापूर्वी कोठे नाही आढळली मला!"

या प्रसंगी खांसाहेब अर्धा-पाऊण तास गायले; त्यांचा यथोचित गौरव व सत्कार करण्यात आला आणि या विक्रमादित्य सहस्राब्दी महोत्सवाची सर्वांगसुंदर सांगता झाली असे सर्वांनाच वाटले.

नव्वद वर्षे वयाच्या वेळेची खांसाहेबांच्या गायनकलाप्रभावाची व त्याबरोबरच श्री. केसरबाईंच्या कलोपासक वृत्तीची कल्पना देणारी अशी एक गोष्ट येथे नमूद करणे अवश्य आहे.

एकदा कोणाच्या तरी गाण्याला खांसाहेब गेले होते. फार वेळ बसवेना म्हणून ते दिवाणखान्याच्या बाहेर येऊन उभे राहिले आणि टॅक्सी आणण्यास माणूस पाठविला. त्यांना तिष्ठत राहिलेले पाहून तेथे उभे असलेले रा. गोखले (न्यू श्रीकृष्ण बोर्डिंगचे मालक) यांनी त्या गर्दीतून मोठ्या शिकस्तीने एक खुर्ची आणून सुकाय्याने ती खांसाहेबांपुढे आणून ठेविली, आणि आपण अतिशय अदबीने उभे राहिले. हा सभ्योपचार खांसाहेबांच्या नजरेतून सुटला नाही. ते म्हणाले, "तुमचा मी फार आभारी आहे. मी म्हातारा तुमच्याकरिता काय करू शकणार?" गोखले मोठे चाणाक्ष! ते म्हणाले, "आपले पाय माझ्या जागेला लागावेत इतके आपण करू शकता." सद्गदित होऊन खांसाहेब उद्गारले, "तुम्ही सांगाल तेव्हा मी तुमच्या येथे येईन."

त्यानंतर लौकरच श्री. गोखले यांनी आपले दालन सुसज्ज केले व अल्लादियाखांसाहेबांना ते एका सायंकाळी घेऊन आले. श्री. केसरबाईही रा. गोखल्यांच्या निमंत्रणावरून तेथे आल्या होत्या. थोडासा इतर कार्यक्रम झाल्यावर खांसाहेबांनी एक तरी चीज म्हणावी अशी त्यांना प्रार्थना करण्यात आली. खांसाहेब एकच चीज गायले; पण ती ऐकून केसरबाई बेचैन झाल्या! शेवटी श्री. गोखले यांनी खांसाहेबांचा यथोचित सत्कार समारंभ केला; हारतुरे अर्पण केले. खांसाहेब घरी आले. पण केसरबाईंना चैन पडेना. या आपल्या गुरुदेवाजवळ अद्यापि किती तरी अजस्र भांडार असून त्यातील अगदी अल्पांशच आपल्याला घेता आला याची त्यांना रुखरूख वाटू लागली आणि जेवढी काही अधिक विद्या मिळेल तेवढी घेण्याची ही अखेरची संधी आहे याची त्यांना तीव्र जाणीव झाली. पुन्हा तालीम देण्याची त्यांनी खांसाहेबाना गळ घातली आणि तशा त्या वयात त्यांनी ती मान्यही केली!

वरील हकीकत सांगण्याचा उद्देश असा की केसरबाईंनी अखिल भरतखंडात अतुल कीर्ती मिळविली होती. आता खांसाहेबांकडून दहा-वीस चिजा घेऊन त्या कीर्तीमध्ये काही अधिक भर पडणार नव्हती. पण खांसाहेबांच्या चिजांचा मोह केसरबाईंसारख्या खऱ्या रसिक वृत्तीला कसा आवरता येणार! आता या चिजा गोळा करणे म्हणजे दुर्मिळ नाण्यांच्या संग्रहाचा शोक करण्यापैकीच होते. त्या नाण्यांचे चलन करण्याचे सामर्थ्य खांसाहेबांबरोबरच नाहीसे झाले. पण दुर्मिळ वस्तू कोणाला नको असते?

## सुशीलाराणी

याच सुमारास 'फिल्म इंडिया'चे प्रख्यात संपादक श्री. बाबूराव पटेल हे 'द्रौपदी' नावाचा प्रचंड बोलपट काढीत होते. श्रीमती सुशीलाराणी त्यातील मुख्य अभिनेत्री होत्या. वास्तविक खांसाहेबांची गायकी आणि बोलपटातील हल्लीची गायकी या दोहोमध्ये स्वर्गपाताळाचे अंतर! परंतु चमत्कार असा की सुशीलाराणीच्या नैसर्गिक कलावृत्तीला खुद्द खांसाहेबांकडून तालीम घेण्याची जणू काय तहान लागली आणि हरप्रयत्नाने खांसाहेबांची त्यांनी तालीम सुरू केली. नदीचा प्रचंड प्रवाह उन्हाळ्यात आटून गेल्यावर तहानेने

व्याकुळ झालेले जीव तिच्या पात्रात झरे खणून पेलाभर पाणी मिळेल तर पाहतातच, तशी सुशीलाराणीची कलापिपासू स्थिती झाली होती. वार्धक्यामुळे खांसाहेबांकडून विद्या मिळण्याची फारशी शक्यता नव्हती, हे त्याना माहीत होते. परंतु खांसाहेबांसारख्या अनुपमेय गायन-सम्राटाची शेवटच्या क्षणापर्यंत केवळ भक्तिभावाने शक्य ती सेवा करण्याचे जणू काय त्यांनी व्रतच स्वीकारले आणि त्यातच स्वतःला कृतार्थ मानून घेतले. शेवटचे पाचसहा महिने खांसाहेब अगदी शरपंजरी पडले तेव्हा ज्या ज्या वेळी सुशीलाराणी त्यांच्या समाचाराला येत त्या त्या वेळी त्यांच्या अश्रुधारांना खळ पडत नसे. इतक्या अल्पावधीत खांसाहेबांच्या विषयी एवढी अलोट माया त्यांच्या अंतःकरणात निर्माण व्हावी हे त्यांच्या अभिजात उच्च अभिरुचीचे गमकच म्हटले पाहिजे. खांसाहेबांच्या अंतकालपर्यंत सुशीलाराणी त्यांना गुरुदक्षिणा पोहोचवीत असत.

सारांश, शरीराने काम देण्याचे अगदी नाकारले तोपर्यंत खांसाहेब विद्यादानाच्या कामी जागरूकच राहिले. बिछान्याला खिळले तरी नातवाला चिजा शिकविण्याचा त्यांचा क्रम चालू होताच. पुढे पुढे शेवटी दुखणे असाध्य होण्याची लक्षणे स्पष्ट दिसू लागली. थोर विभूतींचा अंतकाल किंवा विपत्ती पाहू नये म्हणतात; अर्थात तिचे पाल्हाळाने वर्णनही करू नये. अखेर १६ मार्च १९४६ रोजी पावणेअकरा वाजता अल्लादियाखांसाहेबांचा आत्मा इहलोक सोडून पैगंबरस्वरूपी विलीन झाला. गायनकला पोरकी झाली. सम्राटाचे तख्त कायमचे रिकामे पडले. प्रो. विलायत हुसेनखां आग्रेवाले यांनी उद्गार काढले, "आम्हा लोकांचे छत्र नाहीसे झाले!"

मृत्युसमयी बहुतेक प्रपंचपरिवार अल्लादियाखांसाहेबांच्या सभोवती होता; परमेश्वराने त्यांना सुदीर्घ आयुष्य दिले; अंतकाली यातना झाल्या नाहीत; सबंध आयुष्यात याचना करण्याचा प्रसंग आला नाही.

त्याच संध्याकाळी, या गायनमहर्षीच्या निधनाची दुःखकारक वार्ता मुंबईच्या नभोवाणीने जगजाहीर केली.

तसेच मुंबईतील सर्व घराण्यांतील कलाकारांनी व खांसाहेबांच्या चाहत्यांनी नामदार डॉ. बाबासाहेब जयकर यांच्या अध्यक्षतेखाली ब्लॅव्हेट्स्की हॉलमध्ये दुखवट्याची सभा भरविली आणि आपली श्रद्धांजली या दिवंगत संगीत सम्राटाला व गायनमहर्षीला जड अंतःकरणाने समर्पण केली.

श्री. अनंतराव शिरगावकरांनी खांसाहेबांच्या आजारीपणामध्ये त्यांची शक्य तेवढी अंतःकरणपूर्वक सेवा केली आणि त्यांना पाहिजे होती त्या प्रतिष्ठेची दफनभूमी हरप्रयत्नाने मिळवून दिली व खांसाहेबांची अंतिम इच्छा पुरवून त्यांच्या आत्म्याला संतुष्ट केले. इतकेच नव्हे तर आपली व आपल्या पत्नी सौ. इंदिराबाई यांची खांसाहेबांवरील श्रद्धा, निष्ठा, प्रेम व आदर इत्यादींचे द्योतक अशी, मुंबईस ठाकुरद्वार रोडवर समुद्राकडील रस्त्यालगत रूपावाडी येथील मशिदीच्या आवारामध्ये खासगी दफनभूमीत खांसाहेबांची सुंदर संगमरवरी कबर बांधून उभयता पतिपत्नींनी आपली सेवा वज्रलेप केली.

त्याचप्रमाणे शेठ गुलुभाई जसदनवाला यांनी श्रद्धावान शिष्याच्या हक्काने व हट्टाने खांसाहेबांचा दफनविधी आपल्या खर्चाने केला.

तसेच कुमारी लीलावती शिरगावकर यांनी खांसाहेबांचा ब्राँझ अर्धपुतळा शिल्पकार श्री. तालीम यांच्याकडून तयार करून घेण्याची आणि तो कोल्हापूरच्या ‘ स्मारक समिती’ला नजर करण्याची हौस वडिलांच्या व गुरुबंधू गुलुभाई जसदनवाला यांच्या साहाय्याने पुरवून घेतली.

खांसाहेबांचे स्मारक कोल्हापुरास होणे हे सर्व दृष्टीने उचितच होते. कारण, खांसाहेबांच्या कलेचा ऐन भरजोष जमान्यातील आस्वाद कोल्हापूर जनतेला पोटभर चाखायला मिळाला होता आणि तेथूनच मुंबई व नंतर अखिल हिंदुस्थानात संगीत महर्षी या अत्युच्च पदवीला ते पोहोचले.

## पुतळ्याचे अनावरण

सन १९४६ मध्ये देवल क्लब समोरील नव्या मध्यवर्ती विस्तृत चौकास खांसाहेबांचे नाव देण्यात आले होतेच. म्युनिसिपालटीचे मेंबर, प्रख्यात वकील आणि खांसाहेबांच्या घराण्याची तालीम घेऊन ती गायकी गाणारे, देवल क्लबचे सेक्रेटरी ॲडव्होकेट श्री. बाबुराव जोशी यांनी ‘कलापूर’ म्हणून गाजलेल्या कोल्हापुरच्या कलावानांची स्मृती कायम ठेवणे हे आपले संस्कृतीचे निदर्शक कर्तव्य आहे अशी सर्व नगरपित्यांची खात्री पटवून देऊन, खांसाहेबांचे नाव कोल्हापुरातील वरील प्रमुख चौकाला देण्याचा ठराव नगरपालिकेकडून एकमताने पास करून घेतला. पुतळ्याची जागा व पुढील सर्व कारवाई खांसाहेबांच्या स्मारक समितीने पुरी केली व श्री. अनंतराव शिरगावकरांनी सुप्रसिद्ध मूर्तिकार श्री. तालीम यांच्याकडून ब्राँझचा अर्धपुतळा तयार करून घेतला आणि सन १९४९ एप्रिल २२ रोजी मुख्य प्रशासक कॅप्टन नंजाप्पा यांच्या हस्ते त्या पुतळ्याचा अनावरण समारंभ झाला. अल्लादियाखांसाहेबांच्या कंठातून, संगीताच्या या उत्तुंग शिखरावरून वाहणारी गानगंगा गोठून हिमवती झाली; या गोठलेल्या गौरीशंकर शिखराचे दुरून दर्शन घेण्यातच आता रसिकांनी समाधान मानून घेतले पाहिजे.

# १०. उपसंहार

या चरित्राचा समारोप करण्यापूर्वी खांसाहेबांच्या विद्येचे वारसदार कोण राहिलेत आहेत हे आधी पाहू.

## विद्येचे वारसदार

अल्लादियाखांसाहेबांचे दीर्घकाल खास शिक्षण घेतलेल्या अशा पहिल्या शिष्या म्हणजे कोल्हापूरच्या श्री. तानीबाई घोरपडे. परंतु त्या केव्हाच दिवंगत झाल्या; दुसऱ्या अखिल भारतीय कीर्तीच्या गायनसम्राज्ञी श्रीमती केसरबाई केरकर. त्यांची गायकी वर्णनापलीकडे आहे. श्रीकंठाच्या मानाने जोमदार व कसदार असे त्यांचे गायन खांसाहेबांच्या गायकीचे राजमंदिराच्या संगमरवरी पुष्करणीत पडलेले अत्यंत आल्हादकारक प्रतिबिंब म्हणता येईल. त्याचे कितीही वर्णन केले तरी ते थोडेच. या अनुषंगाने ज्यांचा स्वतंत्ररीत्या उल्लेख करणे अवश्य आहे अशा श्री. मोगूबाई कुर्डीकर या सुप्रसिद्ध गायिका होत. यांनी अल्लादियाखां याचा नंतर गंडा बांधला तरी त्यापूर्वी खांसाहेबांचे बंधू हैदरखांजी यांच्याकडून त्यांना एकंदरीत अर्धीअधिक तालीम पोहोचली होती. आणि त्यामुळे त्यांच्या गायनामध्ये उभयविध रंगांचे मनोहर मिश्रण झालेले सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास आढळून येईल. श्री. मोगूबाई या दोन्ही रंगांशी इतक्या समरस झाल्या आहेत की कोणता रंग कोठे संपला व दुसरा रंग कोठे सुरू झाला हे सहसा उमगत नाही. लयीच्या व तालाच्या क्रीडाविलासाकडे तर त्यांचा जन्मजात जिव्हाळा आहे असे म्हणता येईल. सारांश, अल्लादियाखांसाहेबांच्या गायनकलेच्या खास व प्रमुख वारसदारांमध्ये श्री. मोगूबाईंचे स्थान उच्च दर्जाचे आहे. इतरांना विद्यादान करण्याबाबत कष्ट घेण्यास त्या केव्हाही तयार असतात. विद्यादानाच्या बाबतीत त्या एक कौतुकास्पद अपवाद आहेत.

दुसऱ्या एक सौम्य वृत्तीच्या व खांसाहेबांच्या गायनकला भांडाराच्या वारसदारांपैकी कोल्हापूरच्या श्री. लक्ष्मीबाई जाधव या होत. त्यांना अव्वलपासून अखेरपर्यंत खांसाहेबांचे बंधू हैदरखांजींची तालीम होती. ते पैगंबरवासी झाल्यानंतर अल्लादियाखांसाहेबांनी बडोद्यास येऊन (कारण त्या वेळी त्या बडोदा दरबारी नोकर होत्या) आपणास तालीम द्यावी असा लक्ष्मीबाईंनी फार प्रयत्न केला; परंतु खांसाहेबांच्या वृद्धापकाळामुळे तो

सफल झाला नाही. तरीदेखील मधुन मधून शक्य होई त्या वेळी खांसाहेबांनी काही थोडे शिक्षण त्यांना दिलेच.

या सर्व गायिकांचे खांसाहेबांच्या गायकीवर अनन्य प्रेम आहे आणि त्यांच्या विभूतिमत्वाचा त्यांना अनिवार अभिमान आहे. येथे असा एक प्रश्न मनात येतो की स्वतः गाण्यापलीकडे या अभिजात गायनपद्धतीचा फैलाव इतर होतकरू अभ्यासूंना शिक्षण देऊन करण्याची कामगिरी या गायिका का करीत नाहीत ? कोणी शिकणारे नाहीत की आपली परंपरा आपल्याबरोबर नाहीशी व्हावी असे यांना वाटते ?

खांसाहेबांच्या गायकीच्या पुरुष वारसदारांपैकी अस्सल व अव्वल दर्जाचे असे त्यांचे पुत्र कै. **मंजीखां**; पण दुर्दैवाने त्यांना अकालमृत्यूने ओढून नेले. मागे सांगितलेच आहे की ज्येष्ठ पुत्र बडेजी यांना प्रकृतीमुळे पन्नास वर्षांपूर्वीच गायनकलेशी फारकत करावी लागली. कनिष्ठ पुत्र भूर्जीखां यांचा चारच वर्षांपूर्वी अंतकाल झाला आणि घराण्याच्या विद्येची शेवटची औरस निशाणी पुसून गेली. तथापि भूर्जीखांनी मेनकाबाई शिरोडकर व कुमारी दुर्गाबाई कुलकर्णी यांना तालीम देऊन चांगल्या तयार केल्या आहेत. शिवाय गजाननबुवा जोशी, वामनराव सडोलीकर यांनाही थोडेफार शिक्षण त्यांच्याकडून मिळाले आहे. पुत्रानंतर खांसाहेबांचे चुलत पुतणे **मरहूम नत्थनखां** यांनी कोल्हापूरचे श्री. बाबुराव जोशी वकील व मुंबईचे श्री. वामनराव देशपांडे, ऑडिटर यांना शिक्षण दिले व त्यांच्या गायनात ते दिसून येते. इतर अनेकांना त्यांनी तालमी दिल्या परंतु त्यांच्या अकस्मात निधनामुळे वरील दोघांखेरीज नजरेत भरण्यासारखे फळ त्यांना आले नाही.

## नत्थनखां भैय्या

या ठिकाणी खांसाहेबांच्या एका असामान्य भक्ताचा सद्गदित अंतःकरणाने उल्लेख केल्यावाचून राहवत नाही. हे त्यांचे अनन्य पुजारी दुसरे कोणी नसून वर उल्लेख केलेले त्यांचे चुलत पुतणे पै. नत्थनखां हे होत. चुलत्यापासून पुतण्याला कमाई झाल्याची उदाहरणे अनंत आहेत. परंतु पुतण्याने अहर्निश कष्ट करून आपली सर्व कमाई चुलत्याच्या आरामासाठी अनन्य भक्तिभावाने अर्पण करीत राहणे, ही सध्याच्या दुनियेत विरळी गोष्ट ! असा अलोट निष्ठा बाळगणारा निस्वार्थी नातलग पूर्वपुण्याईनेच लाभतो. असे हे नत्थनभैय्या होते. बिचाऱ्याने कधी खांसाहेबांच्या नजरेला नजर भिडवली नाही, फार काय स्वतःच्या अस्तित्वाची फारशी जाणीवदेखील त्यांना होऊ दिली नाही.

चमत्कार असा की, पुढे मृत्यूपूर्वीच्या संभ्रमावस्थेत खांसाहेबांच्या मुखातून "नत्थन, तू भी मेरे साथ चल" असे एकदोन वेळ उद्गार निघाले होते. त्यांचा नत्थन भैय्याच्या हळुवार मनावर विलक्षण परिणाम झाला, आणि खांसाहेबांच्या प्राणोत्क्रमणानंतर भैय्याची स्थिती अर्धवट सैरभैर झाली. आपले जिणे आता व्यर्थ! आपल्या श्रद्धेचे व सेवेचे अधिष्ठानच नाहीसे झाले, अशा निराशेने पूर्ण शुद्धीत नमाज पढत असताना एका मशिदीत ते एकदम बेशुद्ध पडले आणि काही वेळाने मृत्यू पावले. खांसाहेबांना

स्वर्गातदेखील एकटे सोडण्यास जणू काय ते राजी नव्हते! इतक्या भोळ्या वृत्तीचा, निर्व्याज अंतःकरणाचा, विद्यादान-उदार व रसदार गायक अलीकडील जमान्यात क्वचितच आढळेल.

त्यानंतर खांसाहेबांचे प्रत्यक्ष थोडेफार शिक्षण मिळालेले असे गोविंदबुवा शाळिग्राम, शंकरराव सरनाईक, शेठ गुलुभाई जसदनवाला हे सुदैवाने कार्यक्षम आहेत; पण ते कोणाला तयार करतील अशी आज तरी अपेक्षा नाही. शाळिग्रामबुवांचा गळा नाही म्हणून, सरनाइकांना ते करायला नको म्हणून आणि शेठ जसदनवाला यांना वेळ नाही म्हणून!

त्यानंतर मंजीखांचे शागीर्द म्हणजे आजकाल प्रसिद्धीस आलेले श्री. मल्लिकार्जुन मन्सूर हे एकच होत. खांसाहेबांच्या परंपरेचा अभिमान धरणारे व शक्य तो त्या वळणाची गायकी गाण्याचा प्रयत्न करणारे कोल्हापूरचे निवृत्तिबुवा सरनाईक हे एक आहेत. हे तालमी देत आहेत. अंशतः आझमबाई यांना व सरदारबाई कारदगेकर यांना निवृत्तिबुवांची तालीम आहे. शिवाय श्री. सडोलीकर, श्री. बालाजी चौघुले इत्यादी व मुंबईतील श्री. मोहनराव पालेकर, मजीदखां व दत्ताराम पर्वतकर (सारंगिये); श्री. वामनराव सडोलीकर, श्री. शंकरराव देशपांडे वगैरे अनेक मंडळी खांसाहेबांच्या गायनपरंपरेचे एकनिष्ठ उपासक आहेत. ही सर्व मंडळी अभ्यासू वृत्तीची आहेत आणि ही परंपरा राखण्याची जबाबदारी अंशतः या प्रत्येकावर आहे हे सांगायला नको.

वर निर्देश केलेली चालू पिढीतील गायक मंडळी आजकालच्या सांगीतिक दुनियेत मानाच्या स्थानावर अधिष्ठित झालेली आहेत. याखेरीज खांसाहेबांच्या गायकीचीच विशेष आवड असलेले व त्यांचे अभिमानी बालगंधर्व, मास्तर कृष्णराव व इतर अनेक गायक, श्रोते व भक्त ठिकठिकाणी आहेत. यावरून खांसाहेबांच्या गायकीची पाळेमुळे दक्षिणेत किती खोलवर रुजली आहेत याची कल्पना येईल. ही परंपरा फैलावण्याची व उज्ज्वल राखण्याची कामगिरी वरील मंडळी कसोशीने व आस्थेने पार पाडतील अशी आशा करायला हरकत नाही.

## उपसंहार

उत्तर हिंदुस्थानी संगीताच्या एका अभिजात व श्रेष्ठतम पद्धतीचा महाराष्ट्रामध्ये पन्नास-पंचावन्न वर्षे प्रसार करून संगीतसम्राट व गायन महर्षी अल्लादियाखांसाहेब वयाच्या ब्याण्णवाव्या वर्षी दिवंगत झाले. त्यांच्या वैयक्तिक जीवनाच्या दृष्टीने त्यांचा अंत निसर्ग-नियमाला धरून व अपेक्षित असाच झाला. परंतु या एका महान कलावानाच्या मृत्यूमुळे संगीतकलेची केवढी हानी झाली तिचा अंदाज करणेदेखील कठीण आहे. कोणत्याही कलेचा खरा उत्कर्ष तिच्यावर लिहिलेल्या शास्त्रीय आणि शालेय वाङ्मयावरून किंवा विद्यालये व शाळा निर्माण करून होत नाही. कलेविषयी चिकित्सा, जिज्ञासा व आस्था वगैरे फैलावण्याच्या कामी हे उपक्रम आवश्यक असतात यात संशय नाही. परंतु कलेचे-

विशेषतः संगीत कलेचे–खरे वैभव घराणेदार गायकांच्या कंठातील करामतीतूनच सिद्ध होते. जोधपूरवाले, अत्रोळीवाले, आग्रेवाले, ग्वाल्हेरवाले, किराणेवाले इत्यादी निरनिराळी घराणी गेल्या दोनतीनशे वर्षांमध्ये आपापल्या विशिष्ट गायन-परंपरेचे अनेक कलावान निर्माण करीत होती. त्यांचे अवशेष असे कलावान दुर्दैवाने आज एका हाताच्या बोटावर मोजण्याइतकेही नाहीत. सुदैवाने जे आहेत, ते आयुष्याच्या उताराला लागले आहेत. ईश्वर त्यांना शतायुषी करो. कारण कलात्मक अभिजात असे संगीत आता त्यांच्या जवळच काय ते राहिलेले आहे; आणि तरुण पिढीतील व्यासंगांना ते जितके अधिक ऐकायला मिळेल तितके त्यांचे व संगीतकलेचे सुदैव. या दृष्टीने पाहता, अल्लादियाखां-साहेबांच्या मृत्यूमुळे झालेली आमच्या संगीतकलेची हानी कधीही भरून येण्यासारखी नाही.

आमच्या भारतीय संगीताचे वैशिष्ट्य व वैभव रागरचनेत आहे व जगातील कोणत्याही संगीत–पद्धतीपेक्षा ते निसर्गसिद्ध व स्वयंपूर्ण आहे. रागरागिणी या आपल्या संगीत-सागरातील विहार-नौका आहेत. घराण्यांच्या वैभवाचे खरे गमक म्हणजे ज्याप्रमाणे भांडारातील पिढीजाद संग्रह केलेले हिऱ्यामोत्याचे विपुल अलंकार, त्याप्रमाणे संगीतकलेचे खरे वैभव व खरी समृद्धता रागरागिणी व त्यातील चिजा होत; आणि ज्या कलासंपन्नांना अपूर्व अशी ही रागरत्ने कंठात घालून मिरविता येते आणि ती पेलण्याचे ज्यांना सामर्थ्य असते तेच संगीतकलेच्या वैभवाचे जिवंत व जातिवंत प्रतीक मानले जातात. ईश्वरदत्त कंठमाधुरीमुळे, सहजसुंदर गायनपद्धतीमुळे, कृत्रिम औडंबरामुळे सर्वसामान्य रागरागिण्या गाऊन जरी स्वतःपुरता नावलौकिक मिळविता आला तरी अशा गायकांकडून संगीताचे क्षेत्र चिरकाल समृद्ध केले गेले, असे म्हणता येत नाही. किनाऱ्यालगतच्या मर्यादित क्षेत्रातील ती एक मनोहर जलक्रीडा. ती केव्हाही व कोणालाही आकर्षक वाटते इतकेच. परंतु प्राणांचे निरोधन करून खोल पाण्यात शिरणारे पाणबुडेच मोती काढून दाखवितात. अल्लादियाखां हे अशा खोल पाण्यात शिरणारे पाणबुडे होते. गेल्या पन्नास वर्षांतील महाराष्ट्रातील वास्तव्यात कितीतरी नवी रागरत्ने त्यांनी प्रकाशात आणिली आणि त्यांचा प्रसार केला, शिवाय शेसवाशे तरी अपरिचित राग त्यांच्या बरोबरच गेले.

यावरून एक गोष्ट सिद्ध होते की पूर्वापर पिढीजाद गायकांचा संगीत प्रपंच फार विशाल व समृद्ध होता. कै. भातखंडे यांनी अनेक अप्रसिद्ध रागस्वरूपे व त्यातील चिजा नोटेशनसह छापून प्रसिद्ध केल्या आहेत. परंतु ते राग व त्या चिजा, गुरुमुखाच्या अभावी पुस्तकातच राहणार; कारण या अनोख्या रागरागिणींचे संकीर्ण व एकजिनसी स्वरूप, विशिष्ट डौल इत्यादींचे आकलन केवळ पुस्तकी उहापोहाने होणे अशक्य असते; प्रत्यक्ष गुरुमुखातूनच ते शक्य होते. अशा प्रकारचे बाल्यपणापासूनच गुरुमुखी शिक्षण मिळाल्या कारणाने व अहोरात्र परिश्रम केल्यामुळे अल्लादियाखांसाहेब ती स्वरूपे प्रत्यक्ष गाऊन

श्रोत्यांच्या मनाचा ठाव घेत. आपल्या शिष्यवर्गाला व पुत्रांना त्यांनी निवडक असे बरेच अनोखे राग शिकविले म्हणून आजकालच्या उच्च गायनकलेत तेवढीच काय ती भर पडली आहे. इतर घराण्यातील ख्यातनाम गायकांच्या कलाभांडारात काही असामान्य रागस्वरूपे असली तरी तीदेखील त्यांच्या गुलदस्तात; त्यांच्या पुरती. सारांश, या अनोख्या रागरागिणींच्या राखीव क्षेत्राला आमची गायनकला सर्वस्वी मुकणार की काय आणि तिचे साम्राज्य नित्यपरिचित रागरागिणीपुरतेच मर्यादित राहणार की काय, असे उद्वेगाचे प्रश्न पुढे उभे राहतात.

अल्लादियाखांसाहेबांनी आपल्या ह्यातीत अपरिचित रागांचा प्रसार करण्याचे कार्य गायनाच्या व शिक्षणाच्या द्वारे शक्य तेवढे केले. किंबहुना अनोख्या रागांचे आकर्षण निर्माण करून त्याचा बोलबाला करण्याचे व त्या योगे संगीतकला समृद्ध करण्याचे श्रेय खांसाहेबांनीच बहुतांशी घेतले असे म्हणता येईल. अनवट व अवघड रागांची मांडणी व विस्तार करण्याची अजब मोहक शैली त्यांच्या गायनात जशी होती तशीच संगीतकला समृद्ध करण्याची कळकळही त्यांच्या अंतःकरणात होती.

सर्वपरिचित असे तेच ते नित्याचे राग गाऊन श्रोत्यांना नादतरंगावर झुल्वीत ठेवाव-यालासुद्धा फार उच्च दर्जाची तपश्चर्या लागते यात संशय नाही. परंतु वर्षोंगणती तेच ते राग घुसळले गेले तर संगीत कलाक्षेत्राच्या संकुचितपणाची जाणीवही काही काळाने बोचू लागते. रेडिओवरील कलाकारांचे कार्यक्रम ऐकले म्हणजे तर वरील विधानाला दुजोराच मिळतो. तेच ते परिचित राग कलात्मकतेने गायले तर कलाकाराचा व्यक्तिगत गौरव होतो. पण गायनाच्या क्षेत्राचा त्या योगे काहीच विस्तार होत नाही. एखाद्या अजस्र वाड्यातील काही दालने मात्र अतोनात वापरामुळे जीर्ण व्हावीत आणि इतर दालने पडीक ठेवल्यामुळे धुळीला मिळावीत, असा हा प्रकार होत आहे. वापर न केल्या-मुळे कितीतरी राग लुप्त झाले आहेत व काही लुप्त होण्याच्या मार्गाला लागले आहेत.

सूक्ष्म दृष्टीने व अभ्यासू वृत्तीने मनन केल्यास अल्लादियाखांसाहेबांच्या चरित्रापासून तरुण पिढीच्या गायकांना पुष्कळ बोध मिळण्यासारखा आहे. विशेषतः त्यांचा गायनाचा निदिध्यास, अहर्निश मेहनत, आपल्या पेक्षा श्रेष्ठ कलावानांच्या संगतीची आवड व त्यांच्या विषयीचा अलोट आदर, इत्यादी कितीतरी गोष्टी घेण्यासारख्या आहेत. सर्वात विशेष घेण्यासारखी गोष्ट म्हणजे खांसाहेबांची निर्मत्सरवृत्ती. उच्चतर कलेच्या दृष्टीने ते इतके परिपूर्ण होते की त्यांनी मत्सर करावा असे इतरांजवळ क्वचितच काही होते! आणि तसे काही असले तर त्याचा गौरव करण्यात त्यांना कमीपणा वाटत नसे. लहान मुलाच्या आवाजातील लटक ऐकली, जात्यावरील गीतामध्ये एखादाच मोहक खटका कानावर पडला तर ते तेथेच थबकत आणि ईश्वराच्या देणगीला धन्यवाद देत. नाटकातील पात्रांच्या काय किंवा नामवंत गवैय्यांच्या गाण्याला काय—मग तो कोणत्याही घराण्याचा असो—योग्य त्या ठिकाणी त्याचे कौतुक करायला खांसाहेब कधी चुकत नसत. तसेच त्यांच्या समोर दुसऱ्या गायकाचा कोणी तुच्छतेने उल्लेख केलेला त्याना खपत नसे. त्यांना

खूष करण्याकरिता एका गवयाने अब्दुल करीमखांची भरमैफलीत गाता गाता भ्रष्ट नकल करून दाखविली आणि त्यांच्या गायकीविषयी हेटाळणीची भाषा केली; ती अल्लादियाखांनी ऐकून घेतली आणि शेवटी त्या गायकाला त्यांनी हळूच विचारले, "बुवासाहेब, अब्दुल करीम इतका सुरात गाणारा आजकाल दुसरा कोणी गवैय्या हयात आहे का? तुम्ही स्वतःचे गाणे गाऊन मैफल राजी करा ना; तुमचं गाणं काही वाईट नाही."

इतर घराण्याच्या गायकांची कोणी निंदा निर्भत्सना केलेली त्यांना खपत नसे; मग तो स्वतःचा शिष्य असला तरी त्याच्यावर ते भयंकर नाराज होत असत. प्रत्येकाने आपापल्या घराण्याची पद्धती न सोडता इतरांच्या गायकीतून घेण्यासारखे व शोभण्यासारखे असेल तेवढेच घ्यावे व ते आपल्या गायकीमध्ये मुरवावे. निरनिराळ्या गायकीचे सौंदर्यबिंदू व तासीर निरनिराळी असते. चौकोनी हिऱ्याला गोलाईत हिऱ्यासारखे पैलू पाडण्याचा प्रयास करणे चुकीचे आहे; त्यामुळे खड्याची नासाडी होते. या बाबतीत, स्वतःच्या मुलांवरदेखील ते नाराज होत. दुसऱ्याच्या गाण्याची तंतोतंत नकल करता आली तरी ती नकलच. नकला करण्याचा पुढे नाद लागतो आणि स्वतःच्या घराण्याचे गाणे लुप्त होऊ लागते, असे ते म्हणत.

खांसाहेबांच्या गाण्यातील विशिष्ट अंगांचे वर्णन करण्याचा पहिल्या भागात प्रयत्न केलाच आहे. त्यांची एक गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. ती ही, की त्यांनी गायन सुरू केले म्हणजे चिजेचा डौल, राग, लय व स्वरालाप या बाबत ते पराकाष्ठेचे जागरूक असत. आणि ही इतकी जागरूकता कशासाठी? तर वरील प्रत्येक क्रियेत शक्य तितके सौंदर्य-बिंदू निरनिराळ्या रंगाने चमकून उठावेत म्हणून. एखादा स्वरालाप किंवा एखाद्या तानेची लड श्रोत्यांना आवडली व वहावा मिळाली म्हणून त्यांची पुनरुक्ती ते करीत नसत; तीच तान घेतली तरी, कुठे तरी तिच्या बनावटीत (pattern) काही अधिक कौशल्यपूर्ण बदल केल्यावाचून ते राहावयाचे नाहीत. श्रोत्यांच्या अपेक्षेला अनुसरून किंवा अनुलक्षून ते गात नसत; श्रोत्यांना अपेक्षा करण्यास ते अवसरच देत नसत. श्रोत्यांनी एका तानक्रियेला मान डोलविली की दुसरी त्याहीपेक्षा अशा एकाहून एक सरस तानांचा ते वर्षाव करीत. अभिजात कवीला ज्याप्रमाणे, वृत्त, यती, प्रास वगैरेंना धरूनच सुंदर आलंकारिक शब्दात काव्य-कल्पना सुचतात, त्याप्रमाणे राग, स्वर, लय या त्रयीला चिकटूनच त्यांना विविध व अपूर्व ताना सुचत. अर्थात याला मनस्वी तपश्चर्या पाहिजे. परंतु त्या दृष्टीने चिकाटीचा प्रयत्न केला तर बुद्धिमान तरुण गायकाला थोडे तरी यश खात्रीने मिळेल.

ज्यांच्या गायनक्रियेत योजना, लयीचा प्रवाही गुण व सुसूत्र क्रम असतो त्यांच्याच गायनामध्ये सर्व दर्जाच्या श्रोत्यांची आतुरता वाढविण्याचे सामर्थ्य असते; आणि वाढती आतुरता हेच आकर्षणाचे मूळ आहे. कशिद्याची चौकट रेशमाच्या गुंतावळीने भरून काढणे आणि विशिष्ट आकृती साधण्यासाठी रंगीत धाग्यांची योजनाबद्ध गुंफण करणे, या दोहोत जमीन-अस्मानाचा फरक असतो. गळा वाटेल तसा फिरविता व फेकता आला

तरी योजनापूर्वक तानांचा वापर केला तरच श्रोत्यांवर परिणाम होतो. आजकाल, तयारीची तानबाजी करणे हेच उच्च गायकीचे प्रमुख अंग व एकमेव साध्य मानले जात आहे. अल्लादियाखां तरुणपणी कमालीच्या तयारीने फिरत असत. परंतु एका वयोवृद्ध सारंगियाच्या कान उघडणीमुळे त्यांनी ती तयारी कमी करून लयीच्या मर्यादा तिच्या भोवती घातल्या. तालाच्या लीला ते अनेक प्रकारच्या करीत. परंतु त्या करतानादेखील, श्रोत्यांच्या ठिकाणी निर्माण केलेले लयीचे आंदोलन ते कधी पुसट होऊ देत नसत; आणि त्यामुळे त्यांची गायकी शेवटपर्यंत प्रवाही आणि प्रभावी राहिली.

खांसाहेबांचा मूळचा आवाज बंधू हैदरखां व पुत्र मंजीखां यांच्या आवाजांच्या जातीचा पत्तीदार व तासीरदार होता. परंतु त्यावर जोर पडल्यामुळे तो रुंद व बसकट झाला. पूर्वीची रोषणी त्यात येण्याची निराशा झाल्यावर त्यांनी तसल्या त्या आवाजाला शोभेल अशी स्वतंत्र गायकीच निर्माण केली आणि दुनियेत नाव केले! ही किमया सर्वांना साध्य होण्यासारखी नाही; हे अतुल बुद्धिमतेचे आणि असीम कष्टाचे काम आहे आणि असे प्रयोग करण्याची सर्वांनाच गरज पडते असेही नाही. एक गोष्ट मात्र घेण्या-सारखी आहे ती ही की, संगीतकलाक्षेत्रात मानाचे उच्चतर स्थान मिळवू पहाणाऱ्या व्यासंगींनी आपल्या नैसर्गिक आवाजाला शोभेल व पेलता येईल अशीच गायकी आत्मसात करावी. ध्रुपदधम्मार किंवा ख्याल गाण्याला सर्वस्वी योग्य असा रुंद, भरदार व कणखर कंठ असलेल्यांनी ठुंबरी, दादरे, केहेरवे वगैरे नाजणी गायनप्रकारांच्या उसाभरीत सहसा पडू नये. आणि नाजूक हलक्या अरुंद आणि अस्थिर गळेबाजांनी ध्रुपद-धम्मार किंवा ख्याल गायकीच्या फारसे भरीला पडू नये. पूर्वकालीन गायक असे निर्बंध पाळीत होते. म्हणूनच ध्रुपद-धम्मार, ख्याल, टप्पा, ठुंबरी अशा निरनिराळ्या जाती निर्माण झाल्या असाव्यात आणि त्यांची निगा व त्यांची विशिष्ट प्रकृती अनुरूप आवाजांच्याच गायकाकडून राखली जात असे. सर्वच प्रकारची गायकी आपल्या गळ्यातून काढून दाख-विण्याचा प्रयास गेल्या एक दोन पिढीतील गायकांनी केल्यामुळे ध्रुपद-धम्मार व टप्पा हे गायन प्रकार तर नामशेष झालेच, पण ख्यालातदेखील ठुंबरीच्या मुरक्या व ठुंबरीत ख्यालाची तानबाजी, अशी भेसळ होऊ लागली आहे. कोणत्याच गानप्रकाराचा या भेसळीमुळे उत्कर्ष साधला जात नाही आणि गायकालादेखील अमुक एका विशिष्ट गायन प्रकारात, दर्जाचे स्थान मिळत नाही. हलीचा मनू गुणवैशिष्ट्याच्या गरजेचा आहे. कोणत्याही एका क्षेत्रात पारंगत असणाऱ्यांची (specialist) आजकाल भरपूर कदर केली जाते. आमच्या तरुण गायकांनी मात्र या वस्तुस्थितीकडे डोळे झाक करून संगीताचे व स्वतःचे नुकसान करून घेतले आहे. सर्वच गायक सर्वच प्रकारची गायकी गाऊ लागले, त्यामुळे सामान्य दर्जापलीकडे कोणालाच प्रतिष्ठा मिळू शकत नाही. एखादा-दुसरा गायक अपवाद म्हणून कदाचित दाखविता येईल. अल्लादियाखांसाहेब एकजात ख्यालियेच राहिले. ध्रुपद-धम्मारांतूनच ख्याल निर्माण झाले व दोहोंचीही त्यांना भरपूर तालीम मिळाल्यामुळे ते ध्रुपद-धम्मार प्रसंग पडल्यास गात, इतकेच; परंतु ठुंबरी, दादरे

इत्यादींसारखे प्रकार गाण्याचा त्यांनी कधीही व्याप केला नाही. तरीदेखील सर्व प्रकारच्या श्रोत्यांचे त्यांनी समाराधन केले. याचे कारण ख्यालाचीच अभिजात व भारदस्त गायकी त्यांनी कळसाला पोहोचवली.

तसेच त्यांनी पूर्वीच्या आपल्या तरुणपणीच्या ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्यावरून पाहता आजकालच्या व पुढील पिढीच्या गायकांनी खेळीमेळीने गायनाच्या बैठकी करून सप्रयोग व निर्मत्सर गुणचर्चा करण्याची प्रथा पाडल्यास आपले संगीत कितीतरी वाढीला लागेल. आजकाल पाहावे तर चार गायकांची तोंडे चार दिशेकडे! आपापल्या घराण्यांचा शाब्दिक वृथाभिमान बाळगणे व इतरांना तुच्छतेने लेखणे हेच एक कलावानांचे कर्तव्य होऊन बसले आहे. तसेच रेडिओवर गाण्याची संधी मिळविणे, हे होतकरू गायकांचे ध्येय होऊन बसले आहे. अशा अदूरदृष्टी व अल्पसंतुष्ट वृत्तीतून संगीत कलेची वाढ होणार कशी ?

मुंबई, पुणे, कोल्हापूरसारख्या मोठमोठ्या शहरातून अनेक संगीत विद्यालये आहेत; शिवाय संगीताच्या तालमी देणारे अनेक गायक-वादक आहेत. परंतु हे बहुतेक कुलगुरू विद्यालयाच्या वाढदिवशी आपल्याच विद्यार्थ्यांचे कौतुक करण्यात व त्यांच्या पालकांसमोर बक्षीस-समारंभ करण्यात कृतकार्य झालो असे समजतात. विद्यार्थ्यांना उत्तेजन देण्यासाठी हे प्रकार आवश्यक आहेत यात संशय नाही. परंतु, खऱ्या कलेचे अंकूर त्यांच्यामध्ये फुलविण्यास व खुद्द शिक्षकांची गायनात प्रगती होण्यास अशा नैमित्तिक समारंभांचा काहीच उपयोग होत नाही. प्रत्येक रविवारी व सुट्टीच्या दिवशी सर्व घराण्याच्या गायक-वादकांनी एकत्र जमून गुणिजनांच्या मेळाव्यापुढे खेळमेळीने व उल्हासाने आपल्या कलेचा अविष्कार केला तर तो स्वतः गायकाला व गायक श्रोत्यांनाही लाभदायक होईल. अशा गुणिजनांच्या मैफली व्यासंगी शिष्यांना ऐकायला मिळतील तर संगीताच्या कलात्मक स्वरूपाची त्यांना अधिकाधिक कल्पना येत जाईल; नामवंत होऊ पाहणाऱ्या गायकांचादेखील अशा गुणिजनांच्या खासगी मैफलीपासून फार मोठा फायदा होईल. कारण एकजात गुणिजनांच्या बैठकीत गाताना जो हुरूप, जी ईर्ष्या व दाद मिळण्याची खात्री वाटते तीमुळे गायकाच्या ठिकाणी असलेले सर्व कलाविशेष उमलून व दवळून वर येतात; स्वतःला कल्पना नसलेल्यादेखील स्वरमालिका गायकाच्या कंठातून अशा प्रसंगी बाहेर पडतात, हा केवढा तरी लाभ! गायनकला इतकी वृद्धिंगत झाली याचे बरेच श्रेय अशा पूर्वीच्या मैफलींना आहे. गेल्या २५-३० वर्षांपासून ही प्रथा नाहीशी झाली व आपण आणि आपले विद्यालय या पलीकडे गायकांची दृष्टी जाईनाशी झाली; त्यामुळे उच्च गायकीचे स्वरूप कलानिविष्ट न राहता ते व्यक्तिनिष्ठ व साहजिकच किरटे होऊ लागले आहे. आपल्या संगीतकलेच्या उत्कर्षाकरिता झटणाऱ्या या संगीत प्राध्यापकांनी या गोष्टीकडे अवश्य लक्ष द्यावे, अशी विनंती आहे.

गेल्या पंचवीस वर्षांपासून अधिकाधिक खडतर होत चाललेल्या जीवनकलहामुळे व प्रापंचिक परिवारामुळे, इच्छा असूनसुद्धा संगीत कलेची दीर्घकाल आराधना करून कला-

क्षेत्रात बहुमानाचे स्थान मिळविणे आजच्या पिढीला अशक्य झाले आहे आणि त्या कारणाने कलेच्या तुटपुंजा भांडवलावर शाळा, विद्यालये, खाजगी शिकवण्या इत्यादी थातुरमातुर करून तिला योगक्षेम चालवावा लागतो, हे म्हणणे खोटे नाही. परंतु अशा व्यापामध्ये पडणारे लोक पुढे कलेच्या बाबतीत निराश व नंतर अल्पसंतुष्ट बनतात, हेही पण खरे आहे; आणि संगीतकलेच्या उन्नतीला ही वृत्ती अत्यंत विघातक होते. संगीतकलेचे क्षेत्र संकुचित होण्याचे मुख्य कारण या अल्पसंतोषी वृत्तीमध्ये आहे. सुरुवातीची कला-संपन्न होण्याची उत्कंठा त्यामुळे नष्ट होते आणि गुणवर्धनाच्या अभावी प्रसिद्धीच्याच मागे लागून योगक्षेम चालविण्याची सवय लागते. अल्लादियाखांसाहेबांना घरच्याघरी विपुल विद्या मिळूनदेखील वयाची तीस वर्षे उलटल्यानंतर त्यांनी प्रपंचाची जोखीम नाइलाजास्तव कर्तव्य म्हणून अंगावर घेतली; तथापि कलासंपादनाच्या आपल्या जीवित-हेतूला त्यांनी तिची झळ लागू दिली नाही. विद्यार्जनाची खडतर तपश्चर्या करताना कशाही हालअपेष्टा आल्या तरी त्यांना न जुमानणाऱ्या कलोपासकाच्या कंठात शेवटी लक्ष्मीला दूर सारून सरस्वती आणि कीर्ती या दोघीही मागे लागून माळ घालतात, हे खांसाहेबांच्या चरित्राचे सारभूत तत्त्व प्रत्येक कलाभ्यासंगीने आपल्या हृदयात साठवून ठेवण्यासारखे आहे.

शेवटी, अल्लादियाखांसाहेबांच्या उज्ज्वल चारित्र्याच्या, निर्लेप राहणीच्या व कलामेव जीवनाच्या या स्मृतिग्रंथातून सांगीतिकांना व रसिक वाचकांना काही बोध घेण्यासारखे मिळो आणि तेच या संगीत सम्राटाचे व गायन महर्षीचे यथायोग्य चिरंजीवी स्मारक होवो अशी ईश्वरचरणी प्रार्थना करून या महान विभूतीचे हे अल्पसे चरित्र समाप्त करणे योग्य होईल.

# परिशिष्ट १

## अल्लादियाखांसाहेबांना दिलेले मानपत्र

[१९४२ मध्ये खांसाहेब कोल्हापुरास आल्याची संधी साधून कोल्हापुरच्या जनतेतर्फे त्यांचा सत्कार करून त्यांना एक मानपत्र समारंभापूर्वक देण्यात आले. याचा उल्लेख प्रकरण ९ मध्ये आहे. विशेष हे की हे मानपत्र गोविंदरावांनीच संपूर्णतया तयार केले होते. त्या कारणाने गोविंदरावांना खांसाहेबांच्यासंबंधी जे काही गौरवपूर्वक म्हणायचे होते ते सर्व त्यात एकत्रित आले आहे. म्हणून ते मानपत्र समग्रच खाली दिले आहे.]

### महनीय अल्लादियाखांसाहेब!

आपल्या पराक्रमाने भारत वर्षाची कीर्ती वाढविणाऱ्या व अभिमानपूर्वक निर्देश करण्या-योग्य अशा ज्या व्यक्ती प्रभूकृपेने आम्हाला लाभल्या त्यापैकी आपण एक आहात. साहित्यात रवींद्रनाथ टागोर, राजकारणात लोकमान्य टिळक व महात्मा गांधी, विद्यासंवर्धनात पं. मालवीयजी इत्यादी श्रेष्ठ विभूतींप्रमाणे संगीतक्षेत्रातील आपले स्थान एकमेव आहे.

कै. राजर्षी श्री छत्रपती शाहूमहाराज यांच्या कृपेमुळे करवीर आपल्या ऐन उमेदीतील कार्यक्षेत्र झाले व येथील आपल्या दीर्घकाळ वास्तव्यामुळे करवीरस्थांना आपल्याविषयी पराकाष्ठेचा अभिमान व आत्मभाव वाटत आला आहे. श्रीसंपन्न होण्याचे परप्रांती आलेले अनेक योग आपण मोहवश न होता दूर सारले ही आपली करवीरावरील एकनिष्ठा व प्रेमभावना आपल्या चारित्र्याला विशेष उज्वलता आणीत आहे.

### तपस्वी खांसाहेब!

आपण गायनकलेत सम्राट व संगीत शास्त्रात महर्षी आहात; त्याचप्रमाणे लौकिक जीवनात स्थितप्रज्ञ आहात. कीर्तिसंपन्न कर्त्या पुत्राच्या निधनाचे दारुण दुःख व आयुष्यातील कित्येक अनिष्ट योग उतारवयात सहन करून, आपण संगीताचे ज्ञानसत्र वयाच्या पंचाऐंशीतही चालू ठेविले, याहून अधिक उदात्त असे स्थितप्रज्ञतेचे उदाहरण क्वचितच सापडेल.

सतत साठ वर्षे आपल्या अभिजात अतुलनीय गायकीचे स्वरूप कोणत्याही लौकिक मोहाला वश न होता आपण निर्मळ व सोज्वळ ठेविले आणि अनेक प्रकारच्या मत्सरग्रस्त विरोधी वातावरणाला न जुमानता आपण आपल्या परंपरेच्या कलोपासनेचा कर्मयोग अखंड चालू ठेविला. हा आपला आदर्श, रसिकांना स्फूर्तिदायक व कलाकारांना मार्गदर्शक झालेला आहे.

**कलासम्राट खांसाहेब !**

आपल्या विशिष्ट गायनकलेचे वर्णन करणे शब्दांच्या सामर्थ्याबाहेर आहे; आपल्या कलेचे स्वरूप तसेच हिमनगभव्य आहे; आपल्या गायन-प्रकारात नृत्याचे लालित्य, समशेरीची फेक, मल्लांचे डावपेच, नदीप्रवाहाचे गांभीर्य, आणि सागराची संपन्नता आढळून येते; शिवाय आपली अगाध बुद्धिमत्ता व योजनाचातुर्य इत्यादी असामान्य गुणविशेषांमुळे सम्राटपदावरून द्रष्टा या दिव्य ध्रुवपदाला आज आपण पोहोचला आहात.

महाराष्ट्रातील व विशेषतः करवीरातील आपल्या सुदीर्घ वास्तव्यामुळे संगीत कलामंदिराची अनेक नवी नवी दालने जिज्ञासू कलाभ्यासंगी लोकांना ज्ञात होऊ लागली व त्यामुळे तरुणपिढीच्या गायन-वेलीवर वसंत पालवीची नवीनता व विविधता येऊ लागली आहे. संगीतक्षेत्रातील ही आपली प्रभावी सत्ता संस्मरणीय होणारी व चिरकाल टिकणारी आहे.

**परमपूज्य खांसाहेब !**

गायनकलेच्या सम्राटपदावर आपण दीर्घकाल अधिष्ठित झालाअसूनही आपल्या ठिकाणी अहंभाव अणुमात्र नाही; या आपल्या गुणाचा उल्लेख केल्यावाचून राहवत नाही. आपल्या राहणीतील प्रतिष्ठितपणा, भाषेतील मितस्थपणा, समतोल गुणग्राहकता, अल्पज्ञांविषयी वत्सलता, इत्यादी गुण आदर्शवत् आहेत.

**अमरकीर्ति अल्लादियाखांसाहेब !**

आपणास परमेश्वराने उदंड आयुष्य द्यावे आणि भारतीय संगीतकलेचे एक असामान्य वैभवशाली प्रतीक या भावनेने नम्र होण्यायोग्य महान विभूती आपल्या रूपाने आम्हाला दीर्घकाल लाभावी, अशी जगन्नियंत्यास आमची अन्तःकरणपूर्वक प्रार्थना आहे.

कोल्हापूर

आपली,

**गुणलुब्ध करवीर जनता**

# परिशिष्ट २

या पुस्तकात खांसाहेबांच्या पूर्वज व नात्यातील व्यक्तींचा निर्देश मोघम व चुकीचा झाला आहे. 'सुदैवाने खांसाहेबांचे नातू अजिझुद्दिन हे येथे असून त्यांनी घराण्याची वंशावळ वगैरे जतन केली आहे' असा उल्लेख ग्रंथकर्त्यांनी पा. २४ वर केला आहे. तेव्हा त्यांचेच सहाय्य घेऊन खालील माहिती देणे जरूर वाटत आहे.

खांसाहेबांचे मूळ पुरुष नाथविश्वंभर (पा. १९) यांचे पासूनची वंशावळ मिळू शकली नाही. पण त्यांचे पणजोबा नत्थूखां (पा. २०) पासून मिळालेली वंशावळ खालील प्रमाणे :




टीप (१) खांसाहेबांचे गुरु चचा जहांगीरखां हे वरील वंशावळीत आलेले नाहीत. ते चुलते का चुलतचुलते अशी शंका ग्रंथकारानेही प्रदर्शित केलीच आहे (पान. २६). ते खांसाहेबांचे फार दूरचे भाऊबंद असावेत किंवा बेटी व्यवहाराने नातलग असावेत. पण जवळचे नातलग एवढी माहिती निश्चित आहे. नवीन माहिती म्हणजे ख्वाजा महमदखांच्या कडेच जहांगीरखां शिकले. या दृष्टीने घराण्यातीलच गायकी खांसाहेबांना मिळाली हे म्हणणे योग्य ठरते.

टीप (२) नत्थनखां (बडे किंवा आग्रेवाले नव्हेत) जे कोल्हापुरास व अखेर मुंबईस खांसाहेबांच्या जवळ राहिले ते हैदरखांचे चिरंजीव म्हणजे खासाहेबांचे चुलत चुलत बंधू होत असले तरी हैदरखांसाहेबांना दत्तक गेल्यामुळे पुतणेही होतात. (पृष्ठ ९)

टीप (३) चचा एहमदखां (पा. ११) म्हणजे सक्खे चुलते नव्हेत पण खांसाहेबांचे चुलतचुलते हे स्पष्ट होईल.

# सूची



महाराष्ट्रीय संगीताला गोविंदराव टेंबे अनेक दृष्टींनी वरदान ठरलेले आहेत. त्यांनी आपल्या युगातील सांगीतिक उत्कर्षबिंदूंचं डोळसपणे आस्वादन केलं आणि स्वतः मिळवलेला आनंद ज्ञात्याच्या नजरेतून लेखनरूपानं आजच्या पिढीपर्यंत आणून पोचविला. प्रस्तुतचं त्यांचं 'अल्लादियाखांसाहेबांचं चरित्र' हा त्या गायन महर्षीच्या पंचेचाळीस वर्षांच्या सहवासातून मिळालेल्या प्रचीतीतून जन्माला आलेला बहुमोल ग्रंथ आहे.

स्वतः गोविंदरावांनी ज्यांना गुरू मानलं त्या भास्करबुवा बखल्यांसारख्या संगीत-भास्करानं ज्यांच्यामागं तंबोऱ्याला बसण्यात आणि त्यांचा शिष्य म्हणवून घेण्यात धन्यता मानावी अशा खांसाहेबांच्या सांगीतिक कर्तृत्वामागं नेमकी कोणती प्रेरणा होती, त्यांच्या गायकीची वैशिष्ट्यं काय होती; प्रज्ञा, प्रतिभा आणि तपस्या यांची रसाळ गोमटी फळं त्यांना व त्यांच्या योगे शिष्यांना व रसिकांना कशी चाखायला मिळाली याचं अत्यंत मार्मिक, प्रत्ययकारी आणि सौंदर्यशास्त्रीय विश्लेषण आणि वर्णन करून गोविंदरावांनी गायक-कलावंतांच्या चरित्राचा एक आदर्शच निर्माण केला असं म्हणता येईल. खांसाहेबांचे ते 'बहिःशाल' शिष्यच होते! या सबंध चरित्रातून लेखकाचा 'मी' आपल्याला कुठंही जाणवत नाही. चरित्रनायक बोलत आहे आणि गोविंदराव त्याचं बोलणं आपल्यापर्यंत पोचवीत आहेत, असा या चरित्राचा थाट आहे.

या चरित्रातून महाराष्ट्रीय संगीताच्या 'त्या' सुवर्णयुगातील अव्वल दर्जाचे कलावंत, त्यांच्या संगीत मैफली, आश्रयदात्यांची भक्ती, दानशूरता नि लहरीपणा, श्रेष्ठ गुणीजनांची संगीतावरील उत्कट प्रीती, गुरुशिष्यसंबंधातील बांधिलकी, उस्तादांची अफाट मेहनत व अव्यभिचारी कलानिष्ठा या सर्वांचं दर्शन गोविंदरावांनी आनुषंगिक रूपानं परंतु कादंबरीच्या रंजकतेनं घडवलं आहे. अल्लादियाखांना 'गायन महर्षी' हे विरुद देत असताना त्यांचं विराट व्यक्तिमत्त्व, अचाट तपश्चर्या, अंतर्बाह्य शुचिर्भूतपणा, स्थितप्रज्ञता, बोलण्यातील मितस्थपणा, व्यसनरहितता यासारख्या गुणांना कौशल्यानं अधोरेखित करून लेखकानं चरित्रनायकाची पृथगात्म श्रेष्ठता अचूकपणे दाखवून दिली आहे. गोविंदरावांच्या या लेखनकर्तृत्वाचं श्रेय त्यांच्यातील सहज साहित्यिकता, विशुद्ध कलासक्ती, नितान्त गुरुभक्ती आणि बांधवांपुढे काही आदर्श ठेवण्याची तळमळ यांना दिलं पाहिजे.